भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-पुरस्कृत ग्रंथमाला क्र. ३४

# पेशवाईच्या सावलींत

संपादक

**नारायण गोविंद चापेकर**

'बदलापूर', 'एडमंड बर्कचें चरित्र', 'पैसा', 'गच्चीवरील गप्पा',
'वैदिक निबंध', 'समाजनियंत्रण', 'साहित्यसमीक्षण',
'निवडक लेख' इत्यादि पुस्तकाचे कर्ते.

शक १८५९.

किंमत चार रुपये
(भारत-इतिहास-संशोधक-मंडळाच्या सभासदांस किंमत तीन रुपये)

आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणें २

# अनुक्रमणिका

[प्रकरणांतील पोटविषय सूचीमध्ये आले, प्रस्तावनेंतील नाही. म्हणून प्रस्तावाची अनुक्रमणिका येथे दिली आहे.]

# पुरस्कार



**'पेशवाईच्या सावलींत'** हा श्री. ना. गो. चापेकर यांचा ग्रंथ पेशवाईचा उत्तरार्ध व इंग्रजी अमलाचा प्रथमपाद या काळांतील समाजस्थितीच्या हिशेबी अभ्यासकांस फार उपयुक्त व महत्त्वाचा वाटेल असाच झाला आहे.

व्यवहाराचें चित्र हिशेबांत जितकें चोख दिसून येतें तितकें अन्यत्र आढळून येणें दुरापास्त असतें. आपल्याइकडे हिशेबी कागदपत्रांचा व साधनांचा अभ्यास अद्यापि जागरूकतेने सुरू झाला नाही. पूर्वी कै. न्या. रानडे यांनी पेशवेदप्तरांतील निवडक उतारे वाचून या अभ्यासाचा पाया घालून दिला. पुढे दुसरे अभ्यासकच पुढे आले नाहीत. या अभ्यासास अत्युपयोगी असें जें पेशवेदप्तर तेंच सरकारने कृपणांप्रमाणे कैक वर्षें कुलुपांत बंद करून ठेविलें होतें. अनेक प्रयत्नान्तीं पेशवेदप्तरांतील बरीच माहिती अलीकडे प्रसिद्ध झाली आहे. तथापि एकंदर दप्तरांत सुमारें वीस हजार रुमाल भरतील एवढा मोठा कागदांचा भरणा आहे. छापलेलें साहित्य दहा रुमाल भरेल न भरेल इतकेंच आहे. सर्व कागद छापण्याचें कारणच नाही, परंतु अजून बारीकसारीक परंतु महत्त्वाचे तपशील पुरविणारी कितीतरी बिनमोल माहिती या दप्तरांत दडलेली आहे. अभ्यासकांनी या भांडाराकडे अवश्य लक्ष्य पुरवावें. जेव्हा महाराष्ट्रविद्यापीठ स्थापन होईल तेव्हाच या दप्तराचा यथोचित परामर्श घेणें सुकर होईल. पेशवेदप्तराची गोष्ट सोडली तरी ऐतिहासिक काळांतील घराण्यांचीं खाजगी हिशेबी दप्तरें व कागदपत्रेंहि शेंकडो, नव्हे हजारो, मिळूं शकतात. तिकडे अभ्यासकांनी लक्ष्य दिलें पाहिजे.

याच हेतूने भा. इ. सं. मंडळाचे संस्थापक कै. वि. का. राजवाडे यांनी दूरदृष्टि ठेवून चिपळोणकर यांचेकडील जमाखर्चाचीं सुमारें शेंदीडशें पुडकीं मंडळांत संग्रहून ठेविलीं होतीं. समाजशास्त्राचे अभ्यासक श्री. ना. गो. चापेकर यांनी या पुडक्यांचा परामर्श घेण्याचें ठरवून हें किचकट काम हौसेने अंगावर घेतलें आणि अशा रीतीने भा. इ. सं. मंडळांतच या हिशेबी साधनांच्या अभ्यासाचा पाया घातला. क्रमाक्रमाने आपल्या अभ्यासाचीं फळें श्री. चापेकर यांनी मंडळाला सादर केलीं. त्यांतील कित्येक भाग मंडळाने प्रसिद्धहि

केले. चिपळोणकरी हिशेबदप्तराचा अभ्यास सुरू झाल्याचें पाहून मंडळाचे चिटणीस श्री. सरदार आबासाहेब मुजुमदार यांनी प्रख्यात तुळशीबागवाले यांच्या घरच्या हिशेबवह्यांची प्राप्ति मंडळास करून दिली. श्री. चापेकर यांनी या वह्यांतीलहि उपयुक्त माहितीचे कण गोळा केले ! पुढे आणखी कांही दप्तरेंहि—वैद्य व सुभेदार—श्री. चापेकर यांनी स्वतः मिळविलीं.

या सर्व दप्तरातून अभ्यासोपयोगी माहिती निवडून काढणें हें फार कंटाळवाणें वाटणारें व जिकिरीचें काम आहे. तें श्री. चापेकर यानी मोठ्या आवडीने केलें आहे. कित्येक वर्षें त्याना हा उद्योग पुरवला.

रावसाहेब नानासाहेब चापेकर यानी आरंभ केला म्हणून वर सांगितलेंच आहे. तुळशीबागकराच्या वह्याप्रमाणेच मिळालेल्या दीक्षित-पटवर्धन याच्या वह्या श्री. शं. ना. जोशी याच्या खटपटीने मंडळांत आल्या. त्यांचा अभ्यास सुप्रसिद्ध अर्थशास्त्रकोविद प्रो. वा. गो. काळे यानी अलीकडे सुरू करून मंडळापुढे निबंधरूपाने व व्याख्यानरूपाने पुष्कळ नवीन माहिती मांडली. प्रो. काळे यांचा उद्योग पुढे चालूच आहे.

प्रो. चिं. ब. जोशी यानीहि मंडळात व पेशवेदप्तरांत उद्योग करून ऐतिहासिक आर्थिक घटनाचा अभ्यास सवडीनुसार चालविला आहे. याप्रमाणे विद्वान मंडळींचें लक्ष्य या विषयाकडे वळत चालले आहे ही खरोखरच फार समाधानाची गोष्ट होय. अभ्यासाच्या एका महत्त्वाच्या शाखेचा उत्कृष्ट प्रारंभ श्री. नानासाहेब चापेकर यानी भा. इ. सं. मंडळांत केला याबद्दल ते खचित स्तुतीस पात्र आहेत. आणि यामुळेच या ग्रंथाचा पुरस्कार करण्याचें भा. इ. सं. मंडळास अगत्य वाटतें. शिवाय श्री. नानासाहेबाचा भा. इ. सं. मंडळाशीं आज कित्येक वर्षांचा निकट संबंध असल्यामुळे या अगत्यांतहि आपुलकीची भरच पडली आहे.

पुरस्काराची मर्यादा एवढीच असावयाची कीं भा. इ सं. मंडळाच्या दृष्टीने कांही कमीअधिक असल्यास तेवढें सांगावयाचें. ग्रंथाचें समालोचन करणें पुरस्काराच्या क्षेत्रांत येत नाही.

भा. इ. सं. मंडळाने पुरस्कारलेले ग्रंथ शास्त्रशुद्ध असावेत ही अपेक्षा योग्यच आहे. या ग्रंथांत छपाईचीं अशुद्धें वगैरे जे दोष राहून गेले आहेत त्या सर्वांचें समर्पक वर्णन खुद्द ग्रंथकर्त्यांनीच प्रांजलपणें 'हलगर्जीपणा' या शब्दाने केलें असलें तरी या दोषांमुळे ग्रंथाची मौलिक योग्यता नाकारतां येणार नाही.

मोडीचें बाळबोध करतांना वाचण्याच्या व छपाईच्या चुका न व्हाव्या ही काळजी घ्यावी तितकी थोडी. शुद्धिपत्राची जोड देऊनहि कांहीं तसलीं स्थळें अजूनहि या पुस्तकांत राहिलेलीं नजरेस आलीं. उदाहरणार्थ पृ २२१ वर **मेभ्या** आहे तेथे **मेथ्या** पाहिजे. **नौदिगर** हा शब्द **नोहीगर** असा वाचल्यामुळे अबोध्य वाटला (पृ. २८५). **समदेव** हा सकदेव (पृ. १२०) वाचावयास पाहिजे. पृ. २४० वरील 'जेजूल आब**हीज**खा' हें नाव वास्तविक 'जेनुल आब**दीन**खा' असें वाचलें पाहिजे. कुमकोजकर हें अर्थात् कुमकोनकर (पृ. १६२) पाहिजे. मोडी 'न' ज' 'क' 'म' 'द' 'ह' 'ब' 'प' इत्यादि अक्षरें वाचतांना फार घोटाळे होतात. पृ. २३९ वर इंग्रजी शब्द या मथळ्याखाली फक्त 'मास्तर' शब्द तेवढा इंग्रजी शब्द आहे. पुढले शब्द फारसी आहेत, व ते जुन्या ऐतिहासिक पत्रव्यवहारांतून नेहेमी येणारेच आहेत.

असो. या किरकोळ गोष्टी सोडून दिल्या तर पेशवाईच्या या सावलींत मनोरंजक व उपयुक्त अशी विविध प्रकारची कितीतरी साधार माहिती नानासाहेब चापेकरांनी आपल्यासमोर ठेविली आहे. आपल्या विस्तृत प्रस्तावनेंत जरी अनेक बाबींचा परामर्श ग्रंथकारानी घेतला आहे तरी अजून कितीतरी उपयुक्त बाबी या ग्रंथातील टिपणांतून आपणास सापडतील; म्हणून नानासाहेबानी इषारा दिला आहे तो अगदी यथार्थ आहे की पुनः दहा वेळां हीं दप्तरें पाहिलीं तर दर वेळेला आणखी उपयुक्त माहिती अभ्यासकाचे हातीं लागेल यांत शंका नाही.

अजून कितीतरी बाबींचा साधार अभ्यास व्हावयाचा आहे. तो हिशेबी दप्तरें पाहिल्यांवाचून होणार नाही. **व्यापारी, सावकारी, सरकारी, सरदारी** अशीं अनेक प्रकारचीं हिशेबी दप्तरें शोधून अभ्यासली पाहिजेत ! श्री. चापेकर यांनी आपला वेळ, बुद्धि व पैसा या कामीं खर्च करून जो कित्ता घालून दिला आहे तो इतरांनी गिरवून आमच्या ज्ञानांत भर टाकावी अशी इच्छा व्यक्त करतों व अशीं दप्तरें भा. इ. सं. मंडळांत संरक्षणार्थ व अभ्यासार्थ मिळवून द्यावीं अशी प्रार्थना करून हा पुरस्कार पुरा करतों.

कार्तिक शु ८, १८५९.
पुणें.

दत्तो वामन पोतदार
चिटणीस, भा. इ. सं. मंडळ, पुणें.

# प्रस्तावना

## १

"पेशवाईच्या सावलींत" नवीन महत्त्वाची ऐतिहासिक बाब अशी एकहि आढळणार नाही. व्यक्तींच्या चरित्राला आवश्यक अशा बारीक सारीक गोष्टी कदाचित् प्रथमतःच येथे उघडकीस येतील. कित्येक माळांचे गळलेले मणि सापडतील. ह्या पुस्तकाला ऐतिहासिक महत्त्व नसलें तरी सामाजिक, व्यापारी, धार्मिक, भाषिक इतिहास लिहिण्याला "पेशवाईच्या सावलींत" विपुल सामग्री मिळण्यासारखी आहे. मुख्य इतिहासग्रंथांना पोषक होईल असा हा ग्रंथ आहे. शिल्लकबंद जमाखर्ची लिखाणांतून ह्या पुस्तकांतील माहिती घेतलेली असल्यामुळे तिची सत्यता शंभर नंबरी कसाची भरेल ह्यांत मात्र संशय नाही. चिपळूणकरांचें व तुळशीबागकरांचें दप्तर बहुमोल आहे. हीं दप्तरें आणखी दहादां तपासलीं तरी प्रत्येक खेपेस नवीन नवीन माहिती उपलब्ध होईल. पेशवेकालीन घडामोडींचें निरीक्षण करणाऱ्याला ह्या दप्तरांचा अभ्यास फार उपयोगी पडेल. विद्यापीठांच्या पदव्यांकरता प्रबंध लिहिणारांनी हीं दप्तरें पाहिल्याशिवाय राहूं नये.

श्री. भावे याच्या "पेशवेकालीन महाराष्ट्र" ह्या माहितीने भरलेल्या ग्रंथामुळे मला प्रस्तावना लिहिण्याचें काम वस्तुतः उरलें नाही. हा ग्रंथ प्रसिद्ध झाला नसता तर व्यापक प्रस्तावना लिहिण्याची अवश्यकता प्राप्त झाली असती. म्हणून माझ्या पुस्तकापुरतीच प्रस्तावना लिहिण्याचें मर्यादित क्षेत्र मीं आंखून घेतलें आहे. ह्या पुस्तकांत जेवढें आलें आहे तेंच एकत्र करून त्यावरून अनुमानें काढलीं आहेत. प्रस्तावनेपेक्षा उपसंहार हेंच नांव अधिक सार्थ ठरेल. समारोपाचें स्वरूप ह्या प्रस्तावनेला आहे; समारोपाचा उपयोग तोच ह्या प्रस्तावनेचा समजला पाहिजे. तुटक तुटक मण्यांचा हार बनविणें हेंच माझें प्रायः मुख्य काम आहे. विखुरलेले मणि मनांत भरत नाहीत, परंतु त्यांची माळ बनतांच ती गळ्यांत धारण करावीशी वाटते; त्याप्रमाणे नुसत्या जमाखर्ची रकमा वाचण्याने सामान्य वाचकाला फारसा बोध होणार नाही. एवढ्यासाठीं असल्या पुस्तकांना प्रस्तावनेची अवश्यकता भासते. प्रस्तावनेंत सामान्य विधानें करतां येतात, सिद्धांतरूपाने कित्येक गोष्टी मांडतां येतात; त्याचप्रमाणे सिद्ध म्हणून कांहीच सांगतां येत नाही हें तरी वाचकांपुढे मांडतां येतें. खऱ्या संशोधकांना मूळ आधारभूत वचनांचीच जरुरी असते. अनुमानें ते आपण स्वतः काढूं शकतात.

नाण्यांच्या नावांचें लेखन एकाच तऱ्हेचें बुद्धिपुरस्सर ठेवलें नाही. उ. सिक्का, शिक्का दोनहि रीतींनी हा शब्द लिहिलेला आढळेल.

मंडळांत वाचण्यासाठी मीं ज्या नोंदी अगर मजकूर कच्च्या वहींत उतरून घेतला होता तो सर्वच प्रस्तुत पुस्तकात छापला गेला नाही. ह्यास्तव अनुमान-सिद्धीला आवश्यक वाटला तेथे त्या वहींतून अधिक मजकूर प्रस्तावनेंत समाविष्ट केला आहे.

ह्या पुस्तकाचीं अकरा प्रकरणें आहेत. एकंदर मजकुराची फाळणी विषयानुसार केली आहे; तथापि ह्या कामीं हलगर्जीपणा झाला आहे ही गोष्ट कबूल करणें भाग आहे. द्विरुक्तीच्या दोषाचें समर्थन करावयाचें झाल्यास एकच रकम पण अनेक विषयांसंबंधाने तिला महत्त्व येऊं शकतें असें म्हणतां येईल. परंतु अशा रीतीने खरा दोष उडवून मोकळें होणें ह्यांत हटवादीपणाच दिसून येण्यासारखा आहे. खासगीवाल्यांचे कागद वाचून मीं एक स्वतंत्र लेख लिहिलेला मंडळाच्या त्रैमासिकात प्रसिद्धहि झाला होता; परंतु अनवधानाने तो ह्यांत सामील करावयाचा राहिला. ही चुकी प्रस्तावना लिहावयास घेतल्यावर नजरेस आली; त्यामुळे तो "संकीर्ण" ह्या शेवटल्या प्रकरणांत घालावा लागला.

## २

रा. ब. वाड ह्यांच्या पेशव्यांच्या रोजनिशांप्रमाणे "पेशवाईच्या सावलींत" हा आधारग्रंथ आहे. दोनहि ग्रंथांचें स्वरूप एकच; फरक इतकाच की, पहिल्या ग्रंथांत पेशवे व भोसले ह्यांच्या रोजनिशांतील उतारे प्रायः घेतलेले आहेत, तर प्रस्तुत पुस्तकांत पेशव्याचे नोकर व चिपळूणकरांसारखे व्यापारी ह्यांच्या जमाखर्चांतील रकमांचा उपयोग बव्हंशीं केलेला आहे. तुळशीबागवाले, कल्याणचे सुभेदार, खासगीवाले, वैद्य व चिपळूणकर ह्यांचीं दप्तरें तपासून त्यांतील माहितीचा ह्या पुस्तकाकरता उपयोग केला आहे. पैकी, तुळशीबागवाले व चिपळूणकर ह्यांचे कागद भा. इ. सं. मंडळांतच होते. खासगीवाले यांच्याकडील कागद कोल्हापूरचे कै. रा. ब. साठे ह्यांच्यामार्फत मला मिळांले. वैद्य व कल्याणचे सुभेदार ह्यांची माझी ओळख असल्यामुळे मी मागतांच त्यांनी आपलीं दप्तरें माझ्या स्वाधीन केलीं.

तुळशीबागवाल्यांच्या चामड्याच्या पुठ्याच्या शिवलेल्या वह्या आहेत. कीर्दवहीला रोजनामा म्हटलेलें असून त्या सालची दुसरी वही म्हणजे खतावणी

होय. श. १६६७ पासून श. १७३५ पर्यंतचे हे जमाखर्च आहेत. कल्याणच्या सुभेदाराच्याहि शिवलेल्या वह्याच होत्या. श. १६८३ ते १७३८ पर्यंतच्या काळातील मजकूर ह्या वह्यांतून "पेशवाईच्या सावलीत" आला आहे. तथापि प्रत्यक्ष वह्या सत्तावीस वर्षांच्याच मिळाल्या.

वैद्य, खासगीवाले व चिपळूणकर ह्यांचे सुटे बंद होते. हे उभे कागद असतात. चिपळूणकरांचीं एकंदर १०२ पुडकीं भा. इ. सं. मंडळात आहेत. इ. स. १८२७ व १८६२ हीं सालें पहिल्या व शेवटल्या पुडक्यांतील कागदांची असली तरी जुन्या कागदांच्या नकलाहि ह्या पुडक्यातून पुष्कळ आढळतात. प्रत्येक जमाखर्ची कागदावर 'यादी हिशेबाची' असा मथळा आहे. श. १६९० पासून १७४५ पर्यंतचे उतारे खासगीवाल्यांच्या आणि श. १७१३ ते १७३५ पर्यंतचे उतारे वैद्यांच्या कागदांतून आलेले आढळतील. खासगीवाले, सुभेदार व वैद्य ह्यांचे कागद आता माझ्यासमोर नाहीत; ते ज्यांचे त्यास परत दिले आहेत. साराश, इ. स. १७४५ पासून १८६२ सालापर्यंत म्हणजे जवळ जवळ सवाशे वर्षांच्या कालांतील माहिती वाचकाना ह्या पुस्तकात वाचावयास मिळेल. बाळाजी बाजीरावापासून तों तहत १८५७ चें युद्ध होऊन पेशवाई नेस्तनाबूद होईपर्यंतचा सवाशें वर्षांचा महाराष्ट्राचा सामाजिक, धार्मिक व सास्कृतिक इतिहास प्रस्तुत ग्रंथात विखुरलेला आहे. तुळशीबागवाले व चिपळूणकर ह्याच्या दप्तरांतील उताऱ्यांची संख्या इतरांपेक्षा अधिक भरेल. ह्यांच्यानंतर खासगीवाले, कल्याणचे सुभेदार व वैद्य असा अनुक्रम लागेल.

नाविक शब्दाचा कोश मीं स्वतंत्रपणें तयार करून मंडळांत वाचला होता, तो भाषिक प्रकरणांत घातला आहे.

आजवर भा. इ. सं. मंडळाच्या संमेलनप्रसंगीं किंवा पाक्षिक सभांत वाचलेल्या टांचणांचा येथे संग्रह केला आहे. कागद वाचतांना किवा मंडळांत टांचणें वाचलीं तेव्हाहि तीं पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्याची कल्पना मनांत नव्हती. आरंभापासून अशी कल्पना असती तर काम अधिक व्यवस्थित झालें असतें.

३

नारो आप्पाजी तुळशीबागवाले हा पेशवाईतील एक प्रसिद्ध व नेकीचा पुरुष होता. तो पुणें प्राताचा सरसुभेदार होता. जमाखर्चाच्या वह्यांवरून श. १६६७ च्या पूर्वीच हा हुद्दा त्याच्याकडे आला होता असें दिसतें. ६८ वर्षे तरी निदान ह्या

घराण्याकडे पुणें प्रांताची सरसुभेदारी असावी. [१]नारो आप्पाजी सरसुभा असतांनाच जनार्दन आप्पाजी हा सरकारी कामगार होता असें दिसतें. कारण श. १६६८ सालीं ६९ रु. जनार्दन आप्पाजीचा मुशाहिरा म्हणून जमाखर्चीत रकम पडली आहे ( २४ )[२]. तुळशीबागकरांचें सालीना उत्पन्न १०००० रुपयांहून अधिक असावें ( २४,२५ ). मुलाच्या लग्नाला ११००० रु. खर्चिले ह्यावरून त्यांच्या श्रीमंतीची अटकळ करतां येण्यासारखी आहे. श.१६९६ च्या फाल्गुन महिन्यांत ३१५२११· रु. धर्मादायखातीं खर्च पडले आहेत. त्यांत २०८५६।।।– रु. उत्तरकार्यानिमित्त आहेत. हें उत्तरकार्य नारो आप्पाजीचेंच असावें.

परंतु श. १७२३ सालीं ह्याच तुळशीबागवाल्यांची अत्यंत शोचनीय स्थिति झाली. पागा गहाण टाकून ४०० रु. कर्ज काढावें लागलें. हें कर्ज देतांना सदाशिवपंत काळ्यांनी शेंकडा तीनप्रमाणे बारा रुपये मनोतीचे कापून घेतले. दाभाडी पाटण्याची कमाविसी केली होती, तिची रकम भरण्याचे तगादे सरकारांतून होऊं लागले. तगाद्यास कारकून व प्यादे आले त्याचा रोज रु. ३ भरण्याचा प्रसंग आला.

कल्याणच्या सुभेदारांची माहिती आतापर्यंत फारशी कोठे आलेली नाही. रियासतींतहि नाही. त्यांची बरीचशी माहिती ह्या पुस्तकांतील पृष्ठें २९,५१,५७, ५८,८४,१०९,१६९,१७० वर आलेली आहे. ती संकलित करून येथे देतों.

रामाजी महादेव बिवलकर हा पहिला सुभेदार. ह्याने देवळें विहिरी हीं बरींच बांधलीं. लोहगडनजीक डोंगरगांव येथील विहिरीवर खालील लेख आहे. "रामाजी महादेव बिवलकर श. १६८८ व्ययनाम संवत्सरे चैत्र अधिक प्रा."[३] श. १६८१ च्या पूर्वी १२ वर्षांपासून रामाजी महादेव सुभेदार होता (५७). चार पिढ्या ह्या घराण्यांत सुभेदारी चालली. वंशावळ येणेंप्रमाणे :—

---

१ तुळशीबागकरांची माहिती रियासत म. वि. ४ पृ. २८० वर आहे. तेथे जनार्दन आप्पाजी हा नारो आप्पाजीचा भाऊ असें म्हटलें आहे. परंतु तें चूक असून तो भाचा होता असें रा. ब. गो. स. सरदेसाई यांनी समक्ष भेटीत सांगितलें. ह्याचें आडनांव एरंडे. हा वाईचा राहणारा.

२ आदले सालीहि मुशाहिरा जनार्दन आप्पाजीचा जमा आहे.

३ ही माहिती श्री. शंकरराव जोशी यांजकडून मिळाली.

रामाजी महादेव
|
आनंदराव राम
|
रामराव अनत
|
आनंदराव राम

रामाजी महादेव श. १६९४ च्या श्रावण महिन्यांत पुणें मुक्कामीं वारला व त्याची बायको श. १६९७ च्या आश्विनांत वारली. रामाजीच्या व त्याच्या बायकोच्या वर्षश्राद्धास अनुक्रमें २०७७ व १५९८ रु. खर्च केला. आनंदराव राम श. १७०५ च्या मार्गशीर्षांत (शु ६ सोमवार) निवर्तला. आनंदरावाची बायको गोपिकाबाई १७११ त मरण पावली ( २२ ). आनंदरावाला औरस पुत्र नसल्यामुळे त्याने सिन्नरचा बाळाजी आपदेव सोमण ह्याचा मुलगा दत्तक घेतला. त्याचेंच नाव रामराव ठेविलें असावें. दत्तविधान श. १७०७ च्या चैत्रांत झालें. दत्तकाची परवानगी मिळविण्यास रामरावास सुमारे ३०,००० रु. नजर द्यावी लागली. ह्यात २०,००० रु. श्रीमंत राजश्री पंत प्रधान ह्यांस द्यावे लागले. नाना फडणविसास ४०००रु. मिळाले. पहिल्या आनंदरावाची[1] मुंज श. १६८७ मध्ये ठाणे येथे झाली. ५४७।-॥ रु. खर्च केला.

पुढे दोन वर्षांनी त्याचें लग्न झालें. पुण्याचे गंगाधरपंत गोळे यांची मुलगी. सुवर्णदुर्ग, करनाळा, नेरळ, कल्याण व साष्टी इतक्या तालुक्याची मामलत अथवा सुभेदारी बिवलकरांकडे होती. रामाजी महादेवाचें वेतन सालीना १५०० रु. असून पालखीकरिता २५० रु. निराळे मिळत. पुण्यास पुलानजीक बिवलकरांचा वाडा होता. रामाजी महादेव प्रथम ठाण्यास राहत असे. ह्या वाड्यांत साप्रत सरकारी कोर्ट आहे. कल्याणच्या वाड्याचें काम श. १६९१ त पुरें झालें. मुहूर्त-मेढ श. १६८८ च्या फाल्गुनात रोवली होती. हा वाडा रामाजी महादेवाच्या वंशजाकडेच आहे. ह्या वाड्याच्या जागी तोफच्याचीं घरें होती ती खरेदी घेऊन वाडा बाधला. "१२३० रु.[2] खाजगी खर्चखातें देणें इमारत वाडा कल्याण

---

१ अनंत व आनंद एकच.

२ १२३० रु. ची रकम पुस्तकांत छापली नाही. जमाखर्चाच्या वह्यांवरून केलेल्या टाचणांतून वरील मजकूर घेतला आहे.

खरेदी जागा घराचे पिछवाड्यास तोफच्यांची घरें होतीं सुमार सात होतीं त्याचें सामान सरंजाम ज्याचें त्यास देऊन जाग्याची किंमत चौघाचे गुजारतीने व त्याचे तोफच्यांचे कारभारी पाटील व तुपे असे रुजवातीने झाले तेच मान्य करून... ......वाटणी केली" (श. १६८८ मार्गशीर्ष). ह्याशिवाय मल्हारशेट सोनार ह्याचें घर १८०० रुपयास खरेदी केलें. टाण्याच्या वाड्यांत प्रथम प्रवेश करताना होणारा धर्मादाय खर्च सरकारातून मिळेल अशी अपेक्षा होती परंतु ती निष्फळ झाली:—१७। रु. धर्मादाय खुद रावजी पुण्याहून मुहूर्ते करून वाड्यात आले. गणपतीपूजन व पुण्याहवाचनास खर्च पोताकडून आला तो सरकारांत मजुरा न ये सबब. आनंदराव राम रामाजी महादेव मेल्यानंतर प्रथम सुभेदार म्हणून ठाण्याच्या वाड्यांत राहावयास आला तेव्हाची ही हकीकत आहे. रामराव अनंत श. १७१८ त मरण पावला.

साष्टी सुभ्याचें वेतन पान ४९ वर दिलें आहे. तें श. १६९४ सालचें आहे. श. १६९१ चें वेतन थोडें निराळें आहे तें असें:—

४२१९॥= बा। मु॥ ता। सरकार साष्टीपैकी बा। हिसेब साष्टी मा। सदाशिव राम दामले

| | |
|---|---|
| १७२८॥ | खुद वेतन |
| २२५० | राऊत सिलेदार आ। १५ दर १५० प्रो. |
| १० | पोरगा दिवट्या |
| २३१८= | सबनिशी कोट ठाणें |

वेतन हें गांवाच्या महसुलावर असावें. कल्याणच्या सुभेदारांच्या वहींत श. १६९३ श्रावण महिन्यात एका रकमेचा तपशील पडला आहे तो असा:—

१८५८ रु. जमा बा। मु॥ खुद वेतन व सिलेदार सालमजकूरपैकी जमा.

१४८३ खुद वेतन

| | |
|---|---|
| १५० | ता। ठाणें |
| २०० | ता। मालाड |
| ५३३ | मौजे वेसावें |
| ५०० | ... ... |
| १०० | ता। मरोळ |
| १४८३ | |
| ३७५ | दि॥ सिलेदार |
| १८५८ | |

[1] बिवलकरांचें गोत्र काश्यप आणि सूत्र आश्वलायन ( ६३ ). ह्यांस नांदिवडें, दिविल, चिरनेर, भोम हे गांव इनाम होते; व वंगणीचा मोकासा होता; आणि वडगांवाची खोती होती. इनामगांवांचें उत्पन्न कसें असे हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल.

जमा

रु. ६२१॥।॥। इनामगांव मौजे दिविल ता। बीरवाडी.

१२३॥ ऐन नक्त

१३॥। ऐन दस्त

१। उक्ता

१०॥ मोहतर्फा

१॥ सोनार

१॥ वाणी

१ चांभार

१ परीट

१ हजाम

३॥ कुंभार

१ सुतार

१०॥

२ ...... नि। महार

१३॥।

१०१।-॥ खेरीज दस्त

९६८=॥। गलेपटी गला ३२८१८१॥

दर खंडीस ३

३ राबते नि॥ महार सालीना

२८≡ पेंढे वसुली ४३५ दर रु। २००

कल्याणास तोफेचे गोळे करण्याचा कारखाना असावा. जगन्नाथ नागेश हा ह्या कारखान्यावरील अधिकारी होता. लवळू रायभान, काळू किसन, अमरसिंग हीं तोफचींचीं नांवें जमाखर्चांत आलीं आहेत. पीतांबरदास जीवनदास ही

---

१ कल्याणच्या सुभेदारांची माहिती भा. इ. सं. मंडळाच्या त्रैमासिकांत आली आहे (वर्ष ८ अंक १।२ पान ४२).

गुजराथी पेढी कल्याणास प्रसिद्ध होती. वज्रेश्वरीला लोखंड निघत असे. पेशवे तेथे गेले असतां लोखंडाची खरेदी त्यांनी केली आहे. कल्याणास पारशांची वसती स. १६९० च्या अगोदरपासून आहे. मेरवजी पारशी, जमशेट अंधारू, बरजोर पारशी हीं नांवें आलेलीं आहेत. बरजोर हा दुधाचा धंदा करी. जमशेट याला १०० रु. सालीना वेतन होतें. कशाबद्दल तें समजण्यास मार्ग नाही. सुताराची मजुरी त्या काळीं दररोज चार आणे आणि गड्याचा पगार महिन्याचा एक रुपया होता. तथापि श्रीमंती होती. व्यतिपाताला मोतीं दान केलेलीं आहेत. भाताचा भाव १६ ते २६ रुपयांपर्यंत होता. बंगालवेल ही एक तांदुळाची जात होती. वनमाळी थो(छो?)बनदास हा कल्याण सुभ्याचा पुण्याचा सावकार होता. अनेक प्रकारचीं नाणीं व्यवहारात चालत; उ. वसई पोतेचाल, इटाव, दौलताबादी, तळेगांवी, अर्काटगंजी, बागलकोटी, बेलापुरी, कल्याणचाल, वसईचाल, जरीपटका, पुणें चलनी छापी, मीठे कल्याणचाल, सरकार चलनी, पुणें चलनी चांदवड, पुणें शिक्का, चिंचवड, कल्याणशिक्का, सुरती, इंग्रजी, वाई सिक्का, फलम फिरंगी वगैरे. ह्या चलनातील भेद समजण्यासारखा नाही. इंग्रजी नाणें वापरीतच; परंतु इंग्रजी तोळ्याचें वजनहि व्यवहारांत शिरलें होतें. व्यक्तींचीं नांवें आलीं आहेत तीं:—श्रीधर नारायण बिलवलकर, नागोजी रूपनवार, बापूजी बल्लाळ, बाजी गंगाधर मेहेंदळे, मोरो गोविंद जोशी बोरगांवकर, कृष्णाजी विनायक किरकिरे, वासुदेव व राघो बल्लाळ बोडस, लक्ष्मण जोशी बोरगांवकर, गंगाधर महादेव साठे, जयराम जोशी मुरूडकर, नारो कृष्ण वोक, रामाजी परशराम वझे, श्रीधर नारायण, त्रिंबक विनायक सुभेदार, नारो त्रिंबक राजमाचीकर, गणपतराव विष्णु गद्रे, आप्पाजी केशव बिवलकर, गोपाळ नारायण हशमनीस.

ह्याप्रमाणे कल्याण व कल्याणचे सुभेदार ह्यांची पुस्तकांत आहे त्यापेक्षा अधिक माहिती दिली आहे.

खासगीवाल्यांची माहिती सरदेसाई यांनी दिलीच आहे. खासगीवाले शाक्त असावे; कारण ५६। रु. खर्च करून त्यांनी यंत्रप्रतिष्ठा केल्याचा दाखला मिळतो (३०७).

वांईच्या वैद्यांचें घराणें इतिहासप्रसिद्ध आहे. ह्यांचा पूर्वज बाबूराव नारायण वैद्य नागपूरकर भोसल्यांच्या दरबारीं वकील होता.

चिपळूणकर हे फार मोठे सावकार होते. ह्यांचें घर बुधवारांत भाजी-आळींत होतें. होळकर, जमखिंडीकर, सांगलीकर, भोरकर, अक्कलकोटकर, राम-

दुर्गकर वगैरे सर्व संस्थानिकांस हे कर्जाऊ रकमा देत असत. दाजी गंगाधर ह्यांच्या नांवाने बहुतेक जमाखर्च आहेत. ह्यावरून हाच कुटुंबाचा पुढारी होता असें दिसतें. तो श. १७५१ वैशाख शु. ७ रविवारीं वारला. त्याच्या बायकोचें नांव रमाबाई. दाजीचे वडील भिक्षूक असावे, कारण गंगाधर भट ह्या नांवाने ते ओळखले जात. श. १७५२ सालची कीर्द गंगाधर भटांच्या नांवाने आहे. तो निराळा राहत असावा. कारण त्याचा अन्नखर्च निराळा पडला आहे (श. १७४७). दाजी गंगाधराला बापूजी गंगाधर नांवाचा भाऊ होता असें वाटतें ( १८४ ). गंगाधरशास्त्र्यास पंढरपूर येथे देवदर्शनास येण्याविषयी त्रिंबकजी डेंगळ्याने बोलावणें पाठविलें त्या वेळीं बापूजी गंगाधरशास्त्र्यांच्या घरीं त्यांच्याजवळ बोलत बसला होता ( १८ ). वासुदेव बापूजी (१२४ व २१७) हा बापूजी गंगाधराचा मुलगा असावा. परंतु पुढे हा मागे पडून कृष्णाजी हरि, रघुनाथ हरि, शिवराम हरि, केशव हरि व अनंत हरि हे पुढे आले. हे पाच भाऊ दाजी गंगाधराचे पुतणे असतील. किंवा दाजीचें नांव हरि असेल. शिवराम हरि श. १७५९ सालीं विभक्त झाला. कृष्णाजी हरि हा सर्वांत मोठा. तो विभक्त झाल्यावर नारायण पेठेंत राहत असे (११५). त्याच्या बायकोचें नांव भागिर्थीबाई. रघुनाथ हरि बुधवारांत जुन्या वाड्यांत राही (११८). कृष्णाजी हरि व रघुनाथ हरि हे मोठे लौकिकवान[1] पुरूष होते. दाजीबाप्रमाणे ह्यांचें वजन सरकारदरबारीं फार असे. नारो दिनकर म्हणून एक ह्यांचा जवळचा आप्त होता. तो सिन्नरास राहत असे. त्याचा उल्लेख पानें १३०, १४०, १४५, २०३, २०४ वर आला आहे. पुण्याचे ढमढेरे व गुळसुंद्याचे नित्सुरे ह्यांच्याकडे चिपळूणकरांच्या मुली दिल्या होत्या. चिपळूणकरांचें व कल्याणच्या मेघःश्यामांचें नातें होतें. चिपळूणकरांची लाखों रुपयांची सावकारी होती. पुण्यांतल्या बड्या लोकांत यांची गणना

---

१ रघुनाथ हरीची बायको धोंडूबाई ही वांईच्या मराठ्यांची मुलगी असावी. ह्यांचा जावई दादा बर्वे डुबेरकर ह्याला मथूबाई ही मुलगी दिली होती (लग्न श. १७७४). रघुनाथ हरीला अनु व दादा असे दोन मुलगे होते. पैकीं दादा दुर्व्यसनी होता. ह्याला नाशीकचे कृष्णाजी कचेश्वर ओक ह्याची मुलगी दिली होती. अनंतराव हरीचें लग्न श. १७६० त झालें. त्याच्या नंतर श. १७६२ च्या आषाढांत केशवराव हरीचें लग्न झालें. लक्ष्मण दीक्षित (पुणें) याची मुलगी केली. ह्याच्या अगोदर ( श.१७५८ ज्येष्ठ शु ९) अनुसाहेबाचें लग्न तासगांवच्या जोगाच्या मुलीबरोबर झालें होतें. चिपळूणकरांची एक मुलगी बया हिचें लग्न श. १७५७ फाल्गून शु ८ स झालें.

होत असे. त्यांचा मासिक घरखर्च १००० ते १५०० रुपयांपर्यंत असे (२७७).

चिपळूणकरांचा आश्रय पुष्कळ शास्त्री, पंडित, वैदिक वगैरे लोकांस असे. त्यामुळे हे लोक त्यांची वारंवार प्रशंसा करीत. एका बाबजीशास्त्र्याने पाठविलेल्या पत्रांत पुढील श्लोक आढळले:

अश्विनी भवतु भूपमंदिरे
मंदिरे वसतु ते पुनर्वसु।
कृत्तिकापति कनिकनिष्ठसेवया
रोहिणीतनयविक्रमो भवेत् ॥
लक्ष्मीस्ते पंकजाक्षि निवसतु भवने भारती कंठदेशे
वर्धताम् बन्धुवर्गाः प्रबलरिपुगणा यांतु पातालमूलम्।
देशे देशे च कीर्तिः प्रभवतु भवता कुंदपूर्णेन्दुशुभ्राम्
जीव च पुत्रपौत्रैः सकलगुणयुतैः स्वस्ति ते नित्यमास्ताम् ॥

चिपळूणकरांची स्तुति अन्य कारणाकरताहि केली आहे:—

"पूर्वी श्रीजोगेश्वरीजवळचे रस्त्याचा वाद जोगांसी पडला ते समयीं तुम्ही जोगास वादांत जिंकिले तो अशाचा लौकिक आजपर्यंत पुण्यांत गाजत आहे काकी धर्माची जागा श्रीजोगेश्वरीस दातार याणी दिल्ही तेव्हा जोगेश्वरी म्हणजे सर्वाची मातोश्री असें असता ब्राह्मणांनी लोभ धरिला असेंहि असता तुम्ही लोभावर दृष्टि न ठेवता............"

## ४

## राज्यविभाग

राज्यकारभाराच्या सोयीकरता राज्याचे विभाग पाडावे लागतात. अशा प्रत्येक विभागावर अधिकारी नेमलेला असतो. हे विभाग लहान मोठ्या पातेल्यांच्या संचाप्रमाणे असतात. ह्या विभागांतील अखेरचा घटक म्हणजे मजरें, मौजे व कसबा. मजरें म्हणजे अगदी लहान गांव. मौजे व मजरें ह्यांत कोणत्या कारणाने भेद करीत असत ह्याचा खुलासा अद्यापि कोणीं केलेला नाही. गावाचा वाढलेला भाग, ज्याला रत्नागिरी जिल्ह्यांत कोंड, वाडा, बाग हे शब्द लावतात, त्यालाच मजरें म्हणतात अशी कित्येकांची समजूत आहे. परंतु मजरें हें स्वतंत्र गणलें जात असे. प्रत्येक महालांत देहें म्हणजे गांव यांची संख्या देतांना अमुक कसबे, अमुक मौजे व अमुक मजरीं असें लिहिण्याची वहिवाट होती. कोणत्या

गांवाला कसब्याचा गांव म्हणावयाचें हेंहि आपणांस सांगतां येत नाही. परंतु परंपरेने हें ठरलेलें असे. महालाचा गांव तोच कसब्याचा हें म्हणणें निराधार आहे ह्यांत संशय नाही. कसबी अथवां कारु लोक जेथे राहतात तो गांव ही व्याख्या कदाचित् बरोबर असेल[१].

कसबा, मौजे व मजरें मिळून महाल बनविला जाई. महाल, तरफ, तर्पे व कर्यात हे निरनिराळ्या वेळीं एकाच अर्थानें वापरलेले शब्द होत. अनेक तरफ मिळून मामला, परगणा, तालुका ह्या नांवाचा विभाग होई. सुभा, प्रांत, सरकार हा सर्वांत मोटा विभाग असावा. मौजे "उसाटणें तर्फ तलोजें प्रांत कल्याण" मौजे नांदिवडें तर्फ सैतवडें प्रांत राजापूर" (६१) ह्यांत प्रांत, तरफ व मौजा अशी उतरती विभागणी केलेली आहे. दुसऱ्या ठिकाणीं (६६) मौजें नांदिवडे तर्फ सैतवडें तालुके रत्नागिरी, असें वर्णन आहे. त्याचप्रमाणे तरफ लावल्यानंतर तालुका किंवा प्रांत दोहोपैकी एक लावण्याची पद्धति असावी. तथापि तालुका व प्रांत दोनहि लावलेलीं आढळतात. उ. कसबें "बदलापूर तर्फ चोण तालुके राजमाची प्रांत कल्याण" चोणला तर्फ व तर्पे जवळ जवळ एकाच काळीं लावलेले शब्द आहेत. ह्यावरून तर्पे व तरफ एकच ह्यांत संशय राहत नाहीं[२]. तालुका व मामला हे शब्द एकार्थी नव्हत हें "मामले हमजाबाद तालुके अंजनवेल" (२८४) ह्या वर्णानावरून उघड होतें. मामला तालुक्याहून लहान असावा. तर्फ आणि मामला एकच कीं काय असा संशय येतो. परंतु मौजे मेढें तर्फ हवेली मामलें तळें व मौजे रेवाळी तर्फ अष्टमी मामले अवचितगड (पे. रो.७।१०५;४७) ह्या निर्देशावरून तो संशय टिकत नाही. "महालथळ ताा अष्टागीर सुभा प्रां चेऊल" (५६) ह्या वर्णनावरून प्रात व सुभा एकच असावा. थळगांव महालाचा असल्यामुळे महालथळ म्हटलें आहे; मौजे थळ म्हटलें नाही. अष्टागर हें तालुक्याचें नांव असावें.

नुसत्या गांवाचा निर्देश करीत नसत. जवळचा गांव असल्यास तरफ लावीत; दूरचा असल्यास परगणा, प्रांत किंवा तालुका लावीत असें वाटतें.

कसब्याचा गांव असल्यास कसबें अमुक म्हणून लिहीत. आणि तोच परगणा असेल तर कसबे......परगणे मजकूर असें लिहीत.

---

१ बारा गांवांची हद्द ज्या गांवाला लागली आहे तो कसब्याचा गांव असें लोकहितवादी म्हणतात.

२ बदलापूर ३५१ ते ५३.

संमत आणि तर्फ ह्यांत फरक नाही. एकाच काळीं संमत हवेली व तर्फ हवेली असें लिहिलेलें आढळतें. तथापि तर्फापेक्षा संमत फारच कमी वापरलेला आढळतो. त्याचप्रमाणे सरकार व प्रांत ह्यांत भेद नाही. सरकार जुन्नर किंवा प्रांत जुन्नर असें दोन्ही तऱ्हेने लिहीत असत. परंतु सरकार आशेर प्रांत खानदेश[१] हें वर्णन संशय उत्पन्न करतें. तसेंच कसबे दहिवलें परगणे मजकूर सरकार बागलाण प्रांत खानदेश[२] ह्या आणखी दुसऱ्या उल्लेखावरून सरकार व प्रांत एकच नाहीत एवढेंच नव्हे तर सरकारहून प्रांत मोठा असें म्हणण्याकडे प्रवृत्ति होते. प्रांत परगण्याहून मोठा ह्यांत शंकाच नाही. परगणा म्हणजे तालुका. कोकणांत तालुका शब्द विशेष प्रचारांत होता. इतरत्र परगणा ह्या शब्दाचा विशेष वापर असे, असें अनुमान करण्यास जागा आहे. बाकी कल्याण प्रांतांत गोरठ व नसरापूर हे परगणे होतेच. हवेलीच्या मागे तरफ किंवा संमत लावीत त्याप्रमाणे तालुकाहि लावीत. ह्यावरून असें दिसतें की, हवेली हें तर्फ असून शिवाय तालुक्याचेंहि ठिकाण होतें. परगणा हा तालुक्यासारखा असावा हें "कर्यात भालवणी परगणे माण"[३] अशा शब्दयोजनेवरून स्पष्ट दिसतें. तसेंच "तर्फ अंतूर परगणे धारूर"[४] "मौजे ब्राह्मणी तर्फ राहुरी परगणे संगमनेर"[५] ह्यावरून परगणा तर्फपेक्षा मोठा असला पाहिजे हें उघड होतें. परगण्याचा पोटविभाग तर्फ ह्याविषयीचा स्पष्ट निर्देश पे. रोजनिशींत (४-१६१, १७१) मध्ये आहे. उ. "परगणे सांकसपैकी तर्फा." "मौजे वाडें तर्फ खारेपाटण तालुके विजयदुर्ग" अशा निर्देशावरून परगणा व तालुका ह्यांची समव्याप्ति असावी असें अनुमान करतां येतें. परंतु तर्फ अमदाबादपैकी महाल ह्या सदराखाली परगणे पालनपूर, परगणे धामणे, परगणे बडासिनोर व परगणे वीरपूर ह्यांचा अंतर्भाव केलेला आढळतो[६].

"नरसिंगराव बल्लाळ मांडोगणे यास परगणे संगमनेरपैकी तर्फा

१ तालुके देवपूर     १ तालुके कावदले"

ह्यात तालुक्याला तर्फ म्हटलें आहे. देवपूर व कावदले हे पूर्वी तालुके असतील. ते संगमनेर परगणा केल्याकारणाने तर्फ केले असावे किंवा तर्फ शब्द विभाग ह्या मोघम अर्थी समजला पाहिजे. असें असल्यास परगण्याहून तालुका लहान असें मानणें भाग आहे.

---

१ पे. रो. ७-१८३. २ ६-२४८. ३ शि. सारसंग्रह खंड ३ पृ. १०३. ४ ९-२१३. ५ ८-९२. ६ ६-३२.

कल्याण प्रांतांत नसरापूर हा परगणा म्हणून गणला जाई असें वर सांगितलें. परंतु श.१६८८ च्या एका पेशव्यांकडून आलेल्या हुकमांत तर्फ नसरापूर असें लिहिलेलें आढळतें. उ. कसबे कोंढिवें तर्फ नसरापूर[1]. पे. रो. पु. ९ पान २०० वर परगण्यांची यादी आहे. त्यांत फक्त मानुरला तर्फ म्हणून संबोधिलें आहे. ह्यावरून तर्फ कोणता व परगणा कोणता हें निश्चित झालें असावें. तर्फ मानूरचें उत्पन्नहि परगण्यांच्या उत्पन्नाच्या बरोबरीने आहे. ह्यावरून तर्फची सीमा लहान होती असें वाटत नाही. महाल म्हणजे तर्फ हें जरी खरें असलें तरी महाल शब्द सामान्यार्थी वापरीत. अमुक प्रातात अमुक महाल आहेत असें म्हटलें असतां त्यात तर्फ, परगणे, तालुके ह्याचाहि समावेश केला जातो. पे. रो. पु. ८ पानें २२९, २३० ह्यांवर गंगथडी प्रांतांतील महालाची यादी दिली आहे. त्यात तर्फ, तालुका व परगणा ह्या तिहींचाहि निर्देश केला आहे. ह्यावरून ह्या संज्ञा ठरलेल्या होत्या असें दिसतें. तथापि हें विधान निरपवाद नाही. प्रांत शब्द महालासारखा मोघम अर्थाने वापरीत असें दिसतें. उ. प्रात कोकणमधील महालांची यादी देतांना प्रांत बेलापूर, प्रात कल्याण-भिवंडी ह्या वर्णनाने ह्या दोन महालांचा उल्लेख केला आहे[2]. एका कोकण प्रातात वसई, कल्याण भिवंडी, बेलापूर वगैरे अनेक प्रातांचा समावेश होतो. येथे प्रांत शब्द तालुकावाचक आहे ह्यांत संशय नाही. वसई व कल्याण भिवंडी यांना तालुका ही संज्ञा लावलेली अनेक वेळां आढळते[3]. ह्याच्या अधिकाऱ्यांना सुभेदार असेंच म्हणत. सरसुभेदार ही पदवी फक्त कोकण प्रांताच्या अधिकाऱ्याची होती. आरमार व जकात ह्यांचे विभाग निराळेच केलेले होते. वारंवार युद्धाचे प्रसंग येत गेल्यामुळे स्वराज्याचा मुलुख कमीजास्त होई त्यामुळे विभागांचा निश्चितपणा टिकणें शक्य नव्हतें.

कदाचित् वतमी व मुलकी नांवें निरनिराळीं असावीं. तर्फ, संमत व परगणा हीं वतनी आणि तालुका, सरकार, जिल्हा हीं मुलकीं नांवें असा भेद एक वेळ करीत. वतनी विभाग वेगळा व मुलकी म्हणजे सरकारी विभाग वेगळा. ह्या संज्ञांत पुढे सरमिसळ झालीच.

गांवावर मुख्य अधिकारी मोकदम असे. तरफेच्या अधिकाऱ्याला हवालदार म्हणत. तालुक्याच्या अंमलदारास मामलेदार अथवा सुभेदार ही संज्ञा होती. ह्यांच्यावरील अधिकाऱ्याला सरसुभा म्हणत. कमावीसदार हा सामान्य शब्द आहे.

१ पे. रो. ९-३०१. २ पे. रो. ६-४५. ३ पे. रो. ४-३.

कमावीसदार म्हणजे मामलेदार किंवा सुभदार. परगण्याच्या अंमलदाराला सुभेदार व कमावीसदार म्हणत असल्याचें दिसतें[1]. तर्फच्या अधिकाऱ्यांना सामान्यतः महालकरी म्हणत असावे असे एका नेरळच्या ताळेबंदावरून दिसतें. तर्फ आणि महाल एकच असल्यामुळे ह्या अधिकाऱ्यांना महालकरी म्हणणें स्वाभाविक आहे. एक गोष्ट निश्चित की, सरसुभेदार हा प्रांताचाच अधिकारी असे. प्रांत बदलत परंतु हुद्दे बदलले नाहीत. एका वेळीं वसई, कल्याण, भिवंडी, बेलापूर हे प्रांत असावेत. पुढे असे अनेक प्रांत मिळून एक कोकण प्रांत बनविला; तरी पण ह्या तालुकेवजा झालेल्या प्रांतांना पुढे प्रांत म्हणून संबोधण्याचें चालू राहिलें. प्रांताचे वाटेल तसे विभाग पाडून कमाविसी देण्यास सुरवात झाली. तालुक्याच्या गटाला मामलेदार हा एकच अधिकारी असला पाहिजे हा निर्बंध राहिला नाही. एक गाव, अर्धे गाव, पेट ह्यांच्यावर स्वतंत्र अधिकारी अगर वहिवाटदार नेमण्यांत येऊं लागला. कित्येक वेळा कांही बाबतींपुरतीच कमावीस देण्यात येत असे. त्या कारणाने विभागांचा कायमपणा मोडला. नेरळ तालुक्याच्या अंमलदाराकडे पेठ नेरळ फक्त देऊन कल्याण व भिवंडी प्रांतांतील सहा महाल देण्यांत आले होते. असे प्रसंग हम्मेश घडत गेल्यामुळे सुभेदार शब्द मागे पडून कमावीसदार हा शब्द पुढे आला. ह्याच कारणाने सरसुभा बनला गेला असावा. पूर्वीचे परगणे अथवा मामले अशाच रीतीने मोडले, तथापि त्या त्या गांवाच्या पाठीमागचें उपपद परगणा अथवा मामला त्या त्या गांवाला कायमचें चिकटलें गेलें. उदाहरणार्थ नसरापूर परगण्याला जबाबदार अंमलदार नसतांहि परगणे नसरापूर असें लिहिण्याचा परिपाठ पडला; तसेंच कोहजचा निर्देश करावयाचा प्रसंग आला तेथे तेथे मामले कोहज असेंच लिहिलेलें आढळतें.

तर्फ कर्यात मावळ[2] ह्या शब्दप्रयोगावरून पूर्वीचें कर्यात मावळ मागून तर्फ मावळ झालें तरी त्याच्या पाठीमागचें कर्यात कायम राहिलें. सर हवालदार म्हणून एक अधिकारी असे. ह्याची नेमणूक तालुक्याला असून जमाबंदी करणें व न्यायाधिशाला मदत करणें हीं त्याचीं कामें होतीं[3]. कोणतीं कामें कोणाच्या मार्फत पाठवावयाचीं, कोणीं कोणतीं कामें स्वतंत्रपणें करावयाचीं ह्याचे नियम होते. पाटलासारख्या वतनदाराला शाश्वत अधिकारी म्हणत. मामलेदार-कमावीसदार हा अशाश्वत अधिकारी होय.

---

१ पे. रो. ८-२२४; २३०.

२ पे. रो. ४-१७५. ३ पे. रो. ८-१७, १८.

५

मोठ्या अंमलदारांचे पगार वर्षावर असत. कामगारांचे पगार महिन्यावर व रोजावर ठरवीत. तथापि कांही लोकांचा पगार दीडमाही ठरलेला असे (५४).

**पगार**

ही दीडमाही पगाराची कल्पना कोठून उगम पावली समजत नाही. दीडमाहिच्या हिशेबाने वर्षाचे आठ रोजमरे होतात. ह्यामुळेच दुसरा रोजमरा, आठवा रोजमरा ही भाषा प्रचारात आली असावी (५४,५५). ह्याशिवाय पगाराची रक्कम दुमाही ठरलेली असे असेंहि आढळतें[१]. सणाच्या दिवशीं पगार वांटण्याची चाल होती असें दिसतें; कारण दीपवाळीचे वाटणीबद्दल, अक्षय्य तृतीयेच्या वांटणीबद्दल, नागपंचमीच्या वांटणीबद्दल असे निर्देश आढळतात (५४,५५). 'सहामाही वांटणीस' ह्या सदराखालीहि कित्येक रकमा नावें पडल्या आहेत (५४). बारा महिने काम करून सुद्धा अकरा महिन्याचाच पगार द्यावयाचा अशीहि वहिवाट असावी असा तर्क करण्यास जागा आहे. उदा०

१०४५० रु. कुरण्ये आकरमाही शिरस्ता

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५५०० प्रत असामी | १०० | दरमहा दर असामीस रु.५ प्रमाणे | रु.५०० |
| ४९५० प्रत असामी | ७५ | ............... | ६ ...... | ४५० |
| १०४५० | | (पे. रो. ६-२५८) | | |

बारा महिन्याच्या पगारांतून एक महिन्याचा पगार कापूनहि भागत नसे. एक रुपया कारकुनी म्हणून आणखी कमी करण्यात येई (५६). थोडक्या दिवसांची गोष्ट असल्यास एका दिवसाचा पगार काटण्याचा शिरस्ता होता (६९). येथे १३ दिवसांच्या पगारांतून एक दिवसाचा पगार वजा केला आहे. ह्या पुस्तकांत कोणाला किती पगार असल्याचें नमूद आहे ती माहिती येणेंप्रमाणे—

| | | |
|---|---|---|
| सुभेदार | वार्षिक | १५०० रु. |
| फडनीस | ,, | ३५० ,, |
| पोतनीस | ,, | ३१२ ,, |
| सबनीस | ,, | ३०० ,, |
| गुमास्ता | ,, | २०० ,, |
| कारकून | ,, | १०० ,, |
| ,, | ,, | ७५ ,, |

१. पे. रो. ५-२६.

| | | |
|---|---|---|
| प्यादा | वार्षिक | ५० रु. |
| तोफेवरील कासार | महिना | ३० ,, |
| स्वार | ,, | १५ ,, |
| बारगीर | ,, | ६ ,, |
| सारवान | ,, | ४ ,, |
| ,, | ,, | ३ ,, |
| सामान्य चाकर | ,, | ४ ,, |
| पखाली | ,, | ३½ ,, |
| मोतद्दार | ,, | ३ ,, |
| ,, | ,, | २ ,, |

पुणें प्रांत फडनिसांचा पगार सालीना ३०६॥ रु. असून (५३) एका स्वाराचा पगार दरमाहा रु. १४८– आहे. खासगीवाल्यांनी आपल्या पागेपैकी स्वार दुसऱ्याकडे चाकरीस दिले ते एक आणा अधिक आकारून दिले असावे असें वाटतें (६९). बाहेर स्वारींत जावें लागल्यास मुक्कामाच्या पगारावर भत्ता अधिक देत असत; "१रु. स्वारींत महागाई असते सबब" (२६४).

एकंदर वेतनाच्या रकमेचे कांही आंकडेहि आपणांस ह्या पुस्तकांत पाहावयास मिळतात. उ. नेरळ सुभ्याचा बद्दल मुशाहिरा वर्षाचा २०५०रु. (५०); किल्ले पुरंदर कारकुनांचें वेतन रु.५७९०॥= (५०); गाडदी २०००रु.(५१).

बद्दलमुशाहिरा (५०), वेतन (५३), तैनात (८८), रोजमरा (५४), आसामी (५५) हे सामान्यतः एकाच अर्थाने शब्द वापरलेले आढळतात. फरक आहे, नाही असें नाही; उ. सुभेदाराच्या वेतनाला रोजमरा शब्द वापरणार नाहीत. पगार शब्द पूर्वी वापरण्यांत नव्हता असें वाटतें. ह्या पुस्तकांत एके ठिकाणींहि पगार शब्द आलेला नाही. शेरा हाहि पगारवाचक शब्द पे. रोजनिशींत वापरलेला आढळतो.

कोणत्या नाण्यांत वेतनाची रक्कम दिली हें प्रत्येक ठिकाणीं लिहिलेलें नाही. फक्त पृष्ठें ६८ व ६९ वरील नोंदींत चलन निर्दिष्ट केलें आहे. त्यांत मलकापुरी, मल्हारशाही, फुलचेरी, पंचमेल, चिकोडी व बडोदी ह्या चलनांत पगार दिल्याचें नमूद केलें आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं शाहूशिक्यांत बद्दलमुशाहिरा दिल्याचें आढळतें (१४४). मजुरीहि ह्याच नाण्यांत दिली आहे (१४४). पोतेचाल रुपये वांटल्याचेंहि उदाहरण आहे (५४).

खात्याच्या पगाराच्या वराता सरकारांतून प्रांतांच्या अधिकाऱ्यांवर सुटत. कोणाच्या पगाराची वरात कोणत्या प्रांतावर अगर सुभ्यावर द्यावयाची हें आगाऊ ठरलेलें असे (७१, ७८, ७९).

६

**कारकुनी**

एकच शब्द अनेकार्थी योजला जातो. त्यामुळें कालांतरानें तो शब्द दुर्गम्य होऊन बसतो. कारकुनी शब्दाची थोडीशी अशीच स्थिति झाली आहे. कारकुनाने जे सरकारी काम करावयाचें तें करण्याकरिता त्याला ज्याचें काम असतें तो पैसा देतो त्यास कारकुनी म्हणतात. अर्थात् व्यक्तीचें काम पण तें सरकार-मार्फत व्हावयाचें अशाच वेळीं कारकुनी देण्याचा प्रश्न उद्भवतो. बाकीच्या दप्तरी कामाकरता कारकुनाला कोणी पैसा देण्याचा संभव नसतो. आपल्या वतीनें खोटें काम करावें हें एकच कारण कारकुनाला पैसा देण्याचें नसतें. त्यानें आपल्या विरुद्ध जाऊन खोटें काम करूं नये हाहि एक हेतु पैसा देण्याचा असूं शकेल. मराठी राज्यात कारकुनी राजरोस देण्यांत येई.

सनदापत्रें लिहून देणें ही एक कारकुनी मिळविण्याची संधि असे. सनद लिहिणारा, शिक्का मारणारा, चोपदार, वगैरेसंबंधी इसमास सनद मिळविणारा सढळ हाताने पैसे देई. ह्यास्तव मजुमदाराला चांगली मिळकत असे. सरकारकडून पत्रें घेतांना मजुमदाराला १०० रु. द्यावे लागले आहेत (८२). कल्याणच्या सुभेदारांना सुद्धा इनामपत्र करून घेतांना फडनीस, चिटणीस व चोपदार ह्यांना चिरीमिरी द्यावी लागली[1] (८३). येथे ह्या देण्यास दरबारखर्च म्हटलें आहे. दरबारखर्च ह्याचा अर्थ कारकुनी असाच दिसतो. दरबारखर्च असेल तो सरकारांत जमा व्हावयाचा व कारकुनी कारकुनाला मिळावयाची असा भेद दाखविण्यास भरपूर आधार मिळत नाही.

अधिकाऱ्यांची कारकुनी कामावर असे असेंच केवळ नव्हे तर ती वर्षासनासारखी असे. दर सालची कारकुनीची रक्कम निरनिराळ्या अधिकाऱ्यांची ठरलेली असे. धांधरफळ्याच्या फडनिसास कारकुनीबद्दल ७५ रु. मिळत. हे बहुधा तुळशीबागवाल्यांकडून मिळत (८२). अंताजी माणकेश्वरचा मुलगा बहिरो

१. कागद व खरेदीखत ह्यांबाबत झालेला दरबारखर्च व कारकुनी ह्यांसाठी पृ. ६५ व ६६ पाहा.

अनंत ह्याच्याकडून "फडनिशीबाबत कारकुनी" म्हणून ४००० रु. जमा आहेत. नाना फडनिसाला एका पुणें प्रांताकडून दरसाल कारकुनीचे ३०७ रु. पोचत (८५). इतर प्रांतांकडीलहि रकमा ह्याप्रमाणे ठरल्या असतील. चिटणिसाला पुणें प्रांताकडून १०० रु. पावत (८५). ह्याच महिपतराव चिटणिसाला दाभाडी पाटण्याची कारकुनी सालिना २५ रु. देण्याची वहिवाट होती (८६). पेशव्यांचा फडणीस नाना त्याप्रमाणे चिटणीस महिपतराव.

कारकुनीची अगर दरबारखर्चाची रक्कम सालीना बांधलेली असली म्हणजे त्यास वर्षासन म्हणत. अशा वर्षासनांची एक भली मोठी यादी पान ५२ वर दिली आहे. लहान मोठ्या सर्वांना खिरापत वांटलेली असे असें ह्या यादीवरून दिसतें. वर्षासनांत आणे कां यावे ह्याचा उलगडा नीटसा होत नाही. विषम रकमांवरून कारकुनीचें प्रमाण ठरलेलें होतें असा तर्क करतां येईल; परंतु हें प्रमाण काय होतें तें समजण्यास मार्ग नाही.

फडणीसचिटणिसांप्रमाणे मजुमदारालाहि वर्षासनें प्रांतनिहाय मिळत असें दिसतें. नारो निळकंठ हुजूर मजुमदार ह्यास कल्याण नेरळकडून ७०० रु. दरसाल मिळत (५३).

ह्यावरून असें दिसतें की, हुजूर फडनीस व हुजूर चिटणीस ह्यांस कारकुनीचीं बांधलेलीं वर्षासनें प्रत्येक प्रांतांतून मिळत. खालचे फडणीस व चिटणीस ह्यांसहि लहान प्रमाणांत कां होईना पण कारकुनी सालोसाल मिळत असे. मुजुमदारास सनदपत्रांच्या वेळींच प्रायः मिळणें योग्य, परंतु ह्या अधिकाऱ्याचेंहि वर्षासन होतें हें वर आलेंच आहे. शिवाय पृ. ८२ वर आणखी पुरावा आहे. जमिनीच्या पाहाणीदारांनींहि कारकुनीचा हक्क निर्माण केला होता (८३).

कारकुनीला दरबारखर्च हें दुसरें नांव होतें हें वर सांगितलेंच आहे. परंतु कित्येक ठिकाणीं लाच देण्याला म्हणजे नकळत पैसे देण्यालासुद्धा दरबारखर्च हेंच नांव देत असें वाटतें. कल्याणच्या सुभेदारांनी करनाळ्याची आसामी दूर झाली होती तीं परत मिळविण्याकरता सदाशिव भट दिवाणजीस १०० रु. दिले (८४). साहेबाकडून काम करून घेण्याकरता मामलेदार यास धोतरजोडा दिला त्यास दरबारखर्च म्हणून म्हटलें आहे (८७). परंतु ही बाब सन १८२२ सालांतील म्हणजे कंपनी सरकार झाल्यानंतरची आहे. तसेंच पान ८६ वरील

१०० रुपयांची व ५० रुपयांची नोंद ही लाचाच्या स्वरूपाची असावी. हिशेबाच्या तयारीबद्दल सरकारच्या कारकुनांना ही रक्कम दिली आहे. दुसरा बाजीराव पैसे स्वतः घेऊन मामलती देत होता व त्यासहि दरबारखर्च असेंच म्हटलें आहे. १००० रु. बाजीरावाला देऊन मामलत घेतली (८६). श्रीमंत पेशवे सरकार ह्यांच्यावर कोणीं पैशाच्या वराता काढल्या तर पैसे देताना थोडेसे पैसे कमी द्यावयाचे. ह्यामुळे होणारा तोटा दरबारखर्च म्हणून नावें पडे (७३). सखारामबापूच्या शागीर्दांना ५ रु. दिले तेहि दरबारखर्च ह्या नांवानेच खर्ची पडले आहेत. ह्याला इनाम का म्हटलें नाही तें समजत नाही. काम करून घेण्याच्या हेतूने रुपये दिले असल्यास मात्र दरबारखर्च म्हणणें योग्यच आहे. दरबारखर्च सरकारी कामासाठी झाला पाहिजे हें स्पष्टच आहे. शागीर्दांच्या मार्फत सखारामबापूकडून सरकारी काम करून घ्यावयाचें असल्यास गोष्ट वेगळी.

दरबारी लोकांची सरबराई करण्यांत झालेल्या खर्चासहि दरबारखर्च ही संज्ञा प्राप्त होणें स्वाभाविक आहे. पान ८४ वरील ३० पहले तांदूळ हे दरबारी माणसाला फुकट दिले असल्यामुळे दरबारखर्चांत पडले असावे.

श्रीमंत पेशवे सरकारला पैसे देऊन शिवाय दरबारी लोकांना द्यावे लागले म्हणजे श्रीमंतांच्या पैशाला नजर हा शब्द योजण्यांत येई व दरबारच्या लोकांना दिलेल्या नजरेस भेददर्शक दरबारखर्च म्हणत. कल्याणचा सुभेदार रामराव अनंत ह्याला सुभेदारी मिळविण्यास २०००० रु. पेशवे सरकारास द्यावे लागले. ह्यास नजर म्हटलें असून ४००० रु. नाना फडणीस, २००० रु. नारोपंत परचुरे, ५० रु. लक्ष्मणपंत देशमुख येणेंप्रो दिलेली रक्कम दरबारखर्च म्हणून नोंदली आहे. श्रीमंत पेशवे ह्यांस केलेली नजर त्यांची खासगी कीं दौलतीची हें समजण्यास मार्ग नाही. रामराव हा दत्तक असल्याकारणाने त्याला इतका खर्च करावा लागला हें उघड आहे.

जेथे कारकून ठेवावा लागे तेथे कारकुनाचा पगार सुटण्याकरता कामगारांच्या पगारांत कपात करीत. ह्या कपातीस कारकुनी शब्द लावलेला आढळतो. त्याचीं उदाहरणें पृ. ५६, १५३, २०१, २७२, २७३, २७४, २७६ ह्यांवर आढळतील. घोडेस्वारांचा पगार देतांना कारकूनस्वार म्हणून एक घोडेस्वार कमी धरावयाचा व मजुरी देतांना महिन्याला प्रत्येकाचा एक दिवस कापावयाचा अशी रीत असे. डागिन्याची घडणावळ देतांना कारकुनी कापल्याचें उदाहरण पान ३१० वर आहे. प्राप्तीवरील कराच्या स्वरूपाची ही कारकुनी आहे.

दरबारखर्चाला आणखी एक शब्द खंडणी म्हणून आहे. कारकुनी, नजर, दरबारखर्च, वर्षासन हे एकाच हेतूने निरनिराळ्या प्रसंगाने योजलेले शब्द होत.

७

**सरकारी उत्पन्नाच्या बाबी**

राज्यकारभाराला सरकारला पैसे पाहिजेत. हे पैसे रयतेकडून कराच्या रूपाने सरकार वसूल करतें. कराच्या बाबी आता आहेत त्याच पूर्वी होत्या व पूर्वी होत्या त्याच आता आहेत. मनुष्याचा प्रत्येक व्यवहार व त्याची हालचाल ही कराचा विषय होऊं शकतात. कोणतेहि सरकार प्रजेच्या कोणत्याहि व्यवहाराला अगर हालचालीला मोकळें सोडीत नाही. इतकी सरकारची गरज मोठी असते म्हणून सरकार प्रत्येकाला प्रत्येक ठिकाणीं भासमान होतें. ईश्वराप्रमाणे तें सर्वव्यापी आहे ह्यात शंका नाही. जमीनसारा, जकात व उद्योगधंद्यांवरील कर ह्या सरकारच्या उत्पन्नाच्या मुख्य बाबी होत.

**जकात**

मालाची वाटेने ने-आण होते तिच्यावर बसविलेल्या करास जकात म्हणतात. जकात आपण बसवितों तर सडका केल्या पाहिजेत किंवा वाटेने सुरक्षितेची हमी घेतली पाहिजे ही जाणीव पूर्वी जागृत झाली होती असें वाटत नाही. म्हणजे जकात ही एक उत्पन्नाची बाब समजत. सडका केल्या अगर मार्गात बंदोबस्त ठेवला म्हणून त्याचा मोबदला ह्या स्वरूपाने जकात बसवणें अवश्य आहे अशी समजूत नव्हती. घाटांची दुरुस्ती करीत असत, नाही असें नाहीं; पण ती जुजबी.

कोणताहि माल जकातीवांचून सुटत नसे. कराचीहून ४ रुपयांच्या मिरच्या आणल्या त्यास १२ आणे जकात पडली (३५). मुंबईहून वाईस सुरण नेतांना अर्धा आणा जकात द्यावी लागली (३५). पदार्थाप्रमाणे जनावरांवरहि जकात असे. जनावराच्या किंमतीवर शेकडा १२॥ ह्या प्रमाणाने जकात घेण्यांत येई (३६). चिमाबाई नीदसुरी गुळसुंद्याहून पुण्यास गेली तिला घाटाचे हाशिलाबद्दल ११ आणे द्यावे लागले; आणि हें स. १८३१ मध्ये म्हणजे ब्रिटिश अंमल सुरू झाल्यावर. तांदुळावर दर खंडीस १ रुपया जकात आकारीत. इतर पदार्थांच्या विक्रीप्रमाणे मनुष्याच्या विक्रीवरहि जकात असे (१८५).

अव्वल, दुम आणि सीम म्हणजे उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे शेत-जमिनींचे तीन वर्ग केलेले असत. येथे दिलेल्या उताऱ्यावरून (३१) शेतसारा बिघ्यामागे ६॥ रु. होता. सारा तीन हप्त्यांनीं द्यावयाचा असून कार्तिक, पौष व चैत्र हे हप्ते देण्याचे महिने असत. तथापि पेशवे रोजनिशीवरून व इतर कागदपत्रांवरून साऱ्याचा दर व हप्त्याचे महिने सररहा एकच होते असें दिसत नाही. मार्गशीर्ष, पौष, माघ हे हप्त्याचे महिने कुलाबा जिल्ह्यांत नागोठण्याकडे असल्याचें पेशवे डायरीवरून दिसतें (६-२३१). ह्या पुस्तकांत शेतावर पट्ट्या बसविल्याचीं उदाहरणें दिलीं आहेत तीं नवीन आहेत. पट्ट्यांच्या संबंधाने पुढे विवरण केलें जाईल. तथापि येथे हें सांगण्यासारखें आहे की, सरपट्टी बिघ्यावर बसवलेली असून सवाई पट्टी ऐन आकारावर बसवली आहे. दिडी पट्टीहि सवाई पट्टीप्रमाणेच असावी (३०). सरपट्टीचे दर बिघ्यास ।-। व ।≋॥ आण्याप्रमाणे निरनिराळे आहेत. उत्पन्नावरील करांत सरचार्ज, सुपरटॅक्स हल्ली आहेत त्यांसारखीच शेताच्या उत्पन्नावरील ही सरपट्टी असावी. शेतसारा नक्तांत अगर ऐन जीनसी घेत असत (३१).

**जमीनमहसूल**

शेतसाऱ्याखेरीज गांवावरील इतर कराची उदाहरणें पान ३९ वर आढळतील. देशपरत्वें कांही कर कमी अधिक होतील इतकेंच. कोकणांत मिठागर, नारळी, पोफळी, मच्छमारी ह्या सरकारी उत्पन्नाच्या विशेष बाबी होत. ह्याशिवाय कायम उत्पन्नाची बाब म्हणजे अबकारी. तसेंच कोणत्याहि मालाची खरेदी विक्री झाली की त्यावर कर होताच. लोहारानें दुकान घातलें त्याच्या परवानगीसाठी त्यास १० रु. भरावे लागले (७९). हे कर सध्या म्युनिसिपल टॅक्सिस आहेत, त्या स्वरूपाचे होते.

**पट्ट्या**

नेहमीच्या करांखेरीज प्रासंगिक कर बसवीत त्यांस पट्ट्या म्हणत. राज्यारोहण अथवा राजाचें स्मारक ह्या निमित्ताने तसेंच लोकोपयोगी कामाकरता म्हणून हल्ली वर्गण्या गोळा करतात त्याच प्रकारच्या ह्या पट्ट्या असत. ह्या पुस्तकांत सुमारें २५ पट्ट्याचा नामनिर्देश आला आहे. कोणत्या सालीं कोणत्या पट्ट्या होत्या हें कळण्याकरिता पट्टीचें नांव व साल येथे कालानुक्रमाने देतों.

| पट्टी | शक | पृष्ठ |
|---|---|---|
| १ कबारपट्टी | १६७४ | ४१ |
| २ भालेपट्टी | १६७५ | ४१ |

| पट्टी | शक | पृष्ठ |
|---|---|---|
| ३ दारूपट्टी | १६९५ | ४१ |
| ४ नजरपट्टी | १६९७ | ४० |
| ५ कर्जपट्टी | १६९८ | ४०,४२,४५ |
| ६ दिवाणपट्टी | १६९९,१६७४ | ४१, ४२ |
| ७ बाभूळपट्टी | १७०० | ४२ |
| ८ बैलपट्टी | १७०० | ४२ |
| ९ दहकपट्टी | १७०३,१७०४ व १६९८ | ४२,४३ |
| १० नहरपट्टी | १७०३ | ४०,४३,४४,४५ |
| ११ मोरी | १७०३ | ४४,४५ |
| १२ सरंजाम | १७०३,१७२४ | ४३,४६ |
| १३ इनाम | १७०३ | ४३,४६ |
| १४ लग्न | १७०४,०५ | ४३ |
| १५ तळेपट्टी | १७११ | ४४ |
| १६ भिकारपट्टी | १७११ | ४५,१६३ |
| १७ चवलेपट्टी | १७११ | ४५ |
| १८ संतोषपट्टी | १७१९ | २९६ |
| १९ कोलारपट्टी | १७२४ | ४६ |
| २० पालखी | १७२४ | ४६ |
| २१ पालकपट्टी | | ३८ |
| २२ सरपट्टी | | ३० |
| २३ सवाईपट्टी | | ३० |
| २४ दिंडीपट्टी | | ३० |

बहुतेक पट्टयांचा अर्थ नांवांवरून समजण्यासारखा आहे. ज्या कामाकरिता पैसा लागेल त्याकरता मुद्दाम पट्टी बसवून पैसा वसूल करावयाचा असा रिवाज असल्यामुळे त्या कामाचें नांव पट्टीस दिलें जाई अथवा ज्यावर पट्टी बसवावयाची त्याच्या नावावरून ती पट्टी ओळखली जाई उ. सरंजाम, इनाम ह्यांवर बसविलेली पट्टी सरंजाम व इनाम पट्टी होय. लग्नाकरता अगर कर्जफेडीकरता बसवलेली पट्टी ती लग्नपट्टी व कर्जपट्टी होय. तळें बांधण्याकरता व नळ टाकण्याकरता

तळेपट्टी आणि नळपट्टी बसविण्यांत आली. तोफखान्याच्या कामासाठी बाभूळ व बैलपट्टी निर्माण झाली. उत्पन्नाच्या एकदशांश कराला दहकपट्टी नांव प्राप्त झालें. दहा वर्षांच्या अंतराने जमा केलेल्या कराला दहकपट्टी म्हणतात ह्या विधानाला आधार आहे असें वाटत नाही. एका बिघ्याला १। रु. प्रमाणे ७५ बिघ्यांवर ९३।।। रु. दहकपट्टीचे दिले आहेत. ह्यावरून दहकपट्टी उत्पन्नावर नसून बिघ्यावर होती असें दिसतें. बिघ्याचें उत्पन्न १२।। रु. धरलें असल्यास सांगवत नाही. चवलेपट्टी हा धनगरांनी द्यावयाचा शेळयामेंढ्यांवरील कर असावा.

पान ४६ वर कोकरपट्टी म्हणून नमूद केली आहे. कदाचित् कोकर ह्याच्याऐवजीं खरा शब्द कोलार असावा. मोडी वाचताना ही चूक होणें शक्य आहे. कोलार ह्याचा अर्थ शेत असाहि असेल. शब्दकोशात "आता कोल्हारीचे वेताळ" हा ज्ञानेश्वरींतील उतारा दिला आहे. शेतांत उभा केलेला वेताळ म्हणजे भूत किंवा बाहुलें हा त्याचा अर्थ आहे. ह्यावरून कोल्हार म्हणजे शेत असा अर्थ असावा. ही पट्टी शेतसारा ह्या सदरात लिहिणाराने घातली आहे त्यावरून कोल्हारपट्टी म्हणजे शेतपट्टी, शेतावरील पट्टी, असाच अर्थ घेतला पाहिजे. सवाई, दिडी व सर ह्याहि शेतावर बसवलेल्या पट्ट्या होत. पान ३० वर सवाई पट्टीचें उदाहरण दिलें आहे त्यावरून ती ऐनजिनसी साऱ्यावर नसून नक्त साऱ्यावर आहे असें दिसतें. साऱ्याची बाकी थकली तर पुढल्या सालीं सवाई वसूल करीत. आदल्या सालची सरकारबाकी रु. २६ थकली होती तिच्यावर रुपयास चार आणेप्रमाणे आकारण्यांत येऊन रुपये साडेसहा अधिक द्यावे लागले. ह्याच्याच खाली दिडी पट्टीचें उदाहरण आहे. येथे रुपयास चार आण्यांच्या ऐवजीं आठ आणे अधिक द्यावे लागले आहेत. सारांश, सवाई व दिडी पट्टी म्हणजे वाढी दिढी होय. थकलेल्या बाकीचें व्याज म्हणावयास हरकत नाही. सरपट्टी हा मात्र मुद्दाम बसवलेला कर असावा. दीडीपट्टी व सरपट्टी एकाच वेळी आकारलेली आहे हें पाहिलें म्हणजे वरील अनुमान बरोबर आहे असें वाटतें.

पालकपट्टी म्हणजे बाजारांत पाल उभारून त्यांत दुकान मांडतात त्यावरचा कर. परंतु ही पट्टी तिसरे सालीं द्यावयाची असे हें विशेष दिसतें. कबारपट्टीचा अर्थ पुस्तकांत दिलाच आहे (४१).

ह्याशिवाय आणेट्टीचा उल्लेख कल्याण सुभेदारांच्या जमाखर्चात आला

आहे तो असा– ८= चिकणघर ची बाग दिा म्हात्रा याजकडे आणे पट्टी येणे त्याचें व्याज (श. १७३५).

८

करांचा वसूल नेमलेले अधिकारी करून पाठवीत. कमावीसदार, मामलेदार, सुभेदार हे मुलकी अंमलदार गांवाचा, तालुक्याचा अगर सुभ्याचा वसूल करीत. जकात अधिकारी स्वतंत्र नेमलेले असत व त्याचे प्रांतहि मुलकी प्रांतांहून निराळे होते. उत्पन्नाचा अंदाज अगोदर केला जात असे आणि ही आगाऊ निश्चित केलेली रक्कम सरकारला देण्याची जबाबदारी तो तो अंमलदार पतकरीत असे. ह्या ठरलेल्या रकमेचीं खतें लिहून घेत. अधिकाऱ्यांनी सरकारला द्यावयाच्या रकमेला रसद म्हणत. ही रक्कम आगाऊ देत किंवा हप्त्याहप्त्यांनी देत. अर्धी रक्कम आगाऊ घेत आणि तिलाच रसद म्हणत असें मात्र दिसत नाही. रसदेची रक्कम सरकार वराता काढून वसूल करी. हल्ली सेक्रेटरी ऑफ स्टेट ज्याप्रमाणे आपल्या कचेरीच्या खर्चाकरिता हुंड्या काढतो त्याच प्रकारची वरातांची पद्धति होती. सध्या सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या हुंडया बाजारांत व्यापारी लोक विकत घेतात त्याप्रमाणे सरकारी वराता पुण्याचे हुंडीवाले विकत घेऊन सरकारास तावडतोब पैसे देत आणि वरातीची रक्कम आपण वसूल करीत (१३३). सरकारी हुंडीलाच वरात शब्द लावीत. कधी कधी रसदेची रक्कम रोखीने बैलावर किंवा अन्य उपायाने पाठविण्यांत येत असे. कल्याणच्या मामलतीच्या रसदेचे एक लाख रुपये २५ बैलांवर पुण्यास पाठविण्यांत आले. अर्थात् एका बैलावर ४००० रुपयांचें ओझें होतें (३३). रसदेचे रुपये पाठाविण्याचें भाडें सरकार सोशीत असे (३३). रसद हुंडीच्या स्वरूपांत पाठविल्याचींहि उदाहरणें आहेत. "२५००० रु. खातें वनमाळी थोबनदास पेढी पुणें हुंडी पेढीपैकी घेऊन नेरळच्या रसदेच्या भरणी-यासी हुंडी पाठविली" श. १६९५ ज्येष्ठ (क. सु).

**करवसुली**

दुकानदाराच्या मालाच्या किंमतीबद्दल सुद्धा वरात देत (२७६).

रसदेची रक्कम कराराच्या मुदतीच्या आंत घेतल्यास सरकारांतून व्याज कापून मिळे (७८,८१,१३४).

कांही ठिकाणच्या रसदेचे आंकडे ३२, ३३, ३४ पानांवर आढळतील.

त्याचप्रमाणे ठिकठिकाणीं वरातांच्या रकमा आल्या आहेत त्यांवरूनहि उत्पन्नाचा अंदाज अंशतः करतां येईल.

अमुक ठिकाणचा खर्च अमुक ठिकाणाहून भागवावयाचा अशी व्यवस्था प्रथमपासूनच केलेली असे. नरसिंहशास्त्री यांच्या रोजमऱ्याची वरात वाई प्रांतावर होती (७८). ह्याशिवाय "६००० रु. किले पुरंदर येथील बेगमीस प्रांत पुण्याकडून सालमजकुरी नेमणूक. सरकारांतून देविले रुपये १६००० पैकीं गुा हाय पोतेचाल." श. १७०३ आषाढ (तु. बा.).

नेवासच्या रसदेचे ९,०००० रु. हाली शिक्क्यांत पाठविले आहेत (३३). कोणत्या चलनांत रसद घ्यावयाची त्याचा करार झालेला असे. हिंदुस्थान प्रांताचें उत्पन्न हाली शिक्क्यांत द्यावयाचे ठरलें होतें (३४).

मक्त्यानें गांव घेतलें तर कधी कधी त्या व्यवहारांत तोटा होत असे उ. "रु. ९८≡ तोटा खर्च मौजे मुंजिवली तां चोण सरकार मक्ता रु. ४६२॥= पो गांवचें कच्चें उत्पन्न ४५३।≡ बाकी तोटा" श. १६९८ (क. सु.). मक्ता घेणाराला तोटा होत असे हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. रयतेपासून अनधिकृत पैसे घेतां आले असते तर तोटा होण्याचें कारणच नव्हतें. रयतेने सरकारला काय द्यावयाचें तें ठरलें असल्याकारणाने फाजील पैसा रयतेकडून उकळणें शक्य नव्हतें.

९

सरकारच्या वराता व लोकांच्या हुंड्या ह्यांचा व्यवहार जारीने सुरू होता. पैशाची युद्धाकरता गरज व पैसे पाठविण्याच्या अन्य साधनांचा अभाव हें हुंड्यांच्या

हुंड्या

व्यवहाराच्या प्रसाराचें मुख्य कारण होय. हें कारण तुळशीबागवाल्यांच्या जमाखर्चांत दिलें आहे. "कुसुंबें येथील वसूल येतो तो ऐवज रोख पुण्यास पाठवावा तरी वाटेची निभावणी होणें यास्तव हुंड्या करून पाठवितात" (१३६). ह्या हुंड्या अर्थात् जासुदांबरोबर पाठवीत (१३५). पैसे ताबडतोब पाहिजे असले म्हणजे पुण्यांत हुंडी विकीत. पैठणहून साताऱ्यावर केलेली हुंडी पुण्यास विकली जाई (१३४).

हुंडींत रुपये देण्याची मुदत लिहिलेली असते; "मार्गशीर्ष वद्य पंचमीपासून एकतिसां दिवसांची मुदत" (१३५). पुण्यास काशीची हुंडी वैशाख शुा १ स विकत घेतली तींत काशीस पैसे ज्येष्ठ वाा १ स मिळतील असें लिहिलेलें

होतें. काशीसारख्या दूरच्या ठिकाणीं दीड महिन्यांत पैसा मिळे आणि तोहि निश्चित दिवशीं (१३८). दुसऱ्या हुंडींत एक महिन्याची मुदत आहे (१३८). ही हुंडी शाहा व्यापारी जोग आहे (१३९) म्हणजे कोणत्याहि व्यापाऱ्याने हुंडी हजर केल्यास त्याला हुंडीचे रुपये मिळाले पाहिजेत. हुंडीवाल्या व्यापाऱ्यापाशीं कुळाचे पैसे नसल्यास कूळ व्यापाऱ्याकडे दुसऱ्या हुंड्या अगर रोख रक्कम किंवा अन्य रीतीचा मोबदला पाठवितें त्यास लहणें म्हणतात (१३८) जागा हुंडीचा उल्लेख पान १० वर आहे.

हुंडणावळीचा दर शेंकडा १, १॥ रु. पडे. रक्कम लहान असली व नुसती चिठ्ठी दिली तर शेंकडा दोन रुपयेहि आकारीत (१३६).

ज्या ठिकाणची हुंडी कुळाला पाहिजे असेल तेथे व्यापाऱ्याची अडत नसल्यास तो आपल्या दुसऱ्या ठिकाणच्या अडत्यावर हुंडी देऊन त्यास कुळाला पाहिजे त्या ठिकाणीं हुंडी पाठविण्यास लिही; उ "हुंडी औरंगाबादची तेथून उज्जनची हुंडी करून द्यावी" (१३६). कोणत्या चलनांत हुंडीची रक्कम द्यावयाची तें चलन हुंडीत निर्दिष्ट करीत. आणि व्यापाऱ्याकडे भरलेलें चलन व त्याने द्यावयाचें चलन हीं भिन्न असल्यास बाजारभावाप्रमाणे बट्टा आकारीत.(१३८).

हुंडीची मुदत भरून गेली असल्यास त्या हुंडीस पक्क्या मितीची हुंडी म्हणत (१३५). पैठण, सातारा, श्रीरंगपट्टण, बुंदेलखंड, पुणें शहर, निबडी, मुंबई, काशी, वेंकण, औरंगाबाद, उज्जनी ह्या ठिकाणांचा उल्लेख हुंड्यांच्या व्यवहारांत ह्या पुस्तकांत आला आहे. हुंड्यांचा व्यवहार करणाऱ्या व्यापाऱ्यांचीं नांवें विस्तारभयास्तव येथे देत नाही. पुस्तकांत आहेतच.

१०

**चलन**

पूर्वीच्या राज्यपद्धतींत लढायांवांचून सरकारचें कर्तृत्व कोठेहि फारसें दिसत नसे. पूर्वापार वहिवाट कायम ठेवणें, अन्यायाबद्दल शासन करणें हेंच राजाचें कर्तव्य मानलें जाई. राजापासून लोकांना प्रेरणा मिळत नसे. ह्या कारणास्तव अनियंत्रित सत्तेच्या काळांत लोकशाही नांदत होती असेंहि म्हणतां येण्यासारखें आहे. नाणें पाडण्याचा एकमेव अधिकार सरकारचा सध्या समजला जातो. परंतु मराठेशाहींत नाणीं पाडण्याचा अधिकार लोकांना दिलेला होता. अथवा खरें बोलवयाचें तर लोक आपआपल्या व्यवहाराकरता नाणीं पाडूं लागले.

सरकारला लोकांकडून हें काम आपल्या एकट्याच्या हातीं ठेवण्याची अवश्यकता वाटली नाहीं. नाइलाजास्तव नियंत्रण घालावें लागलें हें निराळें. ह्याचा परिणाम म्हणजे देशांत असंख्य चलनें प्रचारांत असत. ह्या पुस्तकांत आलेल्या चलनांचीं नांवें येथे देणें अवश्य आहे.

रहिमतपुरी, मलकापुरी, चांदवड, मिरजी, आरकट, चिंचवड, हुकेरी, बागलकोटी, गजापुरी, तळेगांवी, भडोची, सुरती, पन्हाळी, चतरासिंगी, नीलकंठी, सारोली, बहुती, आरकट गजीकोट, आरकट फुलचरी, दौलताबादी, बेलापुरी, बडोदी, भातवडी, इटाव, बावडी, पनाळी, अंकुशी, एकबुंदकी, त्रिशुळी, फरशी, नागाचे, तुऱ्याचे, पंचमेल, भिटे, पोतेचाल, वसईचाल, (चांदवड), कल्याणचाल (मिठे), वांईशिक्का, हालीशिक्का, कासीसिक्का, सीप्री सिक्का, साहु सिक्का, दिल्ली सिक्का, अटीचे, मुंडे, अलमगिरी, मल्हारशाही, महमदशाही, पेठ चलनी, बाजार चलनी, कोकण चलनी (चिंचवड), सरकार चलनी (तुऱ्याचे), दाणे चलनी, पुणें चलनी, हापीस चलनी.

वरील चलनांतील कांही चलनांचीं नांवें ज्या गांवांत तें चलन पाडीत त्या गांवावरून पडलीं आहेत. कांही नांवें नाण्यांवरील मुद्रांवरून त्या नाण्यांना मिळालीं आहेत. ज्या राजांनी नाणें सुरू केलें त्याच्या नावांवरून कित्येक चलनें ओळखलीं जातात. मिठे म्हणजे चागले असें म्हणतात. बाजार चलनी म्हणजे बाजारांत चालणारें. बाजार चलनी व पेठ चलनी ह्यांत भेद नसावा. तुरा ज्याच्यावर आहे तो तुऱ्याचा रुपया. सरकार चलनी तुऱ्याचे ह्याचा अर्थ सरकारने मान्यता दिलेले तुऱ्याचे रुपये. दाणें बाजारांत चालणारा तो दाणे चलनी रुपया. एका नांवाचे रुपये असले तरी ते निरनिराळ्या ठिकाणीं पाडीत असून त्यांच्या धातूंत कमी-अधिक प्रमाण असावें. म्हणून चिंचवड छापाचाच रुपया पण कोंकणांत चालणारा तो चिंचवड कोकण चलनी समजावयाचा. वसई चाल, कल्याण चाल, पुणें चाल ह्यांसंबंधानेहि असेंच विधान करतां येईल. सिप्री आणि ग्वाल्हेरी एकच नाणें असें म्हणतात. ह्या पुस्तकांत सहा शिक्के आले आहेत. त्याशिवाय भिवंडीच्या जोगांच्या जमाखर्चांत पुणें शिक्का नांवाचें चलन मला आढळलें. ह्यावरून गायकवाड म्हणतात[1] त्याप्रमाणे शिक्के तीनच होते असें दिसत नाही. पोते चाल म्हणजे सरकार-तिजोरींत स्वीकारला जाईल तो रुपया. पेशवे सरकारने नाण्यांतील धातूंचें प्रमाण ठरविलें होतें. त्याप्रमाणे जें नाणें असेल तें सर्व पोते-चाल. छापी म्हणजे छाप-

---

१ पुणें शहराचें वर्णन पृ. १५०.

लेले, डागलेले असा अर्थ करतां येण्यासारखा आहे. उ. ११५ रु. चिंचवड (पैकी) ४० कोरे नंबरी (व) ७५ चिंचवड छापी[१]. तसेंच छापीचे कोरे करीत असें दिसतें (१४४). ह्यावरून छापी ह्याचा अर्थ डागळलेला असा होऊं शकेल. परंतु सिक्का रुपया छापी केला आहे (१४४) ह्यामुळे मन संशयग्रस्त होतें. मुद्दाम छापी रुपया कोण करील ! का लोकांना फसविण्याच्या हेतूने लबाडी करीत ! वांई शिक्याचा एक रुपया १ आणा खर्च करून छापी केला आहे. ह्यांत लबाडीचा हेतु होता असें म्हणणेंहि धाडसाचें होईल. ह्याच्यापेक्षा अज्ञान कबूल करणेंच बरें ! तथापि पृ. १४३ वर कोरे रुपये दाणे विकत घ्यावयास मळके केल्याचा दाखला मिळतो. मळके, डागळलेले, जुने ते खरे रुपये अशी तर अडाण्याची समजूत नसेल ! पांढरें मीठ कमी खारट असतें अशी समजूत आतापर्यंत होती. त्या मिठाला कोंवळें मीठ म्हणत. म्हणून कित्येक व्यापारी ह्या पांढऱ्या स्वच्छ मिठात बुद्धया माती मिसळीत. अशा मिठाला भाव जास्ती येत असे. छापी सुलाखी म्हणजे भोक पाडलेले रुपये. माळ करण्याकरता भोकें पाडण्याचा प्रघात पडला असावा; अथवा नाण्याचा खरेपणा पाहण्यासाठीहि भोक पाडीत असें मोल्सवर्थ म्हणतो. छापी म्हणजे छाप उठवलेला रुपाया असाहि अर्थ केलेला आहे[२]. वाई सिक्का होता त्याचा छापी केला (१४४) ह्या ठिकाणीं छापी ह्याचा अर्थ डागळलेला न करतां विशिष्ट छाप उठवलेला असा करणें शक्य आहे. विशिष्ट प्रकारचा छाप असलेला, परंतु हा छाप कोणता तें समजत नाही.

आरकट, फुलचरी, गंजीकोट, आरकट गंजीकोट व आरकट फुलचरी ह्यांपैकी अर्काट येथे इंग्लिशांची टांकसाळ होती आणि आरकट हें इंग्रजी नाणें होतें. त्याचप्रमाणे फुलचरी म्हणजे पांडिचरी हें फ्रेंच नाणें होतें असें भावे म्हणतात[३]; पण मग आर्कट फुलचरी (१४६) हे चलन कोणतें समजावयाचें ? नुसत्या आर्कट नाण्यांचा उल्लेख पान १४१ व १४३ वर आला आहे. त्याचप्रमाणे गंजीकोट (१४२)[४], ग्वाल्हेर गंजीकोट (१४३) व आर्कट गंजीकोट (१४६) ह्या नांवांचीं नाणीं असून त्यांतील भेद समजण्यास कल्पनेशिवाय दुसरें साधन दिसत नाही. आरकटी आणि गंजीकोट हीं भिन्न चलनें होतीं असें पान १३५ वरील २०००० रु. च्या रकमेच्या तपशिलावरून म्हणतां येण्यासारखें आहे. मोल्सवर्थ

---

१ जोग जमाखर्च. २ नाण्यांचे तपासणीचें वर्तमान.

३ पे. म. ५०८. ४ येथे ही मोहोर आहे.

अरकाट गंजीकोट असा शब्द देतो व त्याचा अर्थ अरकाटच्या नाण्याचें नांव असा देतो. परंतु ह्या अर्थाला ग्वाल्हेर गंजीकोट हा शब्द बाधा करतो. गंजीकोट म्हणजे पुष्कळ. ह्यांत गंजी आणि कोटि असे दोन शब्द आहेत. गंजीकोट हें गांवाचेंहि नांव आहे. गंजीकोट हें जिंजीचें दुसरें नांव आहे असेंहि म्हणतात. तथापि तालीकोटाप्रमाणे गंजीकोट हें गांवाचें नांव आहे ह्यांत संदेह नाही. गंजीकोटचे रुपये ते गंजीकोट. गंजीकोट गांव अर्काटजवळ आहे. अर्काट गंजीकोट म्हणजे अर्काट गंजीकोटकडील रुपया अशी कित्येकांची समजूत आहे. ह्याच पद्धतीने आर्कट फुलचरी ह्याची वासलात लावतां येईल. इतकें करूनहि ग्वाल्हेर-गंजीकोट ह्या नाण्याचें स्वरूप समजणें कठीणच आहे. ग्वाल्हेर आणि गंजीकोट ह्यांमध्ये फार अंतर आहे. गंजीकोट नावाची मोहोरहि होती. अर्थात् हे सोन्याचें नाणें होतें (१४२). पेशवे रोजनिशीत (७·३०५) चांदवडच्या नवीन टांकसाळीचा रुपया गंजीकोट प्रतींत चालला पाहिजे असें पेशव्यांनी काढलेल्या हुकुमांत म्हटल्याचें आढळतें. ह्यावरून ग्वाल्हेर गंजीकोट म्हणजे ग्वाल्हेरचे रुपये, परंतु गंजीकोट प्रतींत घालण्यासारखे असा अर्थ करतां येईल. गंजीकोटचें नाणें हें दिल्ली शिक्क्याप्रमाणे प्रमाणभूत मानले जात असे असें दिसतें. गंजीकोटाचें पूर्वीचें नाव गंडीकोट असून तेथें रुपये पाडीत.[1]

**सिक्का**

ज्यावर शिक्का मारलेला असतो तें शिक्का नाणें. तथापि केवळ शिक्का शब्द वापरल्याने हल्ली सिक्का समजला जात असे असें दिसतें (१४२). हल्ली सिक्का हें निजामशाही नाणें होतें. आज मितीलाहि हें नाणें निजामच्या मुलखांत प्रचालित आहे. सात प्रकारचे शिक्के ह्या पुस्तकात आले आहेत. सिप्री आणि ग्वाल्हेर एकाच जातीचें चलन होय. नुसता सिक्का शब्द वापरण्याची चाल होती (१३८, १४८). पान १४१ वरील नोंदीवरून शिक्का शब्द कोणत्याहि नाण्यासंबंधाने वापरीत असें दिसतें. "सीकानाणीं" ह्या शिर्पकाखाली हल्ली शिक्क्याप्रमाणे चांदवड, अलमगिरी, मलकापुरी वगैरे नाण्यांचाहि अंतर्भाव केलेला आहे. काशीशिक्का हें इंग्रजी नाणें असावें; कारण त्याच्यामागे कलदार शब्द लावलेला आहे (१४०). पंचमेल ह्या स्वरूपांत पेशवे रोजनिशींत शब्द आहे. तोच बरोबर असावा. पंचमेळ असा शब्द कित्येक सुचावितात तो शुद्ध शब्द दिसत नाही.

---

१ Journal A.S. of Bombay, Vol. 14. 1918. p. 349.

ह्या पुस्तकांतहि पंचमेल असाच शब्द आहे (१४१). पुढल्या पानावर पंचमेळ असा शब्द लिहिण्यांत आला आहे तो चुकीचा असावा. पंचमेल नांवाची मोहोर असावी असें पृ. १४२ वर मोहरांची यादी दिली आहे तीवरून स्पष्ट दिसतें. कारण १०५ मोहरांचीं नाणीं त्यांत ४५ पंचमेल नाणीं आहेत. हीं एकाच जातीचीं नाणीं नसतीं तर ४५ पंचमेळ असें लिहिण्यांत कांही अर्थच नाही. ४५ नाणी एकाच किंमतीचीं म्हणजे प्रत्येकीं १४।।।= रु. किमतीचीं आहेत. ह्यावरून पुरी संशयनिवृत्ति होते. परंतु पेशवे रोजनिशींत पंचमेळ नाणें ह्या सदराखाली सुरती, औरंगाबादी, बनारसी, कुराज्या हानाबाग, मच्छलीबंदर, पटणी, लाहुरी, बराणपुरी अशा आठ वेगवेगळ्या नाण्यांचीं नावें दिलीं आहेत. येथेहि ह्या एकंदर २०० नाण्यांचा दर एकच म्हणजे १३।।। रु. आहे. परंतु पंचमेळ नाणें स्वतंत्र असें सांगितलेलें नाही. ह्या पंचमेळ नाण्यांत दिल्लीशिक्का नाण्याचा समावेश केलेला नाही. हें नाणें स्वतंत्रपणें वर्णिलें आहे. तथापि मोहरा नाण्यांत दिल्लीशिक्का व पंचमेळ ह्यांचा अंतर्भाव होतो हें निश्चित (८-२३८). पंचमेळ म्हणजे अनेक प्रकारचीं नाणीं इतकाच मोघम अर्थ घेतला तर ह्यांतून दिल्ली शिक्का कां वगळला तें सांगणें अवघड आहे. पेशवे रोजनिशींतील पंचमेळ नाण्यांत औरंगाबादी नाण्याचा समावेश करण्यांत आला आहे. परंतु ह्या पुस्तकांतील यादींत पंचमेल आणि औरंगाबाद ह्यांत भिन्नता दाखविली आहे. ह्यामुळे पंचमेळ ह्या शब्दाच्या अर्थासंबंधाने अधिकच गोंधळ होतो. दुसऱ्या एका ठिकाणीं हिंदुस्थान पंचमेळ मोहरा दर १५। रु. अशी नोंद दिली आहे (पे. डा. ७-२९१). ह्यावरून पंचमेळ शब्द सोन्याच्या मोहरेला लावीत असें स्पष्ट दिसतें. आता ह्या पुस्तकांतील नोंदीवरून (१४१) पंचमेल शब्द रुप्याच्या नाण्याला लावला आहे ह्याविषयी शंका नाही.

पेशव्यांनी नवीन टांकसाळी सुरू केल्या त्यांत लोहार, सोनार, घणकरी, शिक्के करणारा व भातेकरी असे पांच जातीचे कारागीर काम करीत. एकंदर कारागीर दहा होते व त्यांपैकी पांच सोनार होते (पे. डा.७-२९८). ह्यावरून पंचमेळ शब्द प्रचारांत आला काय? पांच तऱ्हेचे एकत्र केलेले, असा अर्थ पेशवे रोजनिशींत संपादक देतात (४ कोश). परंतु पांच तऱ्हा म्हणजे कोणत्या? ह्याच पुस्तकाच्या ८९ पानावर एकाच मोहरेला पंचमेळी मोहोर म्हटलें आहे ह्यावरून पंचधातूंची केलेली मोहोर असा अर्थ करावा लागतो.

सारांश, पंचमेळ शब्दाने काय समजावयाचें तें सांगतां येत नाही. अधिक साधनें मिळविलीं पाहिजेत.

पंचमेळप्रमाणे आटीचे रुपये कोणते तें समजण्यास साधन नाही. ह्या पुस्तकांत तीनदा हा शब्द आला आहे (१४२, १४३, १४६). दुसऱ्या ठिकाणीं जामदारखान्यांत आलेल्या नाण्यांच्या यादींत ३८५०० रु. आटीचे जुने असें म्हटलें आहे. आटीचे जुने म्हटलें आहे त्या अर्थी आटीचे नवे असलेच पाहिजेत. तिसऱ्या नोंदींत अटीच्या बट्टयाचा भाव उतरला असा तपशील आहे. आटवलेल्या सोन्याला आटीचे रुपये म्हणणें संभवनीय दिसत नाही. पहिल्या नोंदींत रोख अटीचे एक शिक्का महमदशाही असें वर्णन आहे. ह्यावरून अनुमानें निघतात तीं:—१. अटीचे रुपये अनेक शिक्क्यांचे असूं शकतील; २. महमदशाही रुपये अटीचे होते; ३. अटीचे स्वतंत्र रुपये नसावेत. तर मग अटीचे म्हणजे सरकारने घालून दिलेल्या अटींप्रमाणे पाडलेले असा अर्थ असूं शकेल काय ? मग अटीचे रुपये म्हणजे पोतेचाल असें म्हणावयास हरकत दिसत नाही. हा अर्थ सधार ठरल्यास आटीचे असें न लिहितां अटीचे असें लिहावयास पाहिजे. हें सर्व उघड उघड तर्कजाल आहे ह्यात संशय नाही. नाणें पाडण्याकरिता लागणारें सोनेंरुपें विकत घेत अथवा जुनीं नाणीं खरेदी करीत. नाणीं घेतलीं म्हणजे प्रथम तीं आटवावीं लागत हें उघड आहे: परंतु ह्या आटवण्यावरून आटीचे हा शब्द जन्मास आला असें वाटत नाही. कारण एकदा नाणें तयार झालें म्हणजे त्याच्या पूर्वसाहित्याला विशेष महत्त्व राहत नाही. आता आटीचे म्हणजे आटवण्यालायक म्हणजे ज्यांच्यावरील छाप उडाला आहे, जे गुळगुळीत झाले आहेत असे रुपये असाहि तर्क करतां येण्यासारखा आहे. असे रुपये कोणत्याहि शिक्क्याचे असूं शकतील. अटीचे म्हणजे आटवलेले म्हणजे पाडलेले असाहि अर्थ करतां येईल. माझ्या "बदलापूर" पुस्तकांत "८६७८ रु. जुने कल्याण अटीचे" अशा तपशिलाने शिलक दाखविल्याची नोंद घेतली आहे (३५३). ह्या ठिकाणीं कल्याणास पाडलेले रुपये असेंच समजणें युक्त होईल.

पान १४७ वर सहा नीळकंठी रुपयांचा निर्देश आहे. नाण्यांचे तपासणीचें वर्तमान नांवाच्या तक्त्यांत नाण्यांची यादी दिली आहे. त्यांत तुरामळ नीळकंठी असें एक नाणें आहे. "हा सुमाराने ५० वर्षांमागे तोरागल सेना-

खर्गाचा बालासाहेबाने पाडिला" असें वर्णन ह्या नाण्याचें केलें आहे. ह्याचें वजन १७० ग्रेन असून शुद्ध धातु १०५·४ ग्रेन होती.

भातवाडी रुपया (१४४,२८३) हा भातोडी रुपया होय. अहमदनगर जिल्ह्यांत भातोडी नांवाचें गांव आहे तेथे पाडलेला रुपया. हा १७१·३ ग्रेन वजनाचा होता. पण त्यांत शुद्ध धातु १४९·०३१ ग्रेन होती.[१] हालीं शिक्का पुण्यांतहि पाडीत.[१] अंकुशी चिंचवडप्रमाणे मिरजी हुकेरी ह्या जोड नांवाचा एकाच शिक्क्याचा रुपया होता असें वरील "वर्तमानां"त भासविलें आहे. परंतु ह्या पुस्तकांत मिरजी मलकापुरी ह्या नांवाच्या चलनाचा उल्लेख आला आहे (१४७). ह्यावरून मलकापूर व हुकेरी ह्या जातींचे परंतु मिरजेस पाडलेले रुपये असा अर्थ करणे योग्य होईल. ग्वाल्हेर गंजीकोट व अर्काट गंजीकोट ह्यांसारखाच हा प्रकार दिसतो. मलकापुरी व हुकेरी रुपये निराळे होतेच. त्याचप्रमाणे मिरजी रुपयेहि वेगळे होते.

जरीपटका (१४५) हा रुपया नाशकांत पाडीत असल्याचें 'वर्तमान" पत्रकांत आहे. परंतु जरीपटका निशाणी असलेले रुपये नागपूरच्या भोसल्यांनी पाडिले असें होडीवाल्यांचें म्हणणें आहे.[२] जरीपटका हा रुपया हरिपंत फडक्यांचा होता असें ज्ञानकोशकार म्हणतात. मात्र जरीपटका आणि अंकुशी हे रुपये निराळे असावे. पान १४५ वरील जरीपटक्यापुढील कंस चुकीचा आहे.

मल्लारशाही रुपये दोन ठिकाणचे होते. एक बागलकोट येथे पाडलेले व दुसरे विशाळगड येथे पाडलेले. हे दुसरे रुपये दक्षिण कोकणांत चालत असत.

"छापीचे कोरे केले", "कोरे मळके करून दिल्हे" ह्यांत कोरे ह्याचा अर्थ उजळा दिलेले असाच असावा. कारण रुपयांना उजळा देण्याचें काम सतत चाले (१४४). उजळणें व नीट करणें ह्या क्रिया फार भिन्न नसाव्या. "खटनट" "रुपये नीट" केल्याचीं कांही उदाहरणें पान १४७ वर आढळतील. ह्याच सदरांत "त्रिशुळी ५१ रु. बटावून चांगले केले" (१४३) हें घालतां येईल. ह्यावरून कोरा नांवाचा रुपया होता ते रुपये येथील कोरे ह्या शब्दाने समजण्याचें कारण नाही. कोरा हें संयुक्त प्रांतांत एक गांव आहे. मोंगलांची ह्या ठिकाणीं टांकसाळ असून तींत रुपये पाडीत.

---

१ वर्तमान. २ Journal A.S. Bengal, Vol. 14. P. 343.

इटाव हें जिल्ह्याचें ठिकाण आग्रा प्रांतांत आहे. ह्या ठिकाणीं पाडलेले रुपये ते इटाव रुपये.

सारोली रुपयांचा नामनिर्देश फारसा कोठे आढळत नाही. सारोल व सारोली दोनहि नांवांचीं गांवें आहेत. तेथील रुपये ते सारोली रुपये असावे. ह्या तर्कास ऐतिहासिक आधार माहीत नाही.

फरशी रुपयाचें वजन १७५ ग्रेन असून त्यांत शुद्ध धातु १६४·५ ग्रेन होती. ह्या रुपयावर परशु (कुऱ्हाड) ठसविलेला असल्यामुळे त्यास फरशी नांव पडलें. हा रुपया पोतेचालीचा होता (१४३).

एके ठिकाणीं (१४८) नुसते जुने एवढेंच म्हटलें आहे. ह्याने काय अर्थ-बोध होतो हें निश्चितपणें समजत नाही. जुने म्हणजे मळके, झिजलेले, कोरे नव्हेत असा अर्थ असावा. असे १००० रु. आहेत.

कांही नाण्यांच्या बट्ट्याचे दर प्रस्तुत पुस्तकांत आपणांस आढळतात तेः—

| चलनें | दर शेकडा भाव |
|---|---|
| मलकापुरी—चांदवड | २५ |
| मिरजी—रहिमतपुरी | २५ |
| फरशी—मलकापुरी | २५ |
| आर्कट—सुरती | ३॥ |
| आर्कट—इंग्रजी | ५ |
| सिक्का—पोतेचाल | ·॥≥ |
| ,, —चांदवड | ५ |
| त्रिशुळी—नागाचे | १२॥ |
| बावडी— ,, | २५ |
| भातोडी—चांदवड | १ |
| बेलापुरी— ,, | ७॥ |
| चांदवड—शाहू शिक्का | १७ |
| हाली शिक्का—चांदवड | ८। |
| कोरे पारसी—चांदवड | ६।≥ |

वेगवेगळ्या ठिकाणीं वेगवेगळीं नाणीं चालत. त्यामुळे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जातांना नाण्यांची पालट करावी लागे. उ. "·॥· बट्टा जमा

सुरती रु. ६ त्याचे अलीबागी इनामास वगैरे खर्चाकरिता वटावले त्याचा बट्टा जमा मुक्काम अलीबाग चैत्र श. १७४७." तसेंच "||= बट्टा खर्च अलीबागी रु. १० त्याचे चिंचवड चलनी केले त्यास बट्टा दर ८- प्रमाणे मुक्काम हरेश्वर" (वैद्य). जिन्नस खरेदी करताना व्यापाऱ्यांत चालू असलेलें चलनच द्यावें लागे. जसें "लोण्याकरता चांदवड केले" (१३९). अशाच कारणाकरिता पेठचलनी, दाणेचलनी, बाजारचलनी अशी परिभाषा प्रसृत झाली. नाण्यांची अदलाबदल करतांना बट्ट्याचा प्रश्न उत्पन्न होतो. लोकांचा नाणीं पाडण्याचा हक्क सरकारने मान्य केल्याकारणाने सरकारला देखरेख, नियमन व शासन करण्यापलीकडे कांहीच उरले नाही. कितीहि नियमन केलें तरी लबाडी व्हावयाचीच. शिवाय स्वतंत्र लोकपति अनेक असल्यामुळे चलनाच्या धातूचें प्रमाण एक असणेंहि शक्य नव्हतें. त्यामुळे निरनिराळ्या नाण्यांच्या किमतींत फरक पडे. हा फरक काढून टाकणें म्हणजेच बट्टा देणें किंवा घेणें होय. ह्याशिवाय पूर्वीच्या नाण्यांत हीणकस धातु घालीत नसत. सर्व नाणें शुद्ध धातूचें असे. एक रुपया सवा अकरा मासे रुप्याचा असे. त्यामुळे रुपयाची झीज होण्याचा संभव फार. तसेंच नाणीं पाडणें खासगी लोकांच्या हातीं असल्याने नाण्यांच्या खरेपणाविषयी लोक स्वाभाविकपणें साशंक असत. या कारणानें प्रत्येक वेळेला नाणें तावून सुलाखून घेण्याचा प्रसंग येत असे. अशा वेळीं नाणें छापील झाल्यास आश्चर्य नाही. खोटी नाणींहि पाडीत म्हणजे तांब्याचा रुपया बनवीत, हें एका नोंदीवरून स्पष्ट दिसतें (१४५). जुने मळके रुपये कोरे नवे करण्याचा व्यवहार सारखा चालू असे. अशा कामास जी मजुरी द्यावी लागे तिलाहि बट्टाच म्हणत (१४३,१४४,१४७). सरकारी निरखा-प्रमाणें पाडलेल्या रुपयाला—तो झिजला नसल्यास—बट्ट्याचें कारणच नव्हतें. पोतेचाल हें एका विशिष्ट नाण्याचें नांव नव्हतें. पुऱ्या तोलाचा व वजनाचा रुपया सरकारांत घेतला जाई. त्यालाच पोतेचाल म्हणत. उ. "तुऱ्याचे सरकार पोते-चलनी" (१४०). नुसता पोतेचाल शब्द येतो (१४२) त्यावरून सरकारने मान्य केलेलें धातूचें प्रमाण ज्यांत आहे तें नाणें इतकाच अर्थ पोतेचाल शब्दाचा करतां येईल. आता खासगी टांकसाळी बंद करून सरकारी टांकसाळी धारवाड व नाशिक येथे स्थापन करण्यांत आल्या होत्या हें खरें. ह्या टांकसाळींतून निघालेल्या नाण्यांना पोतेचाल ही संज्ञा प्राप्त होणें साहजिक आहे. परंतु मग "हाली शिक्का देऊन पोतेचाल केले" याचा अर्थ काय ? खासगी माणसाला खासगी रीतीने

पोतेचाल नाणें पाडतां येणें संभवनीय दिसत नाही. आता हाली शिक्का सरकारी टांकसाळेंत देऊन त्याचे पोतेचाल करून घेतले असें म्हणतां येईल. परंतु ही गोष्ट नाशिक धारवाडखेरीज इतर ठिकाणीं शक्य होणार नाही. सरकारी हुकुमाने जें नाणें पाडीत त्याचीं नांवें निराळीं असलीं तरी तें पुऱ्या तोलाचें असावें लागे. ह्यास्तव अशा नाण्यालाहि पोतेचाल म्हणण्यात येत असले पाहिजे. कोरे फरसी ह्या चलनालाहि पोतेचाल म्हटलें आहे (१४३). पोतेचाल ह्या नांवाखाली हाली सिक्का व कोरे फरसी याचा समावेश केला आहे (१४३). ह्यावरून वाटेल त्या शिक्क्याचें नाणें असलें तरी तें सरकारी मान्यतेचें असल्यास त्यास पोतेचाल म्हणत असें दिसतें. आणखी उदाहरणें— ५० रु. मल्हार चिंतामण वैशंपायन नाशिककर याजवर हुंडी केली सदाशिव जोशी यास देवविले नाशिकचाल ते रोख जमा; १२ पोतेचाल सरकारी; ३८ चादवड छापी (श. १७१९) चि.

पोतेचाल नाणे पेशव्याच्या हुकमतीत नसलेल्या प्रांतात चालत असेच असा नियम नाही. पोतेचाल हुंडी नादिवड्यास पटेना म्हणून सिक्का करावा लागला ही हकीकत आपणास पान १४८ वरील नोंदीवरून समजते. पोतेचाल रुपये झिजले तरच त्यास बट्टा पडे. फार करून झिजलेलीं नाणी देऊन नवीन कोरीं नाणी करण्याचा प्रघात फार असावा. सरकारी पोतेचाल याचे कोरे पोतेचाल पोतदाराकडून करविल्याची एक नोंद आहे (१४३). त्यात १०० रुपयाच्यामागे १। रु. खूट आली. नाण्याचें साल नसल्यामुळे वार्षिक झीज काढण्यास साधन नाही.

पान २८३ वर चादवड, सुरती व सिक्का नाण्यांचें जें प्रमाण दिलें आहे त्यावरून सिक्का रुपया सर्वांत किंमतवान असें दिसतें.

वरील कारणांकरता नाण्यांच्या खरेदीविक्रीचा व्यवहार दांडगा चाले. ह्या पुस्तकांत विक्रीचीं उदाहरणें अनेक सापडतील (२८२). जरूर तें नाणें बाजारांत विकत मिळे. बाळंतविड्यावर सोन्याचें नाणें पाहिजे ह्यास्तव खासगीवाल्यांनी होन ३। रुपयास खरेदी केल्याचा दाखला आहे (२८२). बागलकोटी रुपये ३९५९ एकदम खरेदी केल्याची नोंद पृ. १४१ वर आहे.

अरकट रुपया पंढरपुरास चाले असें दिसतें; कारण तेथे सहस्रभोजन घालण्यास अरकटी रुपये नेले होते (१६३).

अंकुश ज्या रुपयावर काढलेला असतो तो अंकुशी रुपया. अंकुशी

चांदवड रुपयाचें नांव होतें असें ज्ञानकोशकार म्हणतात.[1] अंकुशी म्हणजे चिंचवडी रुपाया असें इंग्रज सरकारने १८२७ च्या आरंभीं काढलेल्या जाहीरनाम्यांत म्हटलें आहे[2]. अर्थात् अंकुशी रुपया चिंचवड येथे पाडला गेला पाहिजे असा तर्क वाटतो. परंतु हे रुपये वाई व बागलकोट येथे पाडले जात अशी समजूत असल्याचें खरे लिहितात[3]. ह्याचा अर्थ ही समजूत साधार असल्यास इतकाच कीं चिंचवड रुपाया बागलकोट आणि वाई ह्या गांवच्या टांकसाळींतहि पाडला जाई.

गजापुरी रुपयांचा उल्लेख एकाच ठिकाणीं आला आहे (१४३). इतरत्रहि मला कोठे आढळला नाही. गजापुरी म्हणजे मलकापुरी म्हणतां येईल काय ! गजापूर गांव मलकापुराजवळ आहे. तेथेहि कदाचित् टांकसाळ असेल. गजापुरी रुपये नागाचे केले. कांही रुपयांवर नाग असतो. जे रुपये नागाचे केले त्यांत ८ त्रिशुळी होते. शंकराचा त्रिशूळ हें चिन्ह ज्या रुपयावर आहे तो त्रिशुळी रुपया. ह्याशिवाय १५ बावडी रुपये होते. बावडी म्हणजे बावड्याचे. बावडी, गजापुरी व मलकापुरी एकच असण्याचा संभव आहे. हे गांव जवळ जवळ आहेत. ह्यांत एक भुंडा रुपया आहे. हा भुंडा रुपया नागाचा केला. भुंडा म्हणजे काय ! छाप उडालेला कीं काय !

पुस्तकांत न छापलेली दुसरी नोंद येणेंप्रमाणे :—

रु. ६॥ गजापुरी रुपये ८ जमा पो वजा बट्टा दर रुपयास ०≈ प्रो रु. १॥ बाकी.

चतरसिंगी रुपया हा पुण्याच्या रुपयाहून निराळा होता कीं काय समजत नाही. ह्या रुपयांची नोंद दोनदा आली आहे (१४३). चार शिंगांचें चिन्ह असलेला रुपया होता असें कोणी म्हणत नाही. पुण्याची टांकसाळ चतुःशृंगीला असल्यास पुण्याच्या रुपयाला चतरसिंगी म्हणण्याचा संभव आहे.

दौलताबादी रुपयाचा उल्लेख कल्याण सुभेदारांच्या वह्यांत आढळला तो त्रैमासिक वर्ष ८ पान ५५ वरून येथे घेतों.

१० रु. विनायक गोविंद यास द्यावयास केले रु. २५ पो ऐवज झाडून उगवला नाही सा तूर्त बाकी येणें निघाले रा पो वजा दौलताबाज बारसणीपासून एकोणीसणीपावेतो ऐवज दिल्हा तो उपयोगी नाही सबब बटा चांदवड.

---

१ वि. १६, पृ. १८७. २ शिवाय 'वर्तमान' पाहा. ३ मंडळांतील नाणीं प्रस्तावना पृ. ९.

प्रत्येक जातीच्या चलनाचीं पोटनाणीं होतीं. पैसा, पावला व अधेल्या असत. पैसा अर्थात् तांब्याचा असे. रुका हिशेबांत होता पण नाणें नव्हतें. रुपयांप्रमाणे अधेल्या पावल्यांनाहि बट्टा पडे (१४२).

**पोटनाणीं**

चांदीचें नाणें असल्यामुळे बट्टा पडणारच. ह्या पुस्तकांत दोन आणे व आणा या किंमतीच्या नाण्यांचा उल्लेख नाही. परंतु अशीं नाणीं मुसलमान व हिंदु राजे पाडीत असत[१]. दोन पैशांचें नाणें होतेंच पण अर्ध्या पैशाचें व पाव पैशाचेंहि होतें. इंग्लिश राज्यांतील पै ही रुक्याचेंच अनुकरण होय.

पान १३९ वर सरकारी बट्ट्याचीं तीन उदाहरणें आहेत. तीनहि वैद्यांच्या कागदांतील असून एकाच व्यवहाराची पण निरनिराळ्या वर्षांचीं आहेत. हा व्यवहार सरकार धाऱ्यासंबंधीचा असावा. कुळानें रहिमतपुरी रुपये पाठविले

**सरकारी बट्टा**

त्याचे प्रथम सराफाकडून चांदवड करून घेतले परंतु चांदवड म्हणजे सरकारी पोतेचाल नव्हत. म्हणून सरकारात भरणा करावयास पोतेचाल करणें भाग होतें. चांदवड रुपया व पोतेचाल ह्यामध्ये शेंकडा ५ रुपयांची कसर होती. म्हणजे इतक्या प्रमाणाने चादवड रुपया सरकार निरखाशीं ताडून पाहतां कमी. होता. तिसरी नोंद शाहू शिक्क्याची आहे. कुळाने शाहू शिक्का रुपये दिले त्याचे चांदवड केले. चांदवड करताना बट्टा पडला पण शिवाय सरकारी बट्टा म्हणूनहि आणखी द्यावा लागला. तीनहि उदाहरणात चांदवड चलन मध्यस्थ आहे. ह्या मध्यस्थाची जरुरी काय होती तें समजत नाही. दोन ठिकाणीं परभारा चांदवड केले असें म्हटलें आहे. ह्यांतील परभारा शब्दाचेंहि स्वारस्य समजलें पाहिजे. तीनहि नोंदींतील कुळें निरनिराळीं आहेत.

एकाच टांकसाळींत अनेक शिक्क्यांचीं नाणीं पाडीत हें अनेक उदाहरणांवरून सिद्ध करतां येईल. पा. १४५ वर बेलापुरी रुपय ५० मल्हारी शिक्का अशी एक नोंद आहे. त्याचा अर्थ मल्हारी शिक्क्याचे पण बेलापुरास पाडलेले रुपये असाच केला पाहिजे. एका शिक्क्याचे रुपये दुसऱ्यांनी पाडूं नयेत असा

---

१ कलकत्त्याच्या नाण्यांच्या संग्रहावरील राइटसाहेबांचें इंग्रजी पुस्तक ग्रंथ ३, प्रस्तावना २६ व पानें २२६,१०८,१०७.

निर्बंध दिसत नाहीं. ज्यांना सनद दिली असेल त्यांच्या व्यतिरिक्त इतरांनी नाणीं पाडतां कामा नये इतकेंच बंधन असे.

मोहरांचीं नांवें आलेलीं येणेंप्रमाणे--

**सुवर्णचलन** पंचमेल, औरंगाबादी, गंजीकोट, वज्रजोगणी, लातुरी, आजमेर, आमदाबादी, हाली सिक्का, महमदशाही, अहमदशाही, शेटशाही, दरसानी, दिल्ली शिक्का ( ७६, १४२, १४३, २१२ ). ह्यांशिवाय होन व पुतळी हीं सोन्याचीं नाणीं होतीं. पुल्हेवटी होन (१३०) हें एकच होनाचें नांव आलें आहे.

सरकारी सनदेशिवाय रुपये पाडतां येणें शक्य नव्हतें असें दिसतें. परंतु वाईट रुपये चांगले करावयाचे झाले तर टांकसाळवाल्याकडेच गेलें पाहिजे काय हा प्रश्न विचारण्याजोगा आहे. रुपयांची दुरुस्ती करणारांवर निर्बंध असल्याचा दाखला नाहीं. दुरुस्तीचा धंदा बहुदा सराफच करीत असतील ही डागडुजी कोणत्या तऱ्हेची असे ह्याची यथार्थ कल्पनाहि करतां येत नाहीं. फुटका रुपया पाऊण आणा खर्चून दाणेचाल केला ( १४४ ) म्हणजे काय केलें असेल ? फुटलेली बाजू भरून काढली काय ? असें असल्यास हल्ली ज्या अर्थानें आपण खोटा रुपया म्हणतों त्या अर्थानें खोटा शब्द पूर्वी वापरीत नसत हें उघड होतें. तांब्याला रुप्याचा मुलामा देऊन रुपया म्हणून पुढे आणला तर त्यालाच फक्त खोटा रुपया म्हणत असत. टांकसाळींतून पाडलेल्या रुपयांत ढवळाढवळ झाली तरी तो खोटा रुपया मानण्यांत येत नसे. ह्यावरून असें निष्पन्न होतें की, रुपयाच्या वरील शिक्क्याची फारशी मातब्बरी नव्हती. शुद्ध धातु नाण्यांत किती आहे एवढ्याच गोष्टीचें महत्त्व मानीत. नाणें पाडण्याचा हक्क केवळ सरकारचा आहे हा सिद्धांत जेथे मान्यता पावला नाहीं तेथे उपर्युक्त प्रकार अनुभवास येणें स्वाभाविक आहे.

## ११

कर्ज देण्याघेण्याचा व्यवहार फार मोठ्या प्रमाणावर चालत असे. खुद्द

**सावकारी व्यवहार** सरकार व त्यांचे सरदार दरकदार ह्यांना नेहमी कर्ज काढावें लागत असल्यामुळे सावकारी धंदा करणाऱ्या पेढ्यांचें जाळें राज्यांत निर्माण झालें. ब्राह्मण सावकारहि पुष्कळ होते. लाखो रुपये एका रकमेने ते कर्ज देत. रकम फार मोठी असल्यास तीन चार सावकार मिळून समायिक कर्ज देत. ह्यात-

वर कर्जाऊ रकमा देत. परंतु बहुधा खतें लिहून घेऊनच कर्ज देण्याचा प्रघात होता. वचनचिठ्ठीचा प्रकार मात्र आढळत नाही. कर्जरोखे व गहाणखतें हींच मुख्यतः असत. तारण गहाण असे तसेंच कबजे गहाण असे. "व्याजाच्या ऐवजी मौजे मजकूरचा ऐवज गोसावी यांचीं खासगत शेतें वजा करून घ्यावा" (१२१). कर्ज फेडण्याची मुदत नमूद केलेली असे. रासमाथा ( सुगीवर ), आळंदीची यात्रा अशासारखी मुदत असे. हातावरील कर्जाला थोड्या महि-न्यांची मुदत ठेवण्यांत येई. मुदतींत कर्ज न दिल्यास गहाण डुबत असे. मुदत संपली तर गहाण नष्ट होत नाही ही समजूत नव्हती. मुदतींत कर्जफेड न झाल्यास सावकार खतांत नमूद केलेली मिळकत आपल्या कबजांत घेई.

स्थावर मिळकत व कुळकरणासारखीं वतनें कर्जाकरता गहाण टाकीत. जंगम मालांत सोनें, पागा, तरवार, कापड हीं गहाण टाकलेलीं आढळतात. कुळकरण गहाण टाकल्याचें उदाहरणः—४०० रु. जमा भगवंतराव देशपांडे... ...मल्हार बाबाजी तटु याचें कुळकरण मौजे डोबले गहाण होतें तें सोडवून सीवाजी नारायण यांजकडे ठेवून वगैरे...... (तु. बा.)

सोनें गहाण ठेवल्यास आठ आणे व्याजाने पैसे मिळत. एरव्हीं १, १।, १॥, १॥।, २, २॥ रु. दरमहा दर शेकडा अशा दराने व्याज द्यावें लागे. सयाजीराव गायकवाडला लाख रुपयांच्या कर्जाला १। रु. दराचें व्याज होतें. किरकोळ रकमांना व्याजादाखल धान्यहि घेत. "बाजार निरखापेक्षा १ शेर रुपयास जाजती" (१२८) हेंच व्याज. तेल्यास कर्जाऊ रक्कम दिल्यास ठरलेल्या भावाने ठरीव मुदतीपर्यंत तेल घेत. भाव उतरल्यास उतरत्या भावाने पण चढल्यास कराराच्या भावाने अशी शर्त घालीत (१२७). ज्या नाण्यांत कर्जाची रक्कम दिली असेल त्याच नाण्यांत ती परत करण्याचा करार कधी कधी करीत (१४६).

कर्ज देतांना मनोती कापून घेत. मनोतीचा दर शेकडा १ पासून २ रुपयांपर्यंत असे. (१३४, १२८).

कर्जफेडीच्या वेळीं सूट देण्यांत येई; तथापि बिनसुटीची शर्त असल्यास सूट देत नसत. कर्जफेडींत मामलत लावून घेण्याचाहि प्रघात होता. "दीड महिन्यांत एकोत्रा व्याजाने व्याजमुद्दलसुद्धा रुपये न फेडल्यास ९ गांवचे मामल्याची सनद द्यावी." (१२२)

प्रामाणिकपणा बऱ्याच प्रमाणांत होता. दंग्याच्या भीतीने दुसऱ्यापाशीं ठेव ठेवीत. अशा ठेवी तो मनुष्य मेल्यावर त्याच्या स्त्रीने कबूल करून परत दिल्याचीं उदाहरणें नमूद आहेत (१२९).

कर्ज वसूल करण्यास हल्लीप्रमाणे कोर्टें नव्हतीं. फार करून सावकारालाच वसुलीचा उपाय करावा लागे. हा उपाय म्हणजे धरणें बसणें हा होय. लोकांच्या त्या वेळच्या समजुतींवर ह्या उपायाची उभारणी केलेली दिसते. सावकार कर्ज मागण्यास कुळाकडे आपला नोकर अथवा इतर कोणी पाठवी. हा मनुष्य कुळाच्या घरांत चोवीस तास उपाशी बसून राही. ओटीच्या पुढल्या दरवाजांत बसे. घरांत कोणी उपाशी राहिल्यास घरांतील माणसांनाहि उपवास पडे. आपणांस उपोषण घडतें व दुसरा उपवासाने तळतळत आहे ह्याचा परिणाम आपणांस भोगावा लागेल ह्या भीतीने कूळ हरप्रयत्न करून कांही तरी वसूल देई. कधी कधी स्वतः यजमान धरणें धरून बसे. कुळाने चटकन पैसे द्यावे म्हणून धरण्याकरता परजातीच्या माणसाचा उपयोग करीत (१३०). ऋणकोस उपोषण पाडणें ह्याला क्षेत्र करणें म्हणत (१२६). चिपळूणकर आपल्या कैफियतींत लिहितात "नंतर आम्ही कासीकर याचे दुकानी जातीनिसी (घरांतील) थोर थोर मंडळी व कारकून मंडळी मिळोन तगाद्यास तीन दिवस उपाशी बसून ........" (१२७). एका माणसाकडे चिपळूणकरानी २० क्षेत्रें केलीं. "कांही वेळां उपोषित मजबरोबर बसले होते व काही वेळां जेवले" (१२६). एका भिक्षुकाने आपले पैसे वसूल होत ना हें पाहून गणपतीच्या देवळांत उपोषणें करण्यास सुरवात केली. ही वार्ता श्रीमंतांच्या कानावर गेली. तेव्हा "आज्ञा जाली की भटजींचे रुपये (कुळाकडून) देववावे" (१२६).

## १२

**वाहनें**

घोडीं व डोल्या हीं मनुष्याच्या प्रावसाचीं साधनें होत. मालाची ने आण उंटें व बैल ह्यांवरून होई. बैलगाड्या फारशा प्रचारांत नव्हत्या. नागपुरास जाण्यास डोलीला खंडित रुपये ८५ ठरले होते, परंतु कुंभकोणचें भाडें २० रुपयेच दिसतें. गुळसुंद्याहून पुण्यास जाण्यास डोली व घोडी मिळून ११। रु. भाडें पडलें होतें. चालण्याच्या कामांत घोड्याशीं माणसें स्पर्धा करीत. पुण्याहून सातारा ७० मैल आहे. हा सत्तर मैलांचा प्रवास एका दिवसांत करणारे लोक होते (१८३). नेवाशाहून

दोन दिवसांत जासूद चालत आले म्हणून त्यांना १॥ रुपाया इनाम मिळालें आहे (१८३). परिस्थितीमुळे गुण उत्पन्न होतात आणि परिस्थितीमुळेच नष्ट होतात. घोडा दुसऱ्याला वाहून नेतो पण मनुष्य आपल्यालाच वाहून नेतो ही गोष्ट खरी. तथापि निरोप जलद पोचावा असा हेतु असल्यास थोडक्या पैशांत मनुष्य पाटवूनच तो हेतु साध्य होतो. म्हणून डाकेवर जासुदांची योजना होत असे. लांबच्या प्रवासांत पालखीबरोबर निदान आठ असामी असत असें दिसतें. भोयाला रोज आठ आणे असे (२६०). प्रवासाचा काही खर्च येणेंप्रमाणे-- ८ रु. सौ. बहिणीबाई यास सातारा येथे पोचवून येण्यास (३०८). ६८~ वाट-खर्च वाइर्स जातायेतां. ५०।≈ उंटावर बाजरी आणली तिकडे. हा खर्च श. १७१८ सालांतील पुण्यापासूनचा आहे. बाजरी पुण्यास आणली. कोठून तें समजण्यास मार्ग नाही. घोड्याच्या गाडीचा एकाच ठिकाणीं उल्लेख आलेला आहे (३०८).

## १३

**टपाल**

सर्व हिंदुस्थानभर पेशव्यांच्या फौजा फिरत असल्यामुळे इकडून तिकडे बातमी पोचविण्याची व्यवस्था करणें भाग होतें. त्यामुळे ठिकाठिकाणीं लोक ठेवून पत्रें पाठविण्याची योजना अंमलांत आली होती. बातम्या आणण्यापोचवण्यासाठी मुद्दाम माणसें ठेवीत त्यास डाक ठेवणें म्हणत. कोकणांत बातम्या आणण्यासाठी मचवे ठेवलेले असत त्यास बातमीचे मचवे म्हणत ( पे. रो. पुस्तक ८, पान २२० ). अमुक दिवशीं मचवे परत आलेच पाहिजेत किंवा अजूरदाराने अमुक मैल चाललेंच पाहिजे असा नियम असे. सरकारच्या जरुरीकरता डाकेची पद्धति प्रथम अस्तित्वांत आली. खासगी खुशालीचीं पत्रें पाठविण्याची अडचण तेव्हा लोकांना भासत नसे. यात्रेला निघाल्यावर मात्र घरची खुशाली आपल्याला व आपली खुशाली घरच्या माणसांना कळवावी असें वाटणें स्वाभाविक होतें. ही गरज भागविण्या-साठी आठवले ह्यांची काशी ते पुणें डाक स्थापन झाली असावी. सरकारी व सावकारी अशा दोन डाका निर्माण झाल्या. ह्या पुस्तकांत डाकेचा पहिला उल्लेख श. १७०१ मधील आहे ( ९३ ). ह्या पुस्तकांत कल्याण ते काशी, कल्याण ते मुंबई, पुणें ते नाशिक त्र्यंबक, ग्वाल्हेर-सातारा इतक्या डाकांचा उल्लेख आलेला आहे. पत्रें तोलून वजनावर हाशील घेत. चार आणे तोळा असें हाशील असे.

उ. ८≈ पत्रें रवाना पुणें मिा ७ चैत्र ( श. १७४७ ) वजन तोळे पाऊण. ·॥·
पत्रें रवाना पुण्यास आठवले यांचे डाकेवर पौष शुा १ वजन तोळे २ दर ·।· प्रमाणे. पान ९३ वरील पहिल्या रकमेवरून चार आण्यांहून निराळा दर होता कीं काय असा संशय येतो; परंतु ती रक्कम तपशीलवार नसल्याने कांहीच सांगतां येत नाही.

इंग्लिशांच्या अंमलानंतर म्हणजे श. १७७० पावेतो सावकारी डाका होत्या (९४). इंग्रजी डाकेचा पहिला निर्देश ह्या पुस्तकांत श.१७५५ चा आहे (९३). तिकीट न लावतां म्हणजे नाटपेड पत्र पाठविलें असता तें खात्रीने पोहचेल अशा समजुतीने इंग्रजी डाकेंत नाटपेड पत्रें पाठवीत. अशा पत्रांची पावती पत्रें पाठविणारास टपालखात्याकडून मिळे (९४). थोरलें टपाल (९४) म्हणजे इंग्रजी टपाल असावे. ह्याच पानावर पुण्याच्या जनरल पोस्ट ऑफिसाचा स्पष्ट उल्लेख आहे. तो. स. १८५२ चा आहे. डाकेच्या पत्रव्यवहाराकरता दौलताबादी कागद वापरीत असें दिसतें (९३).

सावकारी डाकेंत विमा उतरून जिन्नस पाठविण्याची रीत होती ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. मालाच्या किंमतीवर शेकडा दोन रुपये एक आणा हा विम्याचा दर होता (९४, ९५).

जेथे डाक नसेल अगर डाकेचें हाशील भरमसाट असेल (९५) तेथे जासूद पत्रें देऊन पाठवीत. एका जासुदाजवळ अनेक लोकांचीं पत्रें असत. ज्याला पत्रें पाठविलीं असतील तो पत्रें घेऊन येणाऱ्या जासुदाला पैसे देई. पत्रें पाठविणाराने कांही द्यावयाचें नाही. ही सवयच पुढे नाटपेड पत्रें पाठविण्यास कारणीभूत झाली असावी.

जासुदाबरोबर आलेल्या पत्रांकरता विशेष द्यावें लागत नसे. उ. ४- परशराम हरि देवधर यांचें पत्र हिंदुस्थानांतून आलें त्या जासुदास. परंतु परत पाठवितांना ·।· खर्ची पडले आहेत. ·।· ज्येष्ठ वा ४ शके १७५६ परशरामपंत ढमढेरे उर्फ देवधर याजकडे पत्र रवाना सिंदे अलिजाबहादर यांचे लष्करांत.

काशीहून कागद घेऊन आलेल्या कासीदास ८= मिळाले आहेत (६६).

पत्राचा मालक मिळाला नाही आणि त्यामुळे पत्र परत आलें तर निराळें हाशील द्यावें लागे; उ. ·।- हाशील डाकेचें. पुण्याहून लखोटा मुंबईस पाठविला होता तो तेथे स्वारी नाही म्हणून पुन्हा पुण्यास आला. त्याबद्दल देणें आठवले यांस ज्येष्ठ शुा ९ (१७४७). (वैद्य)

पत्र घेणाराने अमुक हाशील द्यावें असें पत्रावर लिहीत; उ. ८= हाशील खर्च डाकेचीं पत्रें पुण्याहून..... याणी पाठविलीं त्याजवर लिहिलें होतें की हाशील देणें त्याजबद्दल दिले. किता

पत्ते लिहिण्यांत पत्रें पाठविणारांना बरीच सवलत असे. थत्यांना पाठविलेल्या पत्राच्या लखोट्यावर 'थत्ते न मिळाल्यास चिपळूणकरांनी त्यांस ते असतील तेथे पाठवावा' असा मजकूर आहे (२७९).

पत्रांचें आगाऊ हाशील भरण्याची सवय लोकांना हळूहळू लागत होती व त्याबरोबर इंग्रजी शब्दहि वापरांत येण्यास सुरवात झाली होती उ. ८―॥ येथून पत्रें रवाना केलीं तीं पोस्ट पेट पत्रें २. ह्याच्या उलट इतक्याच पैशांत मुंबईहून ३ पत्रें आलीं आहेत. ८―॥ मुंबईहून पत्रें आलीं त्याजबा पत्रें ३ दर ८॥· हीं डाकेचीं पत्रें श. १७७४ चीं आहेत.

इ. स. १८६७ व १८६८ ह्या दोन सालांचे जत व औंध संस्थानांचे वार्षिक रिपोर्ट माझ्या पाहण्यांत आले. त्यांत ह्या संस्थानांत टपालाची काय व्यवस्था होती ह्याची माहिती दिली आहे ती अशी:—

**जत संस्थान**--रयत लोकांचे लखोटे पोहचविण्यास पोष्ट हपीसचे कारकुनास इकडून पंधरा रुपये पगार मिळतो. त्याचे हाताखाली दोन शिपाई सात रुपये दर महाचे नेमिलेले आहेत. त्यांस इकडूनच पगार मिळतो. ते गांवगन्ना जाऊन लखोटे पोचवितात. त्याबद्दल ठरले हाशिल।खेरीज जाजती कांही घेण्यांत येत नाही.

**औंध**--रयत लोकांचे लखोटे ठाण्यांतील मामलेदारमार्फत पट्टेवाल्याकडून पोचते करवून दर एक आणा प्रमाणे हाशील घेण्याची रीत ठेविली आहे.

ईस्ट इंडिया कंपनीचा पोस्टाचा कायदा स. १८३७ त झाला हें खरें परंतु त्याच्या अगोदर इतर खासगी डाकांप्रमाणे कंपनीचीहि खासगी डाक होती हें मागे सांगितलेंच आहे. प्रथम स. १५४५ च्या पूर्वी हिंदुस्थानांत शीरशाहाने डाक स्थापन केली व त्यासाठी बंगाल ते सिंधपर्यंत दोन हजार मैल सडक तयार केली असें मुसलमानी रियासतकार सांगतात. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत डाकेचा उल्लेख दिसत नाही.

## १४

चोरी, मारामारी, खून, शिवीगाळी, व्यभिचार, बेअब्रू करणें, अतिक्रमण,

**गुन्हे** आत्महत्या, मनुष्य पळवून नेणें, नोकरीचा करार मोडणें, मुक्या जनावरांस इजा करणें, बलुत्याचीं कामें न करणें, गांव सोडून जाणें, सरकारी कायदे मोडणें (उ. परवानगीवांचून तंबाखू कापणें अगर खरीपाचा माल तयार करणें), गाय नांगराला धरणें, वजनमापांत फसवणें, दुसरे गांवची सोयरीक करणें (२१५), अशा प्रकारचे गुन्हे तर होतेच परंतु खोटीं भुतें घालणें अथवा भुतें घातल्याचा खोटा आरोप करणें हेहि गुन्हे मानले जात. कांही गुन्हे प्रासंगिक स्वरूपाचे असत. उ. इंग्रजांकडे चाकरी धरणें हा गुन्हा समजून त्याबद्दल पारिपत्य करण्यात येई (१०५). त्याचप्रमाणे कराराच्या बाहेर काम करणें हें गुन्ह्यात गणलें जाई (२७५). चाहाडी करणें हा गुन्हाच होता (२९४).

गुन्ह्याबद्दल शिक्षा दंडाची असे. खून केला असताहि दंड करण्यांत येई. १ रुपयापासून ४०० रु. पर्यंत दंडाची रक्कम गेली आहे. ज्याचें नुकसान झालें असेल त्याला दंडापैकी काही रक्कम देण्याची वहिवाट होती (१०६). राजद्रोहाच्या गुन्ह्याला तुरुंगाची शिक्षा असे हें खरें परंतु त्याखेरीज अन्य कारणांकरताहि तुरुंगांत टाकीत असावे असें मानण्यास जागा आहे (९२). तुरुंगांतून गुन्हेगारांस सोडावयाचा झाल्यास जामीन घेऊन सोडीत (कित्ता). अवश्य तेथे गोताच्या संमतीने अपराधाची चौकशी करीत (१०३). चोरी करणाऱ्यांचा पत्ता न लागल्यास सर्व गांवाला नुकसान सोसावें लागे (१०२, १०३, १०६). कधी कधी कमावीसदार फिर्यादी होई (१०२). भिल्लांचे वगैरे उपद्रव मोडण्याची जबाबदारी जमीदारांवर असे असें दिसतें (१०२); म्हणजे जमीदार हे वतनी पोलीस अधिकारी होते. उचल्यांकडून म्हणजे ज्यांना निर्वाहाचें साधन नाही अशा लोकांवर सरकारी नियंत्रण असे (१०६). व्यभिचाराबद्दल स्त्री व पुरुष दोघांनाहि दंड होत असे (१०५). आरोप शाबीत झाला नाही तर खोटा आरोप करणारा शिक्षेस पात्र होई (१०४). "पोवार माली याचे कोपींत कोणी नसतांनी तेथे बसल्याचें कारण काय सा गुन्हेगारी" (१०४). ह्यावरून लहानसानहि दुराचरण खपत नसे असें उघड होतें. मुलाने आपल्या आईजवळ गैरसनदी कटकट केली ह्या दोषामुळे त्याला आठ आणे दंड झाला आहे. हा मुलगाहि मांग जातीचा होता. खरीपाचा माल करण्यास सरकारची परवानगी लागत असे असें दिसतें.

कोणाला न कळत दुसऱ्याकडून इजा झाल्यास त्याची पैसे देऊन समजूत करण्यांत येत असे. खाजगीवाल्यांचा बारगीर घोडीवर बसून हजिरीस जात

असतां एका कुणबिणीस धक्का लागला आणि ती पडली सबब तिला एक रुपया देण्यांत आला (२९९). पृ. २९४ वर गुन्ह्यांचीं कांही उदाहरणें सांपडतील. शिंदळकीबद्दल १५० रु. दंड केलेला आहे, आणि तो शिंदळकी करणाऱ्या बाईला.

इंग्रजांचें व मराठ्यांचें वैर आल्यामुळे इंग्रजांकडे काम करणाऱ्या माणसांस दंड करण्यांत आला होता. तळ्याच्या दोन मुसलामानांनी इंग्रजी राज्यांत "तरी वगैरे खोती" केल्या सबब त्यांच्यापासून ७५ रु. खंड श. १७०६ मध्ये घेण्यांत आला (१०५). कुंभाराने महालक्ष्मीचे मुखवटे आणून दिले नाहीत त्यामुळे त्यास सवा रुपया भुरदंड पडला (१०६).

मसाला, खंड व गुन्हेगारी हे तीन शब्द दंडाच्याऐवजी वापरीत. ह्या तीन शब्दांच्या अर्थात कांही भेद असल्याचें दिसत नाही. ह्याशिवाय खंडफरोई हा एक शब्द व्यवहारात असे.

दिवाणी

पैसा व वतन ह्यांबद्दलचे दावे बहुशः असत. सरकारच्या परवानगीवांचून कोणालाहि दत्तक घेतां येत नसे (१०८). हरकत दूर करून मागण्याचे दावेहि अपरिचित नव्हते. मनाई हुकुमाची दाद मागण्यापर्यंत लोकांची मजल गेली होती (१०२). कोणी बिनवारस मयत झाल्यास त्याची मिळकत सरकारकडे जावयाची (१०३,२६५). दिवाणी दाव्याचा निकाल हुजूरकडून प्रसंगीं लावून घेत (१०६). हा बंधाऱ्याबद्दल कज्या होता. ह्या दाव्याच्या चौकशीसाठी कारकून व प्यादे पाठविले होते. त्यांचा रोजमुरा ३५३ रु. झाला.

दिवाणी व फौजदारी खटले चालविण्याचा अधिकार जाहागीरदारांना असे (११४). श. १८४० सालीं दाभाड्यांच्या अदालतींत दावा दाखल केल्याचें उदाहरण आहे:—

दाभाड्यांची अदालत

अदालत संस्थान तळेगांव

गव्हाची फिर्याद

मुदल बीज गहूं कैली ८१। दर ८।= प्रो रु. ३ वाढ शके १७५७ कार्तिक शु १३ ता शके १७६२ आषाढ वा ५ पावेतों सवाप्रमाणे आकार गहूं कैली ८१॥।॥ दर ८।= प्रो रु. ३८१२ पैकी वजा बट्टा दर शेकडा १८८ प्रो आकार रु. ८१८८ बाकी कंपनी रु. ६८१०८४.

फिर्यादीचा दस्तुर नारो कृष्ण कीबे वकील कोर्ट कसबें चाकण.

ता. २०-७-१८४०

कज्या हरणारापासून सरकार कर घेई त्यास हरकी म्हणत (११६). ह्या सोनाराच्या पोतदारीच्या हक्कासंबंधीच्या दाव्यांत चिटणीस व मजमदार यांना कारकुनी मिळालेली दिसते (११७).

१५

**दानधर्म**

पेशवाईचें वर्णन करावयाचें झालें तर तें दंगेधोपे, लढाया, युद्धें, दानधर्म, हव्यकव्य ह्यांच्या दंगलीचा काळ असें थोडक्यांत करता येईल. भिक्षुक, शास्त्री पंडित, हरिदास पुराणिक ह्या सर्वांचे उच्च ग्रह एकादशस्थानीं ह्या काळांत आलें होते असे वाटतें. अन्नसंतर्पण, दानें, व्रतवैकल्ये, प्रायश्चित्त वगैरें प्रकार सारखे चालू होते. द्रव्याला स्पर्श न करणाऱ्या संन्याशांच्या समोरहि द्रव्याच्या राशी पडत. शृंगेरी मठाच्या श्रीशंकराचार्यांना ५०० रु. एकदा मिळाले आहेत. शंकराचार्य धोतरें नेसत असावे; कारण १८ रुपयांचा धोतरजोडा त्यांस अर्पण केलेला आहे (१६१). शंकराचार्य आपल्या पूर्वाश्रमींच्या कुटुंबासुद्धा पंचवटीच्या मठांत राहत असें दिसतें; कारण त्यांच्या लेकीस १ रु. किंमतीचा पैठणी खण दिल्याची नोंद आहे. (२१४). त्रिलोचनानंद स्वामींची तर सावकारी होती (१६२).

स्वामींप्रमाणे अग्निहोत्र्यांचाहि परामर्श घेण्यांत येत असे. एका अग्निहोत्र्याला ३२० रु. देण्यात आले (१६४). श. १७१० च्या भाद्रपदांत १२ रु. अग्निहोत्री वारले त्याबा म्हणून खर्च पडले आहेत.

यज्ञहि केले जात. २५ रु. यज्ञाकरता दक्षणा श. १७१९ अश्वीन. तसेंच १० रु. यज्ञ केला त्याच्या दर्शनास, धर्मादाय तात्या यांनी ठेविले. शके १७१० माघ.

**तुलादान**

तुलादान करणें हें ऐपतदार गृहस्थ आपलें कर्तव्य समजे. तुलादान करणें म्हणजे आपल्या वजनाइतक्या वजनाचें द्रव्य दान करणें. ११२४३ रुपये तुलादानाचे नांवें पडले आहेत. तुलादान करणाराचें इतकें वजन असलें पाहिजे (१६४). हे रुपये होते. सरकारी तुलादान होनांचें झालें त्याचा निर्देश

पा. २४१ वर आहे. तुलादानांतून देवालयें कधी कधी बांधला जींत हें त्यांतल्या त्यांत समाधानकारक समजलें पाहिजे. तुलादान व तुलापुरुषदान एकच. तुलादानाने स्वर्गप्राप्ति होऊन पुनः जन्म घेतल्यावर भूपतिपद प्राप्त होतें.

**तोडगे**

आजार घालविण्याकरता अनेक तोडगे करीत. दानधर्मापेक्षा तोडग्यांचा उपाय हीन संस्कृतिदर्शक आहे. शिशाचीं यंत्रें आजारी मुलाच्या गळ्यांत बांधलीं म्हणजे रोगपरिहार होतो अशी समजूत होती. ह्याखेरीज दारू व मांस अंगावरून ओवाळून टाकीत (१८०). मुलीला झालेला वारा जावा म्हणून दोन कोंबडीं ओवाळून टाकलेलीं आहेत (२१६). कल्याणच्या सुभेदारांच्या वहींत जरीमरीच्या पूजेनिमित्ताने बारा आणे खर्च पडले आहेत.

**अनुष्ठानें**

महामारीचें अनुष्ठान, प्रदक्षिणेचें अनुष्ठान (१६५). पर्जन्यासाठी अनुष्ठान (१६४). अशीं नाना प्रकारचीं अनुष्ठानें मोठ्या खर्चाने करण्यांत येत. एका अनुष्ठानाला ४५० रु. (१७५) व हरिपंत फडक्यांनी सिद्धटेकला केलेल्या अनुष्ठानाला ५०० रु. खर्च झाले आहेत.

**प्रायश्चित्त**

आपल्या हातून अधर्म घडला म्हणजे जो दंड द्यावा लागतो त्यास प्रायश्चित्त म्हणतात. गाईच्या गळ्यांत दावें असतांना तिचा प्राण जाऊं देणें हें पापदायक समजत. अशा प्रसंगीं जबाबदार माणसाला प्रायश्चित्त घ्यावें लागे (१७३). नालबंद घोडा मरण पावणें हेंहि पाप समजून प्रायश्चित्त घ्यावें लागे.

**शांति**

कित्येक गोष्टी अनिष्टसूचक समजल्या जात. अशा गोष्टी घडल्या असतां त्यांचे अनिष्ट परिणाम भोगावे लागूं नयेत म्हणून शास्त्रकारांनी शांतीचा उपाय सांगितला आहे. दक्षिणाभिमुख केळ विणें, अंगावर पाल पडणें, घरांत मोहळाच्या माशा बसणें हे आपत्तिकारक प्रसंग होत. ह्यांच्या शांतीचा उल्लेख १६६, १६७ व १७० पानांवर आलेला आहे. दक्षिणाभिमुख लोंगर केळीने टाकलें तर ग्रामपति मरतो अशी समजूत[1] (यदा याम्यमुखा देवी कदली तु प्रसूयते । तदा ग्रामपतेर्नाशं विदधाति न संशयः ।). केळ ही असुरकुलोत्पन्न आहे असें येथे म्हट-

---

१ शांति कमलाकर.

झालें आहे. पाल पडण्याने पांच रात्र व्याधिपीडा होते. मोहोळाच्या माशा घरांत बसल्याने कोणतें अरिष्ट ओढवतें समजत नाही.

**कावडी**

कावडी टाकण्याचा एक धंदा होऊन बसला होता. काशीहून पुण्यास २४ कावडी आणल्या त्यांची मजुरी दर कावडीस २० रु. प्रमाणे व पुण्याहून रामेश्वरास त्याच कावडी घेऊन जाण्याची मजुरी ४० रु. प्रमाणे होती. म्हणजे काशीची एक कावड रामेश्वरास नेऊन टाकावयाची तर ६० रुपये खर्च येत असे. पुण्यास हरिद्वाराहून गंगोदकाच्या कावडी स्नानाकरता व पिण्याकरता आणीत असत (१६५).

**कांही चाली**

घोडी व्यायली असतां पांचवीपूजन करीत. तसेंच गर्भाधानप्रसंगीं नायकिणीची ओटी भरण्याची वहिवाट होती (२१५). ही अखंड सौभाग्यवतीची म्हणून ओटी भरण्यांत येत असावी ! पिंपळाप्रमाणे निंबवृक्षाची मुंज लावीत. (१८१). ब्राह्मणाकडून नमस्कार घालविणें हा आरोग्यप्राप्तीचा आणखी एक उपाय मानण्यांत येई. सूर्याला १२००० नमस्कार घातले पाहिजेत. नमस्काराचा दर हजारीं रुपया असे (१७०).

**ज्योतिष**

ज्योतिषावर विश्वास बराच होता. पुष्कळ पैसे खर्च करून जन्मपत्रिका करून घेत. ४०-५० रुपयेपर्यंत पत्रिकाकरणावळ मिळे (१६६, १६९, २६२). नवी पत्रिका केली म्हणजे तिचें पूजन केल्यावर श्रवण करण्याचा विधि होई. ह्यानंतर गोचरीचा ग्रह अनिष्ट आल्यास यथाशास्त्र दानें अथवा जप करण्यांत येई. राहु अष्टम म्हणजे मृत्युस्थानीं आला म्हणून दानें, गुरु पालटला म्हणून साखरदान, शनि पालटला म्हणून वडेदान, दुसऱ्या एका ग्रहाकरता उदककुंभदान वगैरे प्रकार (१८१) मनोरंजक वाटतात. गुरु पालटला त्याच दिवशीं आसवलीकांठी दुपेट्याला पिवळा रंग देण्यांत आला. गुरूला पिवळा रंग प्रिय आहे. वर शनिप्रीत्यर्थ वडे तळले त्यांस साजूक तेल उपयोगांत आणलें होतें; घाणेरडें तेल वापरलें नाही, ह्यावरून श्रद्धेने शास्त्राज्ञा पाळीत असें दिसतें. राशीला ग्रह वाईट आले सबब एक लाख नवग्रह जप २५ रु. खर्चून करण्यात आला (१६९). दुष्टग्रहशांत्यर्थ तुळशीबागवाल्यांनी जप करविला त्यास ३०० रु. दक्षणा देण्यांत आली (१७०). ह्याशिवाय ४॥ रु. जन्मस्थ गुरु आला सबब दान (श. १७१० श्रावण)

व १॥ रु. षडग्रहीबद्दल (श. १७१९ ज्येष्ठ) अशा नोंदी आहेत (३०७). पाडव्याच्या दिवशीं पंचांगश्रवणाची वहिवाट होती (३०२). परंतु "दिपवाळीचें पंचांग श्रवण" केल्याचेंहि आढळतें (१६९).

प्रत्येक कृत्य मुहूर्त पाहून होत असे. वासुदेव बापूजी चिपळूणकर ह्यांना सातान्यास राजदर्शन घ्यावयाचें होतें. परंतु चांगली वेळ मिळेना. दुसऱ्या दिवशीं चार घटका रात्रीस मुहूर्त होता. तेव्हा राजदर्शन घेण्याचें त्यांनी ठरविलें (२१७). चिपळूणकरांची भेट घेण्यास राजांनी मुहूर्त पाहिला होता कीं नाही हें समजण्यास मार्ग नाही! कल्याणच्या सुभेदारांना आपल्या नव्या वाड्यांत प्रवेश करण्यास "नवघटका रात्रीं" मुहूर्त मिळाला (१७०). प्रयाणाच्या वेळीं देवापुढे द्रव्य ठेवीत. परंतु कल्याणाहून पुण्यास जातांना सुभेदारांनी जरीमरीला व हनुमंताला तीन दिडक्याचा शेंदूर लावला होता (१६९). आपणांस पाहिजे तेव्हा मुहूर्त मिळत नसल्यास प्रस्थान ठेवण्याची चाल होती. सुभेदार हे प्रस्थानीं आंबेडकरांच्या घरीं मध्यरात्रीस गेले व तेथे ब्राह्मणांना दक्षणा दिली. घातचन्द्रावर प्रयाण करण्याचा प्रसंग आल्यास तांदूळ दान करीत. तसेंच प्रयाणसमयीं रोगपंचक असल्यास रौप्य दान करीत (१७५).

**ब्राह्मण-भोजनें**

सहस्रभोजनें वारंवार होत; परंतु लक्ष भोजनेंहि घालण्यांत येत. खाजगीवाल्यांनी लक्ष भोजन घातलें. हें भोजनसत्र दोन वर्षें चाललें होतें व त्या निमित्ताने १४०८२ रु. खर्च पडले आहेत (१६९). एवढाच खर्च असल्यास एका रुपायांत सात ब्राह्मण जेवले असें होते. आचारी, वाढपी ह्यांचे पगार व भोजनदक्षणा ह्यांचा ह्या रकमेंत समावेश झाला असल्यास हा फार कमी खर्च आहे, असें म्हणावें लागतें. सहस्रभोजनाचा उल्लेख पा. १६३ वर आला आहे. ह्याखेरीज हुजूर पोत्यांतून एकदा ५००० रु. ब्राह्मणभोजनासाठीं गेल्याची नोंद ह्याच पानावर आहे. तसेंच ३५२६ असाम्यांची भोजनदक्षणा ६९ रु. पडली आहे. परंतु दर आसामीला एक दिडकी ह्या हिशेबाने ५५।५६रु. होतात. १३।१४ रु. अधिक कां खर्च झाला समजत नाही.

**गोप्रदान**

द्रव्यदान आणि गोप्रदान एकच. धातूच्या पैशापूर्वी गाय हें विनिमयाचें साधन होतें. म्हणजे गाईचा पैशासारखा उपयोग करीत असत. एका गोप्रदानास ८० ते १०० रु. खर्च येई. सध्या चार आण्यांवर भागतें. ३९ गोप्रदा-

---

१ पैसा

नार्थ ३९०७ रु. व ४ गोप्रदानार्थ ३१८ रु. खर्च पडला आहे (१६५). तसेंच ३५ गोदाननिमित्त ३५९८ रु. खर्च आला आहे (१६८). ब्राह्मणभोजनांत सहस्रभोजन, लक्षभोजन त्याप्रमाणे गोप्रदानांत गोशतदान. गोशतदानांचीं उदाहरणें पान १६६ व १६८ वर आढळतील. १०० गाईंचें एकदम दान करीत नसत. कारण "गोशताकडे गोदानें ३ रु. ९३९; गोप्रदानें २ रु. २०७; गोप्रदानें ३ रु. २९९" अशा रकमा नांवें पडल्या आहेत. पहिल्या रकमेवरून एका गोदानामागे ३१३ रु. खर्च झाल्याचें दिसतें. गाईंना कमजास्त किंमत पडल्यामुळे हा फरक दिसतो. परंतु सरासरीने १०० रु. दर गाईमागे धरले तरी निदान गोशत करणाराला १०००० रु. खर्च येत असला पाहिजे. लक्षभोजनापलीकडे कोटिभोजनाचें जसें उदाहरण नाहीं त्याप्रमाणे गोसहस्र किंवा गोलक्षदानाचें उदाहरण सापडत नाहीं. गोशतदानांत एक बैल द्यावा लागतो. "शतं गावः सवृषभा धेनूपस्करसयुताः" शृंगारलेल्या शंभर गाई व एक बैल मिळून गोशत होतें. ह्यामुळे "वृषभ प्रत्यक्ष अलंकारवस्त्रें दक्षणासहित" ह्या तपशिलाने १७० रु. नावें पडले आहेत (१६६). परंतु ह्या प्रत्यक्ष वृषभाशिवाय सुवर्णाची वृषभमूर्तीहि दिलेली आहे. त्यानिमित्त ८५ रु. खर्च झाले आहेत. मूर्तीचें कारण काय समजत नाहीं. वृष हा धर्मरूप आहे. वृषदान करतांना त्याची प्रार्थना पुढील शब्दात करतात.—धर्मस्त्वम् वृषरूपेण जगदानंदकारकः । अष्टमूर्तेरधिष्ठानमतः पाहि सनातनम् । अष्टमूर्ति म्हणजे शंकर.

गोदान हें महादानांपैकीं आहे. महादानें दहा आहेत तीं— कनकाश्वतिला नागा दासी रथ मही गुहाः । कन्या च कपिला धेनुर्महादानानि वै दश ॥

औषधांचा उपयोग होतो तसा दानांचा होतो अशी समजूत होती. त्या कारणाने क्लेशपरिहारार्थ, आरोग्यप्रीत्यर्थ, अनिष्टग्रहशांत्यर्थ दानें करण्याची वहिवाट पडली होती. वैद्यशास्त्राच्या अगोदर जन्म पावलेली ही कल्पना वैद्यशास्त्राच्या उदयानंतर अस्तास गेली नाहीं हें आश्चर्य आहे. उ. घोड्यावरून पडल्यास घृतदान करीत (३००). तुळशीबागकरांची एक स्त्री जानकीबाई हिच्या आजारीपणांत नाना प्रकारचीं दानें करण्यांत आलीं, अनुष्ठानें झालीं, जपजाप्य झालें, देवास प्रदक्षिणा घालविण्यांत आल्या, अनिष्ट ग्रहांनिमित्त शांति व होमहवन झालें (१७०-७१). परंतु हे सर्व उपाय निष्फळ ठरून अखेरीस त्या बाईचें देहावसान झालेंच. दानांत एक म्हैसदान आहे. म्हैस ही यमाला प्रिय. ह्याच-

कारणासाठी बैलदान केल्याचा उल्लेख इतरत्र आढळतो (१६९). हनुमंताला व पिंपळास ब्राह्मणांकडून प्रदक्षिणा घालविल्या त्यांचा दर एकच नाही. पिंपळाला एक लाख प्रदक्षिणा घातल्या त्या हजारीं चार आणेप्रमाणे; परंतु मारुतीच्या अकरा हजार प्रदक्षिणाचा दर हजारीं एक रुपया होता. दुसऱ्या ठिकाणीं मात्र चार आणेच दर लागला आहे (१६९). श्रीरामचन्द्रजीस १०,००० प्रदक्षिणा घातल्या त्याची मजुरी हजारीं आठ आणेप्रमाणे देण्यात आली (१६६). आणखी एके ठिकाणी बारा आणे दर लागला आहे. उ० ३७॥ रु. धोमच्या नृसिंहास प्रदक्षिणा मागील करणें होत्या त्याप्रो करविल्या ५०,००० सुमारें दर हजारीं ·।॥· प्रो महारुद्र केला गेला त्यावरून एकादशणीची दक्षणा हल्लीप्रमाणे चार आणेच पूर्वी होती असें दिसतें. मारुतीला प्रदक्षिणा घातल्याने भूत, पिशाच्च, प्रेत ह्यांचा नाश होतो. प्रदक्षिणा घालतांना "मनोजवं" हा मंत्र म्हणावयाचा असतो. पिंपळाला लक्ष प्रदक्षिणा घातल्या तर पुत्रलाभ होतो. "नारी वा पुरुषो वापि लक्षं कुर्यात् प्रदाक्षिणाः ।" आणि मग "वंध्यादिर्लभते पुत्रमितरासा तु का कथा!" पिंपळ विष्णुस्थान तर वड शिवस्थान.

**व्रतें**

दशाफलव्रत (१७२) व बुधाष्टमीव्रत (१६९) ह्यांचा निर्देश ह्या पुस्तकात आहे. दशाफलव्रत हें श्रावण शु ८ स करावयाचें असतें. हें व्रत कृष्णानेच कुंतीस करावयास सांगितलें. वनवासांत तिचे मुलगे गेले व स्वतः तिला विदुराकडे राहावें लागलें ह्या दुःखांतून मुक्त होण्याकरता हें व्रत तिने केलें. कृष्ण ही ह्या व्रताची देवता होय. दहा दिवसांचें हें व्रत असून सतत दहा वर्षें तें करावयाचें असतें. कृष्णाने कुंतीला सांगितलें—व्रतं ते कथयिष्यामि येन दुःखात् प्रमुच्यसे । पुत्रपौत्रैः परिवृता स्वं राज्यं प्राप्स्यसे चिरात्।। दशाफलमितिख्यातं तद्व्रतं कुरु सुव्रते[1] ।

बुधाष्टमी व्रत हें कोणत्याहि शुक्लपक्षांत बुधवारीं अष्टमी आली असेल त्या दिवशीं करावयाचें. ह्यांत बुध ग्रहाची पूजा आहे. अरण्यांत इलेची आणि बुधाची बुधवारीं भेट होऊन त्यांचा संयोग झाला व पुढे चंद्रवंशाचा मूलपुरुष जन्मास आला अशी कथा आहे. ही कथा युधिष्ठिराला कृष्णाने सांगितली आहे[1].

धर्मग्रंथांत सांगितलेलीं सर्व प्रकारचीं व्रतें अहमहमिकेने होत असावीं असें

१ व्रतराज.

दिसतें. प्रथम विशेष महत्त्वाची बाब वाटली नाही म्हणून पुस्तकांत व्रतांचा फारसा उल्लेख केला नाही. परंतु पेशवाईंत अशा प्रकारच्या धार्मिक कृत्यांनी सर्व भूमि कशी दुमदुमून गेली होती ह्याची कल्पना येण्यासाठी टांचणवहींतून कांही माहिती येथे संग्रहित करण्याचें योजिलें आहे. ही सर्व माहिती चिपळूणकरांच्या दप्तरांतली आहे. येथे व्रतांचीं नुसतीं नांवें देत आहें. अदुःखनवमीव्रत, ऋषिपंचमीव्रत, शाका-व्रत, मौन्यव्रत, तेलव्रत, रांगोळीचें उद्यापन, प्रतिपदाव्रत, तृतीयाव्रत, वातींचें उद्यापन, संकष्टी चतुर्थीव्रत, भोपळेव्रत, गोकुळअष्टमीव्रत, रथसप्तमीव्रत इ. ह्याचप्रमाणे दानें—चैत्रागौरीचे दानास एकमाही रोज ३३ जोडे सुमारें पायपोसाचे खरेदी किंमत रु. १४॥~; वसंतमाधवगौरीचे दानास तांबें; पंखे दानाकडे; वसंतपूजा शिष्ट ब्राह्मणांस दक्षणा ६५ रु.; काकूबाईकडे तुळशीप्रदक्षिणा दोन लाख घातल्या त्याच्या उद्यापनास; चन्द्रग्रहणबिंबदानास—बिंब कराव्यास, वगैरे. श. १७१० च्या तेरीजखडर्यातील सूर्यचन्द्रग्रहणानिमित्त रु. १४२॥~। धर्म-खात्यांत खर्च पडले आहेत. एका पक्षाकरता ८८॥~। खर्च पडले आहेत (३०५, ३०६). खासगीवाल्यांकडे पितरागणीं ब्राह्मण असून त्यांस प्रत्येकीं २॥ रु. दक्षणा देत असत.

केशवपनाचा विधि कसा होत असे हें पृ. १७३-१७४ वरून समजण्यासारखें आहे. ह्या कृत्यास सुमारें ४० रु. खर्च झाले आहेत. सिंधुकारांचें धर्मराज्य चालू होतें !

भ्रताराचा ठिकाण लागला नाही तर तो मेला असें समजून पालाशविधि करीत असत (१६८). प्रतिकृति करून तिचा विधिपूर्वक दाह करणें त्याला पालाशविधि म्हणतात. ह्यांत पळसाच्या समिधा वापरतात म्हणून त्यास पालाश-विधि म्हणतात.

पेशव्यांची श्रावणमासदक्षणा सर्व हिंदुस्थानभर गाजत होती. ह्या दक्षणेची थोडीशी माहिती ह्या पुस्तकांत मिळण्यासारखी आहे.

**श्रावणमासदक्षणा** श. १६९१ सालीं १९४९८९ रु. ची दक्षणेची हुंडी पटवावी लागली (१४६). इतकीच रकम खर्च झाली असा त्याचा अर्थ नव्हे. दक्षणेच्या बंदोबस्तास व ब्राह्मणांचे रखवालीकरता पुरंदराहून गडकरी बोलावून घेत (१६२). ह्या दक्षणेची रकम सरकार स्वतः देई आणि लोकांकडूनहि वसूल करून घेई. दक्षणेची वरात महालाचर

जाई. कोणत्या महालावर किती रकमेचा बोजा बसवावयाचा हें ठरलेलें असे. नेवासें वगैरे महालांवर २५००० रुपयांचा बोजा टाकलेला होता. ही रकम रसदेच्या रकमेंतून दिली जाई (१६३). रमण्यांत कारकून जात त्यांस तेथे फराळाकरता पोहे देण्यांत येत. कैली पाव खंडी पोह्यांना साडेबारा आणे खर्च पडला आहे.

**ब्राह्मणद्वारा उपोषण**

आपण स्वतः करावयाचीं धार्मिक कृत्यें ब्राह्मणांकडून करवून घेण्याची चाल बरीच प्रचारांत होती. अशौच्यांत उपोषण मोडतें म्हणून तें ब्राह्मणास करावयास सांगत (१६६). दुसऱ्या एका ठिकाणीं "अशौच्याचा गायत्रीजप अंतरला तो ब्राह्मणास सांगितला त्यास दक्षणा" अशा तपशिलाने ३ रु. खर्च पडले आहेत श. १६९३ अधिक आषाढ (क. सु.).

१६

**आहेर**

आहेर हा शब्द आहार्य ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा. आहृ ह्या धातूचा अर्थ वस्त्र धारण करणें असा होतो. आहार्य म्हणजे धारण करण्याला योग्य. शुद्ध शब्द अहेर नसून आहेर असावा असें ही व्युत्पत्ति बरोबर असल्यास म्हणावें लागतें. अभ्युदयकर्माच्या प्रसंगाने आहेर करण्याची चाल आहे. परंतु हा लौकिक आचार आहे. शास्त्रविहित नाही. आहेर करतांना भिक्षुक "युवं वस्त्राणि........" (ऋ. १-१५२-१) हा मन्त्र म्हणतात. ह्याचें कारण ह्या ऋचेंत वस्त्र शब्द आहे हेंच होय. ऋचेचा अर्थ असाः— हे मित्रावरुणांनो, तुम्ही अखंड वस्त्र धारण करतां. तुमचे उद्योग आणि विचार अखंड आहेत. तुम्ही सर्व पापांचा नाश करता आणि तुम्ही आम्हांला सत्याशीं युक्त करतां (चित्राव). स्मार्तकर्मांत सूक्तविनियोग बहुधा लैङ्गिक असतो. असो.

ह्या पुस्तकांत पृष्ठें ३, ४, ५, ७, २३ ते २९, ८४ व २११, २१३, २१४, २१६, २९२, ३१३ ते ३१५ ह्यांत आहेरासंबंधी उल्लेख आढळतील. आहेर म्हणजे वस्त्रदान. मुंज, लग्न, गडग्नेर, ओटभरण, गर्भाधान, डोहाळेजेवण, देवदर्शन, सती जाणें, दुखवटा, मेजवानी, प्रथमभेट, शुभवार्ताहरण हे वस्त्रदानाचे प्रसंग आले आहेत. आपण ज्याला दुखवटा म्हणतों तो वस्तुतः दुखवटा नाही; तें एक मंगल कार्यच आहे. सती जातांना तर उत्सव करतात. सती जाण्या दिवशीं आहेराबरोबर मेजवानीहि झाली आहे (२४). लुगडें

अथवा पातळ आणि चोळी ह्यांनी सतीची ओटी भरीत. प्रथमभेटीचा निर्देश पा. २१६ वर आहे. वैद्य यांनी रास्ते ह्यांची प्रथमभेट घेतली तेव्हा रास्ते ह्यांस धोतरजोडा व त्यांच्या स्त्रीस लुगडें व खण अशीं वस्त्रें देण्यांत आलीं. ह्यावरून कोणत्याहि मोठ्या माणसाच्या प्रथमभेटीच्या वेळीं वस्त्रें देण्याची चाल होती असें दिसतें. गोवेकर फिरंग्याच्या वकिलाने खाजगीवाल्यांची भेट घेतली तेव्हा त्यांस १५ रु. तिवट व २० रु. जाफरखानी अशीं दोन वस्त्रें दिल्याचा उल्लेख पान ८४ वर आढळेल. प्रथमभेटीप्रमाणे शुभवार्तानिवेदन आहेर देण्यास कारण समजलें जात असे नाना फडणिसाला पुत्र झाल्याची व आनुबाईस रजोदर्शन झाल्याची ब्रातमी सागणाराना तिवट मिळालें ( २६, ३०१ ). तुळशीबागेंत श्रीरामचंद्राच्या दर्शनास गेलेले पेशवे, होळकर, आंग्रे ह्यास वस्त्रें मिळालीं आहेत. ह्याना आहेराचीं वस्त्रें न म्हणतां प्रसादाचीं वस्त्रें म्हणतात (२३, २७, २१३, २१४). मुंज, लग्न, गर्भाधान, गडग्नेर, डोहाळेजेवण हे आहेराचे नेहमीचे प्रसंग होत. गर्भाधानाच्या वेळीं बायकोबरोबर पुरुषालाहि वस्त्र मिळतें (२५); परंतु डोहाळेजेवणात एकस्या स्त्रीलाच आहेर करण्यांत येतो. मुंजीच्या आहेरांत सर्व पोषाख असतो. उदा. डोक्यास फेटा अगर टोपी, नेसावयास विजार, अंगात झगा व पांघरण्यास दुपेटा (३,३१४). मेजवानीस कोणास बोलाविलें तर वस्त्र देण्याची वहिवाट फार होती (२००). वस्त्राबरोबर सामानासहित घोडाहि दिलेला आहे (२११).

वस्त्रें फार करून दोन असावयाचीं. सामान्यतः शेला व तिवट पुरुषांना आणि लुगडें व खण स्त्रियांना देण्यांत येत (५). श. १६९० च्या वहींत (तुळशीबागवाल्यांच्या) ३३ रु. घरखर्चाकडील जमा-आहेर मेजवानी सनगें ६

११ महीपतराव चिटणीस २

११ विसाजीपंत जोग २

११ बाळाजीपंत दाते २

तसेंच रु. १०८८= घरखर्चाकडील जमा आहेर मेजवानी

३५ बाळाजीपंत बावले (?) पितांबर

२० १५

२३८= ठकूबाई पितांबर १

१३ नारोपंत परचुरे शेला तिवट

१२।। महादाजीपंत कुंटे शेला तिवट
१६।। त्रिंबकराव मामा शेला तिवट
८ कृष्णाजीपंत कोलवडीकर शेला तिवट
व १६३ रु. जमा आहेर मेजवानी सनगें ६
१४८ गायकवाडकडील ४
१५ बाळोबा नानाकडील २

येणेंप्रमाणे रकमा आहेत. ह्यावरून दोन सनगांची रीत सिद्ध होते. विधवेला मात्र एकच वस्त्र मिळतें.

ह्या मेजवानीआहेराचा खर्च कित्येक वेळां फारच होई. श. "१६८७ पौषांत २४१४८–।। रु. मेजवानी उभयता श्रीमंतांस केली त्यास खर्च" अशा तपशिलाने मांडलेले आढळतात. त्यांत रु. २६२।–।। ऐन नक्त असून २१५१।।। रुपयांचें कापड आहे. (क. सु.)

श्रीमंतांकडून सरदारांस वस्त्रें दसऱ्याचीं जात असत (२९२). उ.

रु. ४० वेतनखातें जमा सरकारचीं दसरियाचीं सनगें श. १६८८ (तु. बा.).

ओटी भरणाच्या आहेरांत बाईसाहेबांना लुगडें व खण दिले त्याबरोबर श्रीमंतांनाहि तिवट व शेला दिलेला आहे (७). श्रीमंत कुसाबाईच्या पदराच्या वेळीं तिवट व दुपेटा ह्याचा आहेर करण्यांत आला (२९२).

ह्याशिवाय वस्त्रदानाचा दुसरा एक प्रकार आढळला तो असा—

खर्च रु. १०।– सदाशिव शामराव देणें येसाजी पाटील गुऱ्होळीकर याचे लेकास मारिलें त्यास समजाविशीबद्दल सनगें गु कृष्णाजी ना भिडे

| तिवट | लुगडीं २ | खण ५ |
|---|---|---|
| २।। | ५।।।≈ | १।।।= |

श. १६९० (तु. बा.)

लोकांचा संतोष करण्यास अन्नाच्या खालोखाल वस्त्रांचा उपयोग होतो अन्न आणि वस्त्र ह्या जीविताला आवश्यक वस्तु. म्हणूनच मेजवानी आणि आहेर ह्यांची सांगड असते.

अधिकाराबरोबर वस्त्रें देत त्यांस अधिकाराचीं वस्त्रें म्हणत. नवीन पेशव्याला छत्रपतींकडून पेशवाईचीं वस्त्रें येत. हा प्रकार खालच्या अधिकाऱ्यांपर्यंत

रूढ होता. उ. ३२ क. मह्रादाजी अनंत कमाबीसदार यास सालगुा कमावीस सांगितली ते समयीं अर्जे श. १७०० आश्विन (तु. बा.).

कोणी नमस्कार करावयास आला तर त्याला वस्त्रांचा आहेर करण्याची चाल होती.

१७

न्हाणवली

रजोदर्शन ही एक पिशाच्चबाधा आहे अशी असंस्कृत लोकांची समजूत असते. म्हणून ऋतुस्नात स्त्री राहतें घर सोडून दुसऱ्या रिकाम्या घरांत जाऊन राहते. मखरांत बसणें म्हणजे निराळ्या घरांत बसण्यासारखें आहे. रानटी लोकांच्या रानटी चालीचें हें बेगडी स्वरूप होय. ह्यानंतर दुसरी कल्पना म्हणजे ऋतुप्राप्ति ही विषयानंदानुभवाची तयारी होय अशा समजुतीने रजस्रावाचे दिवस उत्सवाचे दिवस मानण्यांत येऊं लागले. न्हाणवलीला आनंदांत ठेवावयाची ह्या उद्देशाने न्हाणाचे समारंभ होऊं लागले. गांवांतील लोकांनी न्हाणवलीला पक्वान्नाचें जेवण घालण्याची रीत पडली. ह्यालाच 'वाढून नेणें' अशी संज्ञा आहे. वाढण्यावर पेढे, बत्तासे, इलाची, पेरू इत्यादि मेवामिठाई व फळें असत. न्हाणवलीला देण्याकरिता लोक बुका, अत्तर, गुलाबपाणी नेत. वाढप नेत तेव्हा त्याच्याबरोबर न्हाणवलीला पिवळें पातळ अथवा लुगडें आणि खण ह्यांचाहि आहेर करण्यात येई ( ६-७ ). न्हाणवलीला पहिल्या दिवशीं हिरवें, दुसऱ्या दिवशीं गुलाबी, तिसऱ्या दिवशीं पिवळें व चौथ्या दिवशीं पांढरें लुगडें देण्याची वहिवाट आहे. पान ६ वर पिवळ्या पातळाचा उल्लेख आहे. ह्यावरून तो न्हाणवलीचा तिसरा दिवस होता असें दिसतें. चौथ्या दिवशीं न्हाणवलीला आपल्या घरीं आणून तिची ओटी भरीत. अशा एका प्रसंगीं शेलारी (लुगडें), खण, ह्यांच्याबरोबर बिछाना आणि झोळणा हेहि जिन्नस आहेरांत होते ( ३१४ ). दुसऱ्या न्हाणाच्या वेळींहि आहेर करीत ( ३१५ ). ह्या प्रसंगीं न्हाणवलीला ५१ रुपये किंमतीचें पिवळें केशरी पातळ मिळून शिवाय केशरी व गुलाली अशा दोन चोळयाहि मिळाल्या. इतर बायकांनाहि खण वांटले.

१८

पोषाख

सामान्यत: पुरुष धोतर नेसत; स्वारीस जातांना मात्र विजार, तुमान, तुंबा अथवा पायजमा असे. तुंबा मशरूचा करीत (३१०). त्याला फीत लावीत व त्याचें अस्तर आंब्याचें म्हणजे आंब्याच्या रंगाच्या कापडाचें असे.

तुंब्याच्या नाड्या रेशमी व किंमतवान असत. श्रीमंत माणसांना नुसत्या नाड्या देण्यांत येत (२०२). नाना फडणिसास तुंब्याची नाडी दिली (२०३) तिची किंमत १॥= पडली आहे. ४।५ रुपायांपासून १२, १५, १६, २०, ४०,६०।७० रुपयांपर्यंत किंमतीचे धोतरजोडे असत. सासवडच्या, सुप्याच्या, टाकळीच्या धोतरजोड्यांची किंमत अनुक्रमें ५॥,६॥,३॥= रु. असल्याची नोंद पान १९९ वर आढळेल. शंकाराचार्यांच्या धोतरजोड्यास १८ रु. पडले होते (१६१). एके ठिकाणीं तीन धोतरजोड्यांची किंमत ७२६।-॥ रुपये पडली असल्याची नोंद आहे. अर्थात् एका धोतरजोड्याला २४२ रु. धोतरजोडे सारखे होते असें गृहीत धरल्यास पडले असावे. सोवळयांत पीतांबर वापरीत. साष्टीस पीतांबर होत असत (१९९). हल्ली साष्टीस पीतांबर होत नाहीत. श्रीमंत पेशवे किनखापाची विजार घालीत. विजारीकरता ·।॥· किनखाप किंमत रुपये ४१॥ चा तुळशीबागकरांनी श्रीमंत देवदर्शनास गेले तेव्हा त्यांस दिला (२१३).

**अंगरखे**

अंगांत अंगरखे घालीत. अंगरखे छिटी, रेशमी, किनखापी असे सर्व तऱ्हेचे असत. थंडीकरता रुईचे (२००) अंगरखे करीत (२०३). रात्रीं निजतांना अंगरखा घालून निजत (१९८). हा अंगरखा कंबरेपर्यंत असे असें म्हणतात जामेवार अंगरख्याचा उल्लेख पृ. २०० वर आढळेल. ' अंगरख्यांना अस्तर लावण्याची चाल होती. रूदार हिरव्या छिटाच्या एका अंगरख्याची २४८- रु. किंमत खर्ची पडली आहे (३१०).

पूर्वीच्या पुरुषांच्या चित्रांत आपण झगे पाहतोंच. मोठ्या पुरुषांच्या अंगांत दरबारी पोषाख म्हणूनच झगा असे असें नाही. झगे छिटाचेहि करीत. एका छिटी झग्याची किंमत ८ रु. पडली आहे (१९९). महामुदी नांवाचें सुती तलम कापड मिळे, त्याचे झगे व अंगरखे करीत. ह्या कापडाचे ठरावीक वजनाचे तुकडे असत. अशा प्रत्येक तुकड्याला महामुदी म्हणत व त्याची किंमत १६ रुपयांवर असे (२११). तीसा नांवाचें कापड असावें. तीसा एक असें म्हटलें आहे, ह्यावरून हा कापडाचा तुकडा महामुदीसारखा विकण्यांत येत असावा. ह्या एका तुकड्याला ३७॥ रु. पडले आहेत (२१३). ह्या कापडाचा अंगरखा करीत. तीसा हें रेशमी कापड असावें. मुंजा मुलास झगा देत तो किनखापाचाहि असे. किनखाप ·।॥· लागे. एवढ्याची किंमत ५७।= रु. पडली आहे (३१४).

**शिरोभूषण** मंदील, रुमाल, फेटा, तिवट, पागोटें, पगडी, टोपी हे शिरोभूषणाचे प्रकार होत. टोपी मुलें घालीत. तिवट व पागोटें ह्यांत भेद होता कीं नाही हें निश्चयपूर्वक सांगतां येत नाही. पागोटें हा फारशी शब्द आहे. तिवट हा मराठी शब्द असावा. परंतु पूर्वी पागोट्यापेक्षा तिवट शब्दच अधिक प्रचारांत होता. पागोट्याचा रंग हिरवा तसाच पांढरा असे. ताडपत्री व दोरव्याचीं पागोटीं अशा दोन प्रकारच्या पागोट्याचा उल्लेख पान २०५ वर आला आहे. छिटी कापडाचीं तिवटें करीत (१९८). तांबड्या व कुसुंबी रंगाचीं तिवटें असत (२११, २१३, २९२). जास्त किंमतीचें तिवट म्हणजे ३२।३३ रुपयांचें दिसतें (३११,२१३). फैजपूर, कळसपाक, नांदेड, कोटगिरी, जालना, पैठण, शहाडें ह्या ठिकाणीं तिवटें व पागोटीं होत असत. ह्याशिवाय उबरेडच्या व जुनरी तिवटांचाहि उल्लेख आला आहे (२००). पान २०४ व २०५ वर शिलकी कापडांची यादी दिली आहे. त्यांत ताडपत्री कोरें, पांढरें पागोटें, नुसतें कोरें पांढरें पागोटें व हिरवें पागोटें अशा तीन पागोट्यांचा उल्लेख आहे. ह्यावरून हीं बांधीव पागोटीं नसावीं असें वाटतें. बांधलेलें तें पागोटें व बिनबांधलेलें नुसतें कापड तें तिवट असा भेद कोणी करतात तो निराधार दिसतो. मंदील, फेटा व रुमाल ह्यांत भेद होता. धनवडी लुगड्यांप्रमाणे धनवडी फेटे मिळत (३०९). रुमाल जरीकांठी दोरव्याचेहि असत (२०५). करनाटकी रुमाल पूर्वीपासून प्रसिद्ध होते. करनाटकांत रुमाल हें एकच शिरोभूषण होतें व आहे. छिटी टोप्यांप्रमाणे छिटी फेटे वापरीत. हल्लीप्रमाणे बांधीव पगड्या असाव्या असें वाटतें (२००).

लहान मुलांकरता कुंची असे. बाळंतविड्यावर कुंची नेत. अशा एका कुंचीची किंमत २० रु. लागली आहे (२९१). मुलांच्या टोप्या—विशेषतः मुंजींत—किनखापाच्या अथवा मखमलीच्या असत.

**अंगवस्त्र** अंगावर घेण्याचीं दोन प्रकारचीं वस्त्रें असावीं. साधें सुती वस्त्र म्हणजे धोतरजोडा. अंगावर पांघरावयास धोतर घेत (२००). उपरणें हल्ली एकेरी असतें तसें पूर्वी वापरीत नव्हते. उपरणें हा शब्दहि आढळत नाही. अंगवस्त्राचा धोतरजोडा नेसावयासहि उपयोगी पडे व त्याची किंमत १।।।·, ५।।· रु. अशा सुमारासच असे.

(२००, २०३). श्रीमंतांच्या वापरण्यांत दुपेटा येत असावा. एका दुपेट्याची किंमत ४।।।= रु. पडली आहे; तर दुसऱ्याची किंमत १२७।।।=।‌। रु. पडलेली दिसते (३११). हा दुपेटा काशीचा जरीकांठी छडीदार होता. ह्याच्या दरम्यान पान ११३ वर २४ रु. व ३७।। रु. किंमतींच्या दुपेट्यांचा उल्लेख आला आहे.

बायकांचीं नेसावयाचीं लुगडीं वीस हाती सुद्धा असत (२०३). छिटें नेसण्याची हौस विशेष असावी असें दिसतें (१९८,२०१).

**स्त्रियांचा पोषाख** हिरव्या रंगाचीं रेशीमकांठीं पातळेंहि स्त्रियांना आवडत. बायकांचा प्रवासी पोषाख पुरुषांसारखा असे. पायांत विजार, अंगांत अंगरखा व डोक्यास टोपी असें वर्णन बायकांच्या ह्या पोषाखाचें केलेलें आढळतें (१९९, २०१). सुवासिनी अंगावर शेला किंवा दुपेटा घेत तर विधवा धोतरजोडा अंगवस्त्र म्हणून वापरीत. अशा धोतरजोडयाची किंमत साडेनऊ रुपये लागली आहे (२०१). ह्यावरून किंमतवान धोतरजोडे असत असें दिसतें. पायांत जोडे घालण्याची वहिवाट होती. स्त्रिया गादीवर निजत. राघोजी आंग्रयाच्या स्त्रीला तुळशीबागवाल्यांनी लुगडें प्रसादाचें दिलें त्याची किंमत ४३ रु. होती (२७). एका अंजिरी लुगड्याची किंमत ११४ रु. लागली आहे (१५४).

सखलातीचा खप समाजांत बराच होता. सर्व रंगाची सखलात मिळे (२०२). २ ते ४ रुपये गज किंमतीच्या सखलाती असत (१५६,२००,२०२). पावसाळ्याकरता सखलातीच्या टोप्या करीत. ह्या टोप्या कुंच्यासारख्या असत.

**छीट** छिटाचा पोषाक लोकप्रिय होता असें दिसतें. छिटाचा अंगरखा, छिटाचा फेटा, छिटाचा झगा, छिटी हातरुमाल, छिटी पातळें, छिटी फर्द, छिटी टोपी, छिटी तिवट, ह्याप्रमाणे सर्व पोषाख छिटी कापडाचा असे. काळें, हिरवें वगैरे सर्व रंगांचीं छिटें वापरण्यांत येत. बऱ्हाणपुरी, बागलकोटी, नागपुरी, सासवडी, गंगासागरी, मुलतानी नांवांच्या छिटांवरून छिटें कोठे होत हें समजण्यासारखें आहे. पासोड्याहि छिटाच्या करीत.

**शेला** छिटाप्रमाणे शेल्याचाहि अनेक प्रकारें उपयोग करीत. अंगरखे, झगे शेल्याचे करीतच. परंतु शिवाय अंगवस्त्र म्हणूनहि शेला वापरीत. ह्याखेरीज अस्तराकरता शेल्याचाच उपयोग करीत. तसेंच पांघरावयास व पलंगपोसास म्हणून शेले वापरण्यांत

घेत. दोरव्याचे शेले असत. जाड्याभरड्या पातळ विणीच्या हलक्या कापडास खेंडा शेला म्हणत.

१९

छापण्याची कला माहीत नसल्याने कित्येक लोकांचा ग्रंथलेखन हा एक मोठा व्यवसाय होऊन बसला होता. आणि चमत्कार

**ग्रंथवाचन**

हा की, ह्या धंद्यांत गुजराथी व कानडी लोकहि असत. लिहिणावळ ग्रंथसंख्येवर ठरवीत. हजारीं १।।।=, २, २।।,२।।।,३ रुपये हा लेखनाचा दर असलेला दिसतो ग्रंथ मोठा असल्यास सालवार पगारी माणूस ग्रंथ लिहिण्यास ठेवीत; तरी पण एका सालांत अमुक ग्रंथसंख्या लेखकाने पुरी केली पाहिजे असा करार असे. कांही ग्रंथांच्या किंमती येणेंप्रमाणे—भारत ३६१ रु., भागवत ३६ रु., गीता २।।। रु., विज्ञानेश्वर २६। रु., शारीरभाष्य १००४८।। रु., शिवपुराण ६।। रु.

धर्मग्रंथ, पुराणें, वेदांत हे लोकांच्या वाचनाचे विषय होते. वेदाच्या संहिता पठणाकरता लिहून घेत. मुद्राराक्षसाची छाया व शाकुंतल नाटक लिहून घेतल्याचा खर्च पडला आहे. त्यावरून संस्कृत नाटकेंहि मधून मधून वाचीत असें दिसतें. ह्याशिवाय रेवामाहात्म्य, रुद्रपद्धति, पंचरत्न, सूतसंहिता, प्रबोधसुधाकर, मध्वसिद्धांत, कौमुदी, धनुर्मास, साठ संवत्सर, सुंदर लहरी, कामसमूह इत्यादि लहान मोठ्या ग्रंथांचा उल्लेख आढळेल (पृष्ठें १७६ ते १८० व २९८).

ह्याखेरीज वैद्यांच्या कागदांत उपनिषदांची यादी मला आढळली ती पुस्तकांत आली नाही. ह्या यादींतील उपनिषदें अपरिचित दिसतात. निर्णयसागरच्या १०८ उपनिषत् संग्रहांत ह्यांचीं नावें आढळत नाहीत. हीं उपनिषदें — क्रमोपनिषद्, नीलरुद्रोपनिषद्, आश्रमोपनिषद्, गायत्र्युपनिषद्, कंठश्रुत्युपनिषद, गोपीचंदनोपनिषद्, चंडिकोपनिषद्, पैप्यलादोपनिषद्, अमृतबिंदुउपनिषद्, हनुमदुपनिषद्, रहस्योपनिषद्, मृत्युला......लमन्मोपनिषद्. उपरोक्त उपनिषदें ऐकिवांत नाहीत. असो. ह्या पुस्तकांत शालोत्र ग्रंथाव्यतिरिक्त एकहि व्यावहारिक ग्रंथ नाही.

रामायण, भारत, भागवतादि पुराणें चातुर्मास्यांत वाचण्याची वहिवाट होती. भागवत (१६७), भागवत दशमस्कंद (१७३), मोक्षधर्म (१७२), गदापर्व, द्रोणपर्व, शल्यपर्व, शांतिपर्व, सौप्तिकपर्व (२९८) ह्यांचे उल्लेख आहेतच

पण शिवाय मत्स्यपुराण (२९८), केदारसहस्रनाम (१६६) व बृहन्नारदी (१७२) लोकांच्या वाचनांत असल्याचें दिसतें. बृहन्नारदी म्हणजे बृहन्नारदीय पुराण असलें पाहिजे. मुलांना रामायण वाचून दाखविण्यासाठी बुद्धया पुराणिक ठेवीत (१६७). पुराणसमाप्तीनंतर ब्राह्मणभोजन होई (१७२). पुराणिकाची संभावना चांगली होत असे. भागवताचा दशमस्कंद समाप्त झाला तेव्हां १५० रु. व्यासपूजेच्या वेळीं दक्षिणा देण्यांत आली (१७३). स्त्रियांनाहि पुराणें वाचून दाखविण्याची व्यवस्था करीत. "१८।· पुराण भारती गदापर्व मातुःश्री राधाबाईकडे." समाप्तीप्रमाणे प्रारंभालाहि धर्म करीत. १८=। द्रोणपर्व प्रारंभ; १ सौप्तिकपर्व प्रारंभ. गीतेंतील कार्याकार्यविचार समजून घेण्याच्या इच्छेने तुळशीबागवाल्यांनी ५० रु. खर्च केले (२०५) ही फार महत्त्वाची गोष्ट होय.

२०

**रत्नें, मोतीं, हिरे, कापड वगैरे**

पाच, माणिक, हिरा इत्यादि जिन्नस दागिन्यांत वापरण्यांत येत. अशा दागिन्यांची यादी पानें १५७, १५८, १५९, १६०, २०३, २०४ वर आढळेल. पाचेची किंमत दर रती ६ व १० रु. ह्याप्रमाणे लागली आहे (१५८). १॥, १४, १८ रती वजनाचा एकेक खडा असण्याचा संभव आहे. वजनावर किंमत होत असेच; तथापि उक्ती किंमतहि ठरवून व्यवहार होत नसे असें नाही. दोन पाचांना १॥ रु. प्रमाणे ३ रु. पडल्याचा दाखला आहे (१५९).

हिऱ्यांचा भाव दर रती १२, २०, २५ रु. असल्याचें दिसतें. ९ हिऱ्यांची ३०० रु. किंमत असल्याची एक नोंद आहे (२०१). ४९ हिऱ्यांचें वजन २१ रती असून एकंदर किंमत ४५१ रु. आहे (१५८, १५९).

मोत्यांच्या संबंधानेहि कांहींची उक्ती किंमत आहे तर कांही मोत्यांची चवावर किंमत आहे. ४७ मोत्यांची २६४० रु. किंमत भरते. दर मोत्यास १५, २५, ३५, १५० रु. अशी किंमत लागलेली आहे. परंतु चार दाण्यांच्या चौकड्याला ३२०० रु. किंमत लागलेली आढळते (२११). एका दाण्याला ८०० रु. पडले. एके ठिकाणीं (१५८) चवावर किंमत आहे. ४ रु. चवाप्रमाणे १३२ दाण्यांची किंमत ५४०० रु. पडली आहे. ह्या दाण्यांचें वजन १३५० चव होतें. १३५० चव म्हणजे ५६८ रती आणि

५६८ रती म्हणजे २३॥४ = साडेतेवीस टांक आणि चार रती. २४ रती = १ टांक असें कोष्टक केरो लक्ष्मण छत्रे यांच्या अंकगणितांत दिलें आहे. ह्या प्रमाणाने ५६८ रतींचे २३॥ टांक व ४ रती होतात. येथपर्यंत बरोबर आहे. परंतु रतींचे चव दिले आहेत ते जमत नाहीत. चव काढण्याची रीत छत्र्यांनी दिली आहे (अंकगणित भाग १; ४थी आवृत्ति पा. ६४) ती अशी— रतींना रतींनी गुणावें. त्या गुणाकारास ५५ नी गुणावें आणि ९६ नी भागावें. भागाकारास मोत्यांच्या दाण्यांच्या संख्येने भागावें म्हणजे चव येतात. ह्या रीतीने करून पाहतां ६६८ रतींचे सुमारें १४०० चव येतात. येथे १३५० आहेत. ह्याचा दुसरा पर्याय असा—रतींच्या संख्येच्या वर्गाचें अर्ध, अर्धाचा अष्टमांश, ह्या अष्टमांशाचा षष्ठांश ह्या तिहींच्या बेरजेला मोत्यांच्या संख्येने भागावें. भागाकाराइतके चव होतात. ह्या तऱ्हेने करून पाहिलें तरी १४०० च भागाकार येतो.

श्री. शंकरराव जोशी यांनी भा. इ. सं. मंडळांत 'दामाशाही' वांटणी ह्या नांवाचे कागद आणले होते त्यांत चव करण्याचीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांतून खालील मजकूर घेतला आहे.

हिसेब गुंजा ४० चालीस रती सुा ३० तीस चाळीस पावणे तीस दर गुंजी रती ·।।।· पाऊण प्रमाणे याचे चव मोती

| | |
|---|---|
| रती दाणा वजन ३० | गुंजा वजन ४० |
| वर्त गुणाकार ३० | वर्त गुणाकार ४० |
| ९०० | १६०० |
| गुणाक गुणाकार ५५ | १६५ बेरीज गु. |
| बेरीज | ८००० |
| ४९५०० | ९६०० |
| | १६०० |
| भागाक भजक ९६ | बेरीज गु. धावरा २६४००० |
| ५१५॥= | भागले ५१२ |
| हे चव | ५१५॥= |

यासी श्लोक

गुंजा तिस मोति रति तिचतरआ

धिक रिसति हो तयाच्या
ग्रंथि सांगितल्या सत्प्रगुनि आशा
तिनसे तिसयाच्या याच्या वर्गा
गुणावे शरऋतु शशीने कीर
ढि पंचबाणे भागावे सूर्यबाणे
रस नवरतिलाभा गते लब्ध घेणे.

साक्ष

| गुंजा | | रती |
|---|---|---|
| ३२ ऐन | | २४ |
| ३२ वर्ग गुणाकार | | वर्ग २४ |
| १०२४ | | ५७६ |
| १६५ गुणाकार | गुणक गुण | ५५ |
| शर ऋतु शशी | पंचबाण | |
| १६८९६० | | ३१६८० |
| ५१२भाग सूर्य बाणे | गुण भाग रसनव | ९६ |
| ३००(३३०) | | ३०० |
| हे चव जाणीजे तीनसे तीस | | हे चव जाणीजे तीनसे तीस |

माणकांचा दर ३, ३।=, १० रु. प्रत्येक नगाला लागलेला आहे (१५८, २४८). वजन दिलेलें नाही.

लालू किंवा लाल म्हणजे तांबडें माणिक. ह्याच्या किंमती नगांवर आकारलेल्या आहेत. नगास ३, ५, १५, २५ रु. किंमत लागली आहे. एके ठिकाणीं लालूंचें वजन रतींत दिलें असूनहि किंमत नगावर आकारली आहे व ती दर लालूस २५० रु. प्रमाणे आहे (१५९).

सोन्याचा भाव दर तोळ्यास १५ रु. (१५८, २१०, ३१४), १५॥ (३०६), १६ रु. (२११, २८३), १६॥ (१५७), १९॥ (१५७, २०१, १७४) असा लागलेला आढळतो. किरकोळ खरेदीला १९॥ रु. भाव असल्याचें दिसतें.

कांही किंमती कापड—

| रु. | कापड | सरासरीने एका नगास किं. रु. |
|---|---|---|
| ४५८८ | दुपेटे ८ | ५७३ |
| २८९५ | शालू ६ | ४८२ |
| ७२६ | धोतरजोडे ३ | २४२ |
| १७७१ | खण १२८ | १४ |

२१

**कुणबिणी**

मनुष्यांची खरेदीविक्री पेशवाईअखेरपर्यंत चालू होती. बायकाप्रमाणे पुरुषांचीहि विक्री क्वचित् होत असे. परंतु हे पुरुष बहुधा मुसलमान असावे. सिद्दी मुबारखा ह्याला कर्जात घेतला होता तो ९० रुपयांना विकला (१८५). बायकांची खरेदी-विक्री फारच मोठ्या प्रमाणावर होई. अर्थात् ह्या अविवाहित स्त्रिया असत. पोरी थोरी कोणत्याहि वयाच्या स्त्रिया विकत मिळत. ह्या शूद्र स्त्रिया असत. स्त्रियांत हिंदूंचा भरणा जरी विशेष असला तरी मुसलमान पोरीहि विकत घेत आणि ह्या मुसलमानणींना सुद्धा कुणबिणी म्हणत (१८५). ५०, ७५, ९०, १०० रुपयेपर्यंत कुणबिणीची किंमत येई. घरकामाकरता तसेंच उत्तरकार्यांत दासीदानाकरिता कुणबिणी उपयोगी पडत. हरिदास, भिक्षुक, पुराणिक हे सुद्धा कुणबिणी खरेदी करीत. मोठ्या अंमलदारांना कमाविसींत कधी कधी कुणबिणी मिळत (१८४). म्हणजे त्यांच्याकरता पैसे द्यावे लागत नसत.

ज्या पदार्थांची खरेदी करतां येते तो पदार्थ गहाणहि टाकतां येतो. बाळाजीपंत नातूंचा नोकर गाडेकर नांवाचा होता. त्याची गंगा कुणबीण गहाण घेऊन तिच्यावर त्याला चिपळूणकरांनी २० रु. कर्ज दिलें होतें आणि तेंहि स. १८२२ सालीं म्हणजे ब्रिटिश अमदानींत (१८५).

भावांमध्ये वांटणी झाली म्हणजे इतर जिनसांप्रमाणे कुणबिणीहि वांटून घेत. एकच कुणबीण असल्यास तिची किंमत करून ती ज्याच्याकडे जाईल तो दुसऱ्याला तिची निम्मी किंमत देई. गुलामगिरींतून मुक्त करावयाची झाली तर तिच्यापासून नजर घेत (१८४). सणावारीं कुणबिणींस पोस्त मिळे; दिवाळीची ओवाळणी मिळे. त्यांना नेसावयास लुगडीं व पायांत घालण्यास जोडाहि देण्यांत येई (१८३). सरकारी कुणबिणी दुसऱ्यांस पैसे घेऊन कामास देत (८०). एका

कुणबिणीसंबंधाने ८८= रु. खर्च झाला आहे. त्यांत २८= "शुद्ध केली त्यास" असें कारण दिलें आहे. हा शुद्धीचा प्रकार का झाला तें समजत नाहीं; पण त्या-निमित्त ७०० विड्याचीं पानें खर्च झालीं असून १॥ रुपया ग्रामजोशास मिळाला आहे (१८४).

२२

**हत्यारें अथवा शस्त्रें**

तरवार, ढाल, बदूक हीं हत्यारें लोकांच्या वापरण्यांत असत. ह्यांशिवाय कमाण व तीर ह्यांचाहि उपयोग करीत. ५ पासून १२॥ रुपयांपर्यंत बंदुकीची किंमत असे (२७४, १५५). तरी पण एका बंदुकीची किंमत १५॥· रु. होती (१५१). बंदुका लोहार करीत. ठिकठिकाणीं होत असत. वासुदेव बळवंत फडक्यांचें गाव जे शीरढोण तेथील लोहाराने बंदुका केल्याचा उल्लेख पान १५५ वरील नोंदीत आहे. बहुतेक लोकांकडे बंदुका असत. गुळसुंद्यास निजसुऱ्यांकडे बंदुकांची मागणी चिपळूणकरांनी केली होती (२५५). बंदुकीच्या २८ गोळ्याना सहा आणे पडले आहेत (१५६).

तरवारीची किंमत १० रु. च्या सुमारास असावी (१५५). पान २७४ वर "।· सीलेखाना खर्च भवानी तरवार इची मूठ बांधली त्यास रेशीम" अशी एक नोंद आहे. ही फार महत्त्वाची आहे. भवानी हें नांव अनेक तरवारींचें होतें ही गोष्ट ह्या नोंदीवरून निर्विवाद होते. १५५ पानावरील नोंदीवरून ढालींच्या किंमती समजतात. पंचरसी तोफेच्या निमित्ताने २॥। रु.च खर्ची पडले आहेत (२७४). कमाण व तीर २॥= रुपयांस विकत मिळूं शकत.

तोफा बनवण्याचे कारखाने काढले होते. एका तोफेचा दुमाला जाया झाला तो नवा करण्यास ५४-८ रु. खर्च आला (९१). हें काम कासारांनी केलें. एका कासाराचा पगार दरमहा ३० रु. असून दुसऱ्याचा १२ रु. होता. ह्या कामास १ महिना ९ दिवस लागले. काम झाल्यावर कारागिरांना २५ रु. बक्षीस मिळालें (९२). सरनागीन तोफेच्या चोडेशीसाठी अलीबागेहून माती आणल्याचा उल्लेख पान ९२ वर आहे. चोडेशी म्हणजे मूस असेल. मूस करण्यास विशेष प्रकारची माती लागत असावी. पुरंधरच्या किल्ल्यावरील केदाराच्या देवळांतील फुटकी

घांट सरनागीण तोफेचा बुंधेरा ओतण्यास उपयोगांत आणली होती. ह्यावरून पुरंधर येथेच ही तोफ ओतली असण्याचा संभव आहे.

तोफी दारू व बंदुकी दारू विकत मिळे. पुण्यातील दुलभशेट गोविंदजी हा दारूदुकानदार होता. तोफेची दारू रुपयास ३, ३॥, ५ शेर ह्या दराने विकली जाई. त्या मानाने बंदुकीची दारू स्वस्त असे. रुपयास अडीच शेर मिळे. हत्यारांना दागिनेहि कोठे कोठे म्हटलेलें आहे.

## २३

**इमारती काम**

इमारत हा शब्द पूर्वी कोणत्याहि बांधकामाला अगर खोदकामाला लावलेला आढळतो. ह्या पुस्तकांत खालील कामांचा उल्लेख आहे.

| काम | सुरवातीचें वर्ष | खर्च | संदर्भपृष्ठ |
|---|---|---|---|
| ओंकारेश्वराची भिंत | श. १६७५ | ६७९२। | २४१ |
| पर्वतीचें तळें | ,, १६७५ | ३६५८३॥= | २४८ |
| पर्वतीची भिंत | ,, १६७६ | ६२०३॥- | २४९ |
| कात्रजचें तळें | ,, १६७७ | सुमारें दोन लाख | २४३ |
| गौतमाश्रम | ,, १६८१ | ३४५०। | २४१ |
| बोरघांटचें तळें | ,, १६८१ | ५०३० | २६१ |
| तुळापूरच्या पायऱ्या | ,, ,, | १२००० | २६१ |
| तुळशीबाग | ,, १६८३ | | |
| नहर कारखाना | ,, १६९१ | ७७३२० | २५१ |
| नहर पर्वती | ,, १७०१ | ८३२६८ | ४४ |
| जेजुरीचें तळें | ,, १७०१ | १०००० | २६० |
| प्रवरा नदीला घाट | ,, १७०६ | ३३६० | २६० |
| नृसिंहाचें देऊळ | ,, | | २४२ |
| रामेश्वर देवळाचे तीन खण | ,, १७३३ | १३९।- | २५० |
| विष्णु मंदिर | ,, १७४३ | २४९६।=। | १७५ |

खर्चाचे आकडे नक्की नाहीत. ह्यापेक्षा अधिक, पण कमी नाही एवढेंच समजावयाचें.

ह्याशिवाय पुस्तकांत न छापलेला ओंकारेश्वराच्या दीपमाळेचा खर्च येणें-प्रमाणे—

१५०० रु. इमारत दीपमाळ श्रीवोंकारेश्वर देणें खर्चीबाा नि॥ कृष्णंभट चित्राव परभारें थोबनदास श. १६८९.

ह्यानंतर श. १६९१ ची दुसरी नोंद आहे ती—१७३७ रु. इमारत दीपमाळ वोंकारेश्वर.

ह्यावरून दीपमाळेकरता ३२३७ रु. खर्च झाला असावा असें दिसतें.

दोनहि नोंदी कल्याणच्या सुभेदारांच्या वह्यांतील आहेत.

तसेंच तुळशीबागवाल्यांच्या जमाखर्चांत श. १६६८ सालीं इमारत कोटेश्वरखातीं २४६८॥-॥, २९०४॥=, ११११३, १०१४८≡ अशा चार रकमा पडल्या आहेत. एकंदर बेरीज ७५००॥=॥ रु. होते.

इमारत तळें गंगासागर ह्या तपशीलाने एकदा ७४८०॥·॥ व दुसऱ्यादा ४२॥ रु. खर्ची पडले आहेत.

कात्रज तळ्याच्या कामाबद्दल रकमा श. १६८३ पर्यंतच्या जमाखर्चांत असून पुढे श. १७१० ते १३ पर्यंतच्या जमाखर्चांतहि पडलेल्या दिसतात (४४). श. १७१० त तळें कात्रजच्या खातीं १३६५३८= रु. ज्येष्ठांत आणि ४३२०॥ रु. मार्गशीर्षांत एकूण रु. १७९७३॥= पडलेले आढळतात.

शके १७०४ सालीं ह्या तळ्याची ताल ५०००० रु. खर्च करून बांधल्याचे दिसतें (४३).

तुळशीबागेतील मूर्ति केव्हा कोणीं व कितक्याला केल्या याची माहिती पान २४७ वर आहे. जेजुरी येथील मार्तंडाची मूर्ति वडवणारास ७०० रु. द्यावे लागले (१७०).

पुरंदर येथील किल्ल्याच्या दरवाज्याला १५००० रु. लागले असावे. हें काम श. १७०० सालीं झालें (२६०). पंढरपूरच्या पुंडलीकाच्या देवळाचा जीर्णोद्धार तुळशीबागकरांनी श. १७०६ मध्यें केला (२४).

"मोरी नदी किनारा" हें काम श. १७०५ मध्यें सुरू झालें असावें. निदान ५००० रु. खर्च आला असेल (४१). ह्याशिवाय श. १६९६ त मोरीचें काम करण्यात आलें तें निराळेंच.

घरगुती बांधकाम बहुधा माती-विटांचेच असे. चुन्याचें बांधकाम थोडें होई. भाजलेल्या पक्क्या विटांचा भाव हजारी १॥ रु. असून कौलेंहि त्याच भावाने मिळत (२७३). चुना दर खंडीला १२-१३ रु. प्रमाणें विकला जाई.

चुना मळतांना त्यांत गूळ, कात, डीक, ताग व हिरडे मिसळीत. ह्यांचें प्रमाण पृ. २७४ वर दिलें आहे तें पाहावें.

२४

**आंख**

कापडाची किंमत आंखांवर असे. आंख म्हणजे आंकडा. कोरें कापड आंखांवर ओळखलें जाई. किंमतीचा आणि आंखांचा संबंध असावा. आंखांचे आंकडे ७५, १३३, २०२, २७१, १०००, ११००, १२५०, १२९०००० इतके आलेले आहेत (४, ५, २१, २४, २५, १५०, २१३). रुपयास २, ४, ५, ३३$\frac{१}{३}$, ७१११ आंख असें दराचें प्रमाण पडतें. १३३ व २०२ ह्या भिन्न आंखी कापडाच्या किंमतीचा दर एकच आहे. १२,९०,००० हा आंख शालजोडीचा आहे (१५०). पान २१३ वरील पोषाखाच्या कापडांचे आंख व किंमती ह्या पाहिल्या तर त्यांचा दर एकच आहे असें दिसून येईल. एक रुपयास ३३$\frac{१}{३}$ आंख हा दर पडतो. अथवा १०० आंखांना २$\frac{७}{१०}$ पै, ३ रु., २० रु., २५ रु. हे दर पडतात. दर अधिक तितके आंख कमी आणि आंख जास्त तेथे दर कमी असा हिशेब दिसतो. पान २१ वर गोपाळशास्त्र्यांचें वेतन दिलें आहे. त्यांत २०० रु. कापड आंख १००० दर ५ प्रमाणे असा मजकूर आहे. ह्यावरून अनुमानें निघतात तीं—१ कापड प्रत्यक्ष देत होते. रुपये देते नसत. रोख रुपये कापडाऐवजीं देते तर कापडाचे आंख सांगण्याचें कारण नव्हतें; २ कापड द्यावयाचें तें १००० आंखांचेंच असावयाचें. ह्यावरून कापडाची जात अथवा गुणधर्म यांचा आंखाशीं संबंध होता. इंग्रजी अंमलांत शास्त्रीबोवांना कापडाबद्दल रोख रुपये देत होते हें खरें. परंतु आंखांच्या निर्देशावरून पूर्वीचा उद्देश व्यक्त होतो. कापड वेतन खातें जमा करीत. यावरूनहि प्रत्यक्ष कापड देण्याची वहिवाट सिद्ध होते. कापड द्यावयाचें तर तें ठराविक किंमतीचें असलें पाहिजे हें उघड आहे. आता अमुकच जातीचें कापड असें निश्चित नसतें तर कोणतेंहि २०० रु. किंमतीचें कापड विकत घेऊन देतां आलें असतें. आणि म्हणून आंख नमूद करण्याचें प्रयोजन नव्हतें. तेव्हा ज्या अर्थी आंखांची संख्या दिली आहे त्या अर्थी तिच्यावरून कापडाची तऱ्हा निश्चित करतां येत असली पाहिजे.

हे कापडावरचे आंख म्हणजे किंमत ठरविण्याचा दुकानदाराचा संकेत

असता तर गिऱ्हाइकाच्या जमाखर्चांत त्यांचा निर्देश करण्याची जरूरी नसती. तथापि संकेत नव्हता असें नाही. पान १५० वर ८।।। रु. पातळें नागपुरी मुलीस; आंख.

४७। ६३।।।

बारा पट आंख बाद ८– प्रमाणे.

असा मजकूर आहे. ह्यात संकेत आहे. ४७।+६३।।।=१११. ह्याचे बारा पट म्हणजे १११/१२ = ९-४-० रु. ह्यातून रुपयास ८– प्रमाणे ९ आणे वजा करतां बाकी सुमारें ८।।। रु. राहते. ह्यांत आख अपूर्णांकांत आहेत ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. तसेंच बारा पट म्हणजे एकद्वादशांश; बाराने गुणावयाचें नाही, भागावयाचें; आखांतून उत्तर रुपयांत येतें इत्यादि गोष्टी सांकेतिकच स्वरूपाच्या आहेत. दुसरीं उदाहरणें—

रु. ४१।। जमा कृष्णाजी ना। दातार हस्तें सुदामा तिवर्टें आंख.

३८≡, ४।।–।।, ५।, २।।।–, २।।।=, ५।।=, २।।=, २।, ४।।–।।, ३।।–, ५।–।।, ५।।=, ५।।=.

५३।।।=।। पैकी वजा दिढी बाद बाकी

३५।।।≡ मुद्दल

५।।– नफा दर ८–।

४१।। (तु.बा.) श. १६७०

दिढी म्हणजे १/३ . दर रुपयास ८–।। प्रमाणे नफा आकारला आहे तो ५३।।।=।।। रुपयांवर आहे. दिढीबादप्रमाणे सवाईबाद करण्याचा संकेत होता. उदाहरणार्थ—

२१।। रु. जमा कृष्णा ना। भिडे आहेरखर्च व कापडखातें तिवर्टें ५.

९८–, ८।।।, ८।।।, ९।=, ९।= एकूण ४५।– पैकी निमे रु. २२।।=।। वजा सवाई.

१८८= मुद्दल

३।= नफा दर ८≡ प्रमाणें.

२१।।

येथे सवाई म्हणजे १/५.

आंखांसंबंधाने मुद्दल आंख, निम्मे आंख अशीहि भाषा वापरलेली आढळते (३०९, ३१०).

आणखी एक आंखाचें उदाहरण १४॥।-। रु. दुपेटा जैनाबादी, देणें दाजीबा रास्ते नमस्कारास आले ते समयीं आंख १५॥।- प्रो. वजा रुपयास ८- बाद प्रो ॥।≈॥। बाकी (चि.)

खासगीवाल्यांच्या जमाखर्चात आंखाचीं तीन उदाहरणें आहेत (३०९,१०). एकामध्ये सवाईबाद व नफा, दुसऱ्यांत निमे आंख, सवाईबाद व. नफा आणि तिसऱ्यांत मुद्दल आंख व नफा ह्या किंमत ठरवण्याच्या पायऱ्या आहेत. पहिल्या उदाहरणांत आंखाच्या आंकड्यातून सवाई म्हणजे ५ बाद म्हणजे वजा करून बाकी राहील त्याच्यावर रुपयास एक आणाप्रमाणे नफा होईल तो मिळवावयाचा म्हणजे किंमत निघते. दुसऱ्या उदाहरणांत निमे आंख करून त्यांतून सवाई आंख बाद करून बाकी राहील त्याच्यावर नफा आकारून विक्रीच्या किमतीचा आंकडा निश्चित करावयाचा. तिसऱ्या उदाहरणांत मुद्दल आंखावर एकदम नफा आकारून तो मिळवून किंमत कायम केली आहे. ह्या ठिकाणीं नफ्याचा दर तीन आणे आहे. ह्या ठिकाणी किंमतीकरता धातलेला सांकेतिक आंकडा हाच आंख शब्दाचा अर्थ मानतां येईल.

आंख आणि कापड ह्यांचा इतका निकट संबंध होता की, आंख म्हणजे वस्त्र असा अर्थ झाला. 'खाण्यास अन्न नाही आणि पाघरण्यास आंख नाही' अशी म्हण पडली.

आंख शब्द कापडाप्रमाणे तुळयांना म्हणजे लाकडाला लावलेला आढळतो (१४९). परंतु अनेक उदाहरणांच्या अभावीं त्यासंबंधाने अधिक लिहितां येत नाही.

अधिकच घोटाळ्यांत पाडण्यास आणखी उदाहरणें देतां येतील : २॥।= जमा पागोटें १ आंख ४८=;

१७॥≈ जमा रामाजी नाईक दातार तिवटें

१४॥।= मुदल दिढी व सवाई व नीम हिसा वजा करून बाकी
२॥।- नफा दर ८≈ प्रो

आणखी दुसरें एक उदाहरण विचार करण्यासारखें आहे— १९॥। रु. धोंडो केशव लष्करांत सनगें सरकार रु. १३ महमुदी १ आख २६; रु. ६॥। जोड आख १३॥· ह्यांत महमुदी १ रुपयास दोन आंखप्रमाणें आहे. तेंच किंमतीचें मान ६॥। व १३॥ ह्यांतहि दिसतें. परतु जोडआख म्हणजे काय ? पावणेसात रुपयांचें व १३॥ आंखाचें हें दुसरें वस्त्र होतें असें वाटतें. जोड शब्द जोटच्या ऐवजीं चुकून पडला कीं काय असा संशय येतो. परंतु जोड कापडाला आंख

असल्याचें उदाहरण आढळण्यांत आलें नाही. ह्यामुळे दुसरा एक विचार मनांत येतो तो हा की, सर्व प्रकारच्या कापडाला आंख असत कीं नाही.

आणखी उदाहरण—

रु. १३॥|- जमा लुगडीं १३॥=|||; ६॥=| =२०|- वजा सवाई बाकी १६| पैकी वजा सवाई बाकी १३ नफा दर ८- प्रो |||- =१३॥|-.

पेशवे रोजनिशींतून (८.१८३) पुढील उतारा घेतला आहे.

तैनात सालीना

| | नक्त रुपये | कापड आंख |
|---|---|---|
| गोविंद चिमणाजी | १०० | ५० |
| त्रिंबक गोविंद | १०० | ५० |

एकूण दोन असामींस दोनशे रुपये नक्त व एकशे कापड आंख सालमजकूर अवल सालापासून करार करून देऊन हे सनद तुम्हांस सादर केली असे......येथे आंख निर्दिष्ट करण्याचें कारण काय ? आंखांचा दर सांगितलेला नाही. पन्नास आंखांच्या कापडाला जी किंमत पडेल ती देऊन त्या आंखांचें कापड द्यावयाचें असें समजावयाचें काय ? तसें असल्यास आंख कापडाचा गुण दाखवितात असें म्हणावें लागतें. ५० आंख कापड म्हणजे ५० रुपये किमतीचें असें तर नव्हे ! आंख ह्याचा अर्थ किंमत म्हणून करणें कित्येक ठिकाणीं भाग पडतें.[1] आंख म्हणजे किंमत ह्याविषयी निःसंदिग्ध पुरावा क्वचित् मिळतो. उ. खासा जातीस तैनात......३००० ऐन नक्त २५० कापड आंख एकूण ३२५०[2]. ह्यांत ३००० रुपयांत २५० रुपये मिळवून एकंदर रुपयांची बेरीज केली आहे. ह्यावरून जितके आंख तितकीच किंमत असें समजावयाचें.

एथपर्यंत प्रदर्शित केलेल्या शंकांचें बरेंचसें निरसन पेशवे रोजनिशींतील एका उतार्‍याने होण्यासारखें आहे.[3] आहेराचीं सनगें आलीं म्हणजे त्याच्यावर आंकडे टाकून किंमत ठरवीत. ही अर्थात् सांकेतिक असे. पेशवे सरकारकडून जेव्हा दुसर्‍यांस सनगें देण्याचा प्रसंग येई तेव्हा तीं बाजारांत विकत घेऊन न देतां आपल्या जामदारखान्यापैकी देत. कोणाला कोणत्या लायकीचें वस्त्र द्यावयाचें हें समजण्याकरता आंख घालण्याची रीत पडली असें वाटतें. सवाई माधवरावाच्या मुंजीच्या प्रसंगीं सनगें आलीं तेव्हा "सनगावर चौपटीप्रमाणे आंख घालून त्यापैकी

१ पे. रो. ५-२२. २ कित्ता ३-५६. ३ पे. रो. ४-१०३ १०९.

चौथाई किंमत जमा" केली आहे. दुसरा उतारा येणेंप्रमाणेः—वाड्यांतील कारकून ......वगैरे यांस ...... कापड आख ५०० पांचशें देविले. त्यास जामदारखान्यांत कापड मिळालें नाही सबब अडीच पट नक्त रुपये २५०[1].

२५

**परदेशी माल**

राज्य घेण्यापूर्वी इंग्रजांनी मराठ्यांचा बाजार जिंकला. हातचा व्यापार जात चालला ह्याची मराठी राज्यांत एकानेहि फिकीर केली नाही. व्यापार हस्तगत केल्याने इंग्रजांना पैसा तर मिळालाच पण शिवाय मराठ्यांमध्ये देशाभिमान नाही व दूरदृष्टीहि नाही हेंहि त्यांस कळून चुकलें. ह्या अनुभवाचा त्यांनी पुरेपूर उपयोग करून घेतला. इ. स. १७४५ पासून ( ह्या पुस्तकांतील नोंदीप्रमाणे ) आमच्या बाजारांत सर्वत्र इंग्रजी माल खेळूं लागला. कापड, कागद, लोखंडी सामान ( चुका, कुलपें, मेखा वगैरे ), काचेचें सामान ( आरसे, फाणस, तावदानें वगैरे ), तसेंच घड्याळें, चह्हादाण्या इत्यादि पदार्थ ह्यांनी बाजार फुलून गेले. ज्योतिषी पंचागें इंग्रजी कागदावर लिहूं लागले ( १३३ ); इनाम पत्रें लिहिण्यास विलायती कागदांवाचून अडूं लागलें ( १३२ ); घरांतील मोडलेली विळी दुरुस्त करण्यास "इंग्रज" येऊन बसला ( १५२ ); इंग्रजी पोलादाशिवाय तोफांचे काने भरणें अशक्य झालें ( १३१ ); बायका व पुरुष छिटी कापडाने आपलीं शरीरें विभूषित करूं लागलीं ( १९८ ). त्याबरोबर मांजरपाट, जगन्नाथी हे शब्दहि आमच्या तोंडांत ठाणे मांडून बसले. सोप बाजारांत आलाच पण भाषेंतहि घुसला ( ३०८ ). ह्याप्रमाणे इंग्रजांनी आमचा बाजार काबीज केला.

२६

**पेठा**

पुण्यांतील पेठांचीं नांवें अनेक वेळां बदललीं आहेत. पे. रोजनिशींत[2] पेठांची यादी दिली आहे ती येणेंप्रमाणे :— १ गणेश, २ गंज, ३ मुसाफरजंग, ४ शुक्रवार, ५ नागेश, ६ रविवार, ७ मंगळवार, ८ सोमवार, ९ वेताळ, १० नवी पेठ, ११ शनवार, १२ बुधवार.

गायकवाडांच्या पुणें शहराचें वर्णन ह्यांतील माहितीवरून असें दिसतें की, मंगळवार पेठेला अष्टपुरा व शनवार पेठेला मुरचुदाबाद हीं नांवें होतीं. ह्या-

---

१ किता १०२. २ ७-२३७.

शिवाय नवापुरा म्हणून भवानी पेठेच्या पूर्वेस घाशीराम कोतवालाने बसवलेली पेठ होती. नाना पेठेचें नांव हणमंत पेठ होतें. शिवपुरी हें रास्ता पेठेचें नांव होतें. ह्याशिवाय घोरपडे पेठ होती. ह्या पेठेंत हल्ली चांभारांचीं घरें आहेत.

नरसिंह आणि मस्तानी ह्या पेठांचा उल्लेख प्रस्तुत पुस्तकांत आला आहे ( २५१, २४२ ). सध्याच्या वेताळपेठेला पूर्वी तोफखाना पेठ म्हणत (२४३). गुरुवार व वेताळ हीं एकाच पेठेचीं नांवें असावींत. गुरुवार पेठेचा निर्देश पानें ७, ४८, २५० वर आला आहे. तोफखाना पेठेचा आणखी उल्लेख पान २८४ वर आढळेल.

---

# थोड्या उल्लेखनीय गोष्टी

## प्रकरण १ लें

पान १. विडयाचीं पानें दोन लाख लग्नाला लागलीं त्यासंबंधानें "सरकारांत लग्नाचे नेमणूकबाा" हे शब्द महत्त्वाचे आहेत. त्यांवरून एकेक पदार्थ एकेकाकडे सोपवला होता असें दिसतें.

निळकंठ महादेव म्हणजे आबा पुरंदरे.

पान ३. सवाई माधवरावाच्या लग्नाकरता वाघेऱ्याहून लोक आणले होते. नाशिकच्या वायव्येस २३ मैलांवर वाघेरा आहे.

पान ५. गंगाधरराव रास्ते हा गोपिकाबाईचा भाऊ.

पान ७. दुसऱ्या बाजीरावाच्या लग्नाचा किरकोळ खर्च इतरत्र उपलब्ध होण्यासारखा नाही.

पान १०. गोविंदपंत गोडबोले ह्यांचा निर्देश रियासत उ. वि. २ पृ. ४६८ मध्ये आला आहे.

पान १०, ११, २६९ ह्या पानांतील तीन पत्रें महत्त्वाचीं आहेत. पृ. २६९ मधील आप्पासाहेबांचा उल्लेख स्पष्ट आहे. ते चिमणाजी आप्पा होत. आसीवर म्हणजे काशीस ते राहत असत. श. १७५५ सालचीं हीं पत्रें आहेत. त्याच्या अगोदर चिमणाजीआप्पा मयत होते हें भाद्रपदांतल्या पत्रावरून उघड दिसतें. चिमणाजी आप्पाच्या मुलीचें लग्न झालें. रघुनाथ सदाशिव थत्ते यांच्या मुलास दिली. रमाबाई चिपळूणकर ही रघुनाथ सदाशिवाची मुलगी असावी. चिमणाजी आप्पाला मूलबाळ नव्हतें (रि. उ. वि. ३. ५६६) हें विधान बरोबर नाही असें ह्या पत्रांवरून दिसतें. सानेप्रकाशित पेशवे बखरींत (पृ. १९४) चिमाजी आप्पाची मुलगी राघोपंतास दिल्याचें लिहिलें आहे तें चुकीचें दिसतें.

पान ११. पेमगड किल्ला निजामाला परत दिल्याची हकीकत आहे. परंतु घेतल्याची हकीकत येथे मिळते.

सावनूरच्या स्वारीसंबंधाने राजवाडे खंड ३, ६ पाहावे.

पान १३. साष्टीच्या हल्ल्याच्या खर्चाचा तपशील वाचण्यासारखा आहे.

पान १५. कल्याण इंग्रजांनी घेतल्याची हकीकत व त्यामुळे झालेली सुभेदारांची तारांबळ बोधप्रद आहे.

पान १७. व्याघ्रगडसारख्या लहान किल्ल्याचा खर्च समजतो. प्रत्येक किल्ल्याच्या खर्चासाठी गांवाचें उत्पन्न लावून दिलेलें असे.

पान १८. सरज्यापूर, हुमगांव, आरडे हे गांव जावळी तालुक्यांत (सातारा जिल्हा) आहेत. सरज्यापूर नाना फडणीसाच्या बेलबागेकडे लावून दिला होता.

पान १८. १९ ह्यांत गंगाधरशास्त्र्याच्या खुनाची हकीकत फार महत्त्वाची आहे. चिपळूकर स्वतः हजर होते. रावजी मराठे व चिपळूणकर गंगाधर शास्त्र्याच्या घरीं बसले होते व खून झाला तेव्हा शास्त्रीबोवा बरोबर होते.

## प्रकरण २ रें

पान २०. राघो नारायण गुणे हा दप्तरकडे श. १७१९ सालीं कारकून होता (पे. डा. ५.२०३). पुढे सात वर्षांनी त्याला तुरुंगवास कां सोसावा लागला तें समजत नाही. ह्याचा उल्लेख पुढे पृ. २८ मध्ये आला आहे.

पान २१. रामशास्त्र्याचा मुलगा गोपाळशास्त्री ह्याच्या शरीराचें वर्णन आहे. तो ठेंगणा होता. ४१ व्या वर्षाच त्याचे केस पिकलेले होते. श. १७०० मधला त्याचा जन्म असला पाहिजे. त्याच्या वर्षासनाचा नक्की आंकडा व तपशील दुसऱ्या कोठे दिलेला आढळला नाही. रामशास्त्र्यांना १००० रु. दक्षणा अधिक मिळे (गायकवाड ३४). म्हणजे गोपाळशास्त्र्याला ३२०० व रामशास्त्र्यांना ४२०० रु. मिळत. बापाचे फक्त दक्षणेचे रुपये मुलाच्या वर्षासनांत कमी केले.

पान २४. तुळशीबागकरांचें वेतन येथे आपणांस प्रथमच कळतें.

पान २५. श. १६९९ मध्ये नाना फडणिसाचें लग्न झालें त्याचा उल्लेख ऐ. ले. संग्रहाशिवाय इतरत्र नाही. आबेगांवीं झालेलें लग्न हें चौथें असावें. ह्या लग्नाची तारीख सरदेसाई देत नाहीत (रि. उ. वि. ३.९८).

श. १७०५ च्या गर्भाधानाचा उल्लेखहि नवीनच वाटेल.

पान २६. श. १७०६ व १७०७ मध्ये नानाला मुलगा झाला होता ही नवीन माहिती आहे. ह्या सर्व उल्लेखांवरून नानाला एकाच वेळीं एकीहून अधिक स्त्रिया होत्या असें दिसतें.

निजामाच्या राज्यांत नानाला जाहगीर गांव मिळाला होता. त्याच्या मोबदल्याची हकीकत येथे आहे.

पान २७. रामशास्त्र्यांना कर्ज होतें असें दिसतें. तुळशीबागवाल्यांच्या वहींतला हा उतारा आहे. दुसरा एक उतारा आहे तो असा—

५०० रु. रामशास्त्री प्रभुणेकर याजकडील खाते बाकी पो नामे देऊबा नाईक रास्ते लग्नाबा फडशाचे. रास्ते मशारानिल्हेकडे शास्त्रीबावाचा ऐवज येणे त्याबा श. १७०३ ज्येष्ठ.

येथे प्रभुणेकर कां म्हटलें आहे तें समजत नाही.

पान २८. सखारामबापूच्या स्त्रीचें डोहाळेजेवण हा मजकूर लक्षात घ्यावा.

## प्रकरण ३ रें

पान ४५. वरवड टका म्हणजे कापडावरचा कर.

## प्रकरण ४ थें

पान ५८. पाटीलकी सर्व गांवकऱ्यांनी विकली आहे. गांवकऱ्यांनी काय अधिकाराने पाटिलकीचें खरेदीखत करून दिलें तें पाहणें अवश्य आहे. अशीं दुसरीं उदाहरणें एकत्र केलीं तर कांही महत्त्वाचीं अनुमानें निघूं शकतील. पाटील हा जवळ जवळ स्वतंत्र अधिकारी असे. गांवाचा मांडलिक राजा असें म्हणण्यास हरकत नाही. कारण राजाकडून त्याची नेमणूक होत नसे व पगारहि त्याला राजाकडून मिळत नसे. गांवांत त्याचा पहिला मान असे. पाटिलकीचा अधिकार वंशपरंपरा चाले. परंतु निर्वंश झाल्यास राजाकडून नेमणूक न होतां गांवाकडून होत असावी. म्हणूनच पुढे पैशाच्या लोभाने गांवकऱ्यांनी पाटिलकी विकण्याचा प्रघात पाडला असावा. नुसता चौथा हिस्सा ७००० रुपयांस घेतला आहे. विकत घेतांना किती लोकांना संतुष्ट करावें लागलें हें सनगांच्या देणग्यांवरून दिसून येणारें आहे. पाटलाने सरकारी सारा भरला की तो गांवाचा राजाच झाला. ब्राह्मणांकडे पाटिलकी केवळ खरेदी हक्कानेच आलेली दिसते.

पान ६७. १. घर वाढविण्यास अथवा दुरुस्त करण्यास परवानगी घ्यावी लागे. २. घोडे छापण्याची वहिवाट पूर्वापार चालत आली आहे. पेशवाईत बंद

झाली असावी असें सेन म्हणतात (६४३). परंतु येथे उंट छापण्याची नोंद आहे ह्यावरून घोडेहि छापीत असावे असें अनुमान करतां येईल.

पान ६८. १. पोतदारीची कमाविसी देतांना कमावीसदाराकडून जामीन घेण्याची वहिवाट होती. २. हिशेबाची तपासणी कशी करून होत असे तें वाचण्यासारखें आहे.

पान ७१. खेडीं अगर महाल एका सुभ्यांतून काढून दुसऱ्या सुभ्यांत घालण्याची वहिवाट होती, असें चोण महाल कल्याणातून राजमाचीकडे गेला ह्यावरून दिसतें.

पान ८०. किल्ल्यावर तिजोरी ठेवीत.

दान ८९. त्रिंबकजी डेंगळे याजकडे तोफेचे प्यादे कां असावे ?

## प्रकरण ५ वें

पान ११३. लाडोजी जाधवराव हा जोत्याजी जाधवराव वार्डाकर ह्याचा मुलगा. पिलाजी जाधवराव थोरल्या बाजीरावाचा मोठा शूर साहाय्यक व हस्तक त्याच्यापासून लाडोजी चौथा पुरुष येतो.

पान ११६. एका सोनार जातीच्या स्त्रीने पाट लावल्याचें उदाहरण.

## प्रकरण ६ वें

पान १३०. बाजीरावसाहेबाचा दंगा म्हटला आहे ही आमची स्वदेशप्रीति !

पान १३४. ३५ वा हिस्सा वजा करण्याची वहिवाट कां व कशी पडली ह्याचा विचार अद्यापि झालेला नाही.

पान १५५ बडीभाई; छोटीभाई=बडीशोप व अजमोदा अथवा बाळंतशोपा.

## प्रकरण ७ वें

पान १७४. 'तीळ मराठे' म्हणजे कोणते ?

पान १७६. धोंडो अनंत पटवर्धनाला काळ्या पाण्याची शिक्षा कां झाली समजत नाही. परंतु पुण्याच्या ब्राह्मणांत ह्या शिक्षेने बरीच खळबळ उडवून दिलेली दिसते.

दुसरें वेदोक्ताचें प्रकारण आहे. पळनीटकर व भिडे हे दोघे मोहोपाडचे वजनदार गृहस्थ होते. भिड्यांचा मोहोपाड्यास मोठा वाडा होता तो कांही वर्षांपूर्वी जळाला. दोघेहि त्या वेळचे सुधारक दिसतात.

पान १८६. ह्या नाटक कंपनीची माहिती अगदी नवीन आहे. ह्यावरील टीपा श्री. मुजूमदार ह्यांनी दिल्या आहेत.

पान १९७. राशींच्या गंजिफा या खेळाची माहिती मला कोठे मिळाली नाही. हा खेळ बंगाली आहे असें ऐकतों.

पान २१७. ब्राह्मण मुलीचा मुसलमानाशीं संपर्क झाला त्याचें ग्रामण्य.

## प्रकरण ९ वें

पान २२३. नाविक कोश मीं स्वतः माहिती गोळा करून बनविला आहे; दुसऱ्या पुस्तकांतून घेतलेली नाही.

## प्रकरण १० वें

पान २४७. रामचन्द्रजीची मूर्ति एका बोवाने तुळशीबागकराना आणून दिली असें सरदेसाई लिहितात. परंतु तें खरें दिसत नाही. उमाजीबाबा पंढरपूरकराकडून ३७२ रुपयांस श्रीची मूर्ति घडवून घेतली. मूर्ति करणाराचें नाव येथे आपणांस समजलें.

## प्रकरण ११ वें

पान २५६. काशीस जातांना मुक्काम कोठे होत असत व किती दिवस लागत हें समजतें. कामथडीपासून काशीस जाण्यास जवळ जवळ एक महिना लागे.

पान २५८. सत्यनाथपुरी=वाईतील एक आळी. सध्या हें नांव प्रचलित नाही. हिला हल्ली मधली आळी म्हणतात. पेशवाईत गणपति आळीचाही ह्या नांवांत अंतर्भाव असे.

पान २५९.१. कोरेगांव मिळविण्याची पटवर्धन ह्यांची खटपट. २. अबदागीर पेशवाईनंतर कोणीहि मनुष्य वापरी. अथवा राजाच्या परवानगीवाचून कोणालाहि अबदागीर वापरण्याचा अधिकार नव्हता हें म्हणणें निराधार दिसतें. चिपळूणकर सरदार नव्हते. हें पत्र इ. स. १८२७ मधील आहे. अबदागीर वापरणें हा मान असता तर पेशवाई बुडाल्यावर १० वर्षांच्या आंतच पूर्वीचा निर्बंध लोकांनी झुगारून दिला नसता. उन्हाळ्यांत अबदागिरीची अवश्यकता वाटे. केवळ वैभवाचा हा प्रश्न नव्हता. तसेंच कोणत्याहि मनुष्याला अबदागिऱ्याचें काम करतां येत नसावें असें वाटतें. नाहीतर पुण्याहून मुंबईस अबदागिऱ्या गडी नेण्याचें कारण नव्हतें. कदाचित् चिपळूणकरांकडे अबदागीर नसेल फक्त अबदागिऱ्या असेल आणि पटवर्धन हे सरदार घराण्यांतील असतील हाच तर्क अधिक संभवनीय दिसतो.

पान २६१. १. परशुरामास आबा जोशी ह्याजकडून पाण्याची तळीं बांधविलीं. खर्च २०० रु. आला. २. जरीपटकेवाले पुरंदरे असें म्हटलें आहे

इयावरून स. १८०० साली पुरंदरे बाजीरावाचे सेनापति असावेत.

पान २६२. रु. ३३।= व ।।।≶।। ह्या दोन रकमांच्या तपशिलावरून सरकारची तोषीस नोकराला लागत नसे असें दिसतें.

पान २६४. आपल्याला बातमी मिळावी म्हणून कित्येक लोक स्वारीबरोबर आपले बातमीदार पाठवीत.

पान २६५. १. स. १७७२ त पेशव्यांच्या सैन्यांत इंग्रज रिसालदार होते. २. गव्हर्नर व मुख्य न्यायाधीश सर जॉन पीटर ग्रँट ह्यांच्यामधील तंटा ध्वनित करणारा जाहीरनामा वाचण्यासारखा आहे.

२९१. १. राजवस्त्रें छ ४ रोजीं सातान्याहून आलीं. छ ५ रोजीं नजरा झाल्या. २. बाजीरावास पुत्र झाल्याची साखर छ २९ रोजीं वाटली. हा बारावा म्हणजे बारशाचा दिवस होता. छ १७ ला मुलगा झाला म्हणजे आश्वीन वाा ५ ला पुत्रजन्म. कार्तिक शुा १ छ २९ हा बारावा दिवस. परंतु नामकरण कार्तिक शुा ७ या दिवशीं झालें.[1] ह्यावरून बारसें सतराव्या दिवशीं झालें असें दिसतें. पुढे मुलगा मेला असला पाहिजे. मग खासगीवाल्यांची कुंची शिलकेस कां राहिली समजत नाही.

२९२. श. १७३८ च्या भाद्रपदांत बाजीरावास आणखी एक मुलगा झाला तो कुसाबाईपासून असावा.

पान २९५. सोडचिठ्ठी नवऱ्याकडून देवविण्याचा अधिकार सरकारचा असे. ही चाल अज्ञानाने नष्ट झाली आहे.

पान २९८. कामसमूह हा कामशास्त्रावरील ग्रंथ आहे. संवत् १५१५ मध्ये अनंत नामक माणसाने हा ग्रंथ रचला. ह्या ग्रंथाची एक हस्तलिखित प्रत लंडन येथे इंडिआ ऑफिस पुस्तकालयामध्ये आहे.[2]

पान ३००. बायका पकवाज वाजविणाऱ्या होत्या.

पान ३०२. गौरीला पायपोसाचें दान केलें आहे. वर्तमानकाळीं सुद्धा आटपाडी महालात महालक्ष्मीला जोडे (पायपोस) वाहण्याची चाल आहे. देवीला जोडे प्रिय आहेत असें दिसतें.

पान ३०५. अक्षय्य तृतीयेला पायपोसाचा जोडा दान करण्याची चाल सध्या नाही. धर्मसिंधूंत हें दान सांगितलेलें नाही.

पान ३०६. श्राद्धास भोजनदक्षणा ठेवीत. हल्ली ठेवीत नाहीत. श्राद्धाच्या ब्राह्मणांव्यतिरिक्त इतरास दक्षणा देणें सशास्त्र आहे असें वाटत नाही.

---

१ पे. रो. ५-४७. २ कर्जतचे श्री. गजानन रघुनाथ मुळ याना दिलल्या माहितीवरून.

पुस्तक छापतांना कांही मजकूर गळला, कांही पुनः छापला गेला; तसेंच कांही मजकूर भलत्याच ठिकाणीं आला आहे व कांही तोडला गेला आहे. सबब कसें झालें व कसें पाहिजे तें पुढील पृष्ठें दाखवतील.

| पृष्ठ | ओळ | घालणें | काढणें | कोठे व कसें वाचावें |
|---|---|---|---|---|
| ४ | शेवटची | "माघ"च्या पुढे<br>शु ९श.१७०४ | | |
| ११ | | | | १. रमाबाई चिपळूणकर हिचें पत्र पृ. २६९ वरील तिच्याच दुसऱ्या पत्राबरोबर वाचणें. |
| " | | सावनूर स्वारी-निमित्तपूर्वी रकमा नावें पडल्या आहेत त्या—<br>श. १६७८ चैत्र<br>३४८०० लष्कर खातें<br>वैशाख<br>७१७६० "<br>१३७२८ "<br>४०० "<br>१०४०० "<br>२००० "<br>ज्येष्ठ<br>७७८१। "<br>१८८४८ "<br>१७०३३।= "<br>१०५१६꠸= "<br>१०९०६꠸- "<br>आषाढ<br>७००३ "<br>इतक्या रकमांच्या हुंड्या सावनुराहून केल्या. | | २. सावनूरच्या स्वारीचा मजकूर पृ. ६७ वरील मजकुराबरोबर वाचणें. |

| पृष्ठ | ओळ | घालणें | काढणें | कोठे व कसे वाचावें |
|---|---|---|---|---|
| १२ | | | | १ तळें बोरघाटसंबंधी माहिती पृ. २६१ वरील चौथ्या ओळीं-तल्या माहितीबरोबर वाचावी.<br>२. महिन्याचा अनुक्रम खालीं वर झाला आहे तो मनांत आणून वाचावें. |
| १३ | ७ | | | ह्याबरोबर पृ. २२ ओळ ५ मधील मजकूर वाचणें. |
| १४ | | | | १. ६८००४ ही बेरीज आहे त्या जागची खोडून ४ रु. देणें सांडणीस्वार ह्याच्या खाली घालणें.<br>२. १०५ रु. नाजूक खर्च ह्याच्या पूर्वी पृ. २०६ वरील नाजूक काम ह्या सदराखालील मजकूर वाचणे. |
| २० | | | | गुण्यांची कैद ह्या मजकुराबरो-बर पृ. २८ मधील भोरकरांस कर्जाचा तगादा हा मजकूर वाचावा. |
| २५ | ९ | | | दाजीबा चिपळूणकराच्या उत्तर-कार्याचा मजकूर अंशतः पृ. १८१ वर पुनः आला आहे. |
| २८ | | | | कल्याण सुभेदार आहे तेथे चिपळूणकर वाचावें. ह्याबरो-बरच पृ. १४० वरील ह्यासंबं-धीची नोंद वाचावी. |
| ३० | १९ | | | "आदा" याच्यापुढे १० रु. हा आंकडा पाहिजे. |
| ३६ | | | वैद्य ह्या कंसा-चा सर्व मजकूर गाळावा; कारण द्विरुक्ति. | |

| पृष्ठ | ओळ | घालणें | काढणें | कोठे व कसें वाचावें |
|---|---|---|---|---|
| ३९ | | | | १. कल्याण सुभेदार या कंसाचा मजकूर पृ. २९ मधील मजकुराबरोबर वाचावा. |
| ,, | शेवटची | | | २. मालोजीचा संबंध पुढील नोंदींतील घोरपडे ह्याशीं आहे. |
| ४२ | शे. नोंद | | | शुद्धिपत्र पाहावें. |
| ४३ | शेवटला परिच्छेद | | | हा सर्व परिच्छेद पृ. २४५ वर पाहिजे. |
| ४५ | | | | नहर पर्वतीचा मजकूर प्रकरण १० मध्ये वाचावा. |
| ४८ | | | शेवटच्या तीन ओळी गाळणें | |
| ४९ | | | | पहिली दोन पत्रें संकीर्ण प्रकरणात हवीं. |
| ५० | | | | शेवटलें पत्र पृ. २९ वर अखेर वाचावें. |
| ५३ | शेवटल्या दोन ओळी | | | संकीर्णांत वाचावें. |
| ५४ | पहिल्यापासून २खिजमतगार पर्यंत | | | संकीर्णांत वाचावें. |
| ५६ ५७ ५८ | कल्याण सुभेदार ह्या कं. चा मजकूर | | | पृ. २९ मध्ये वाचणें. |
| ५८ | पाटीलकीचें खरेदी पत्र | | | ह्याबरोबर पृ. ६६ मधील खरेदीचा मजकूर वाचावा. |
| ६७ | सावनूरची स्वारी | | | ही हकीकत पृ. ११ मधील हकीकतीबरोबर वाचणें. |
| ७१ ते ७७ | सावकारी व्यवहार सबंद | | | एवढा मजकूर प्रकरण ६ मध्ये वाचणें. |

| पृष्ठ | ओळ | घालणें | काढणें | कोठे व कसें वाचावें |
|---|---|---|---|---|
| ७७ | | | १. चिपळूण-कर कंस रद्द समजावा. २. शुद्धिपत्र पाहावें. | |
| ८२ | रिती तिजोरी | | ह्या सदराखालील मजकूर काढावा. पृ. २६७वर आहे | |
| ८४ | | | खासगीवा.कंस रद्द करावा. | कल्याण सुभेदार कंस पृ.२९त वाचावा. |
| ८६ | | | श. १७२२ चा वैद्य कंस काढावा. पृ. ८० व २६१ मिळून आला आहे. | |
| ८७ | | | श. १७१५ इ. १७९३ चुकीने पडला आहे. | लष्करी स्वारीसंबंधी हा मथळा "२८००० पोत्यास दिले" ह्याच्या वर पाहिजे. |
| ८९ | ७ ते ११ ओळी | | | सरकारांत विनंती... हा मजकूर पहिल्या प्रकरणांतील ऐतिहासिकांत वाचणें. |
| १०१ | चिपळूण-कर कंस शे ओळ | | | 'पुगवली येथे तोडावयास गेला सबब' इतका मजकूर अधिक घालून वाचणें. |
| १२२ | पहिला तुळशीबाग वाले कंस | | काढणें | |
| १२३ | १५ | | | "तथापि"पासून "आलें"-पर्यंतचा सर्व मजकूर कंसांत घालावा. |

| पृष्ठ | ओळ | घालणें | काढणें | कोठे व कसें वाचावें |
|---|---|---|---|---|
| १३१ | “परदेशी माल” हा मजकूर | | | पृ. १५१ च्या पुढे घेणें. |
| १३२ | सबंद | | | पृ. १५१ च्या पुढे मध्ये पाहिजे. |
| १३३ | ‘हुंडीचा व्यवहार’ पर्यंत | | | |
| १३६ | | | तिसऱ्या ओळीखाली खासगीवाले हा शब्द व पुढील कंस काढून टाकणें. | |
| १३९ | | | | १ वैद्य कंसापुढे “चलन” हा मथळा देणें. |
| ,, | खालून ३री ओळ | रु.५४८= दर रु. ३७ प्रा घालावें. | | |
| १४५ | | | शके १७५४ चा चिपळूण-कर कंस काढणें | |
| १४७ | रेघेवरचा मजकूर | | काढणें. | |
| १४८ | | | बटा जमापासून मलकापुरी जमापर्यंतचा मजकूर गाळणें. | |
| १४९ | चलनसदराखालील मजकूर | | | पृ. १४९ मध्ये दुसऱ्या ओळीखाली इतका मजकूर घालून वाचणें. |
| १५० | पहिल्या ८ ओळी | | | |
| १५० | | | ओळी ९ ते ११ काढणें. | |
| १८० | | | वैद्य कंस काढणें | |

| पृष्ठ | ओळ | घालणें | काढणें | कोठे व कसें वाचावें |
|---|---|---|---|---|
| १८१ | | | ओळी १० व ११ नकोत. | |
| १८४ | | | | "श्रावणमास" वरच्या ओळींत वाचणें. |
| २०६ | नाजूक काम | | | पहिल्या प्रकरणांत पाहिजे. |
| २२१ | खालून ७ वी ओळ | | कर्ज जमा होन नाणें काढणें. | |
| २२१ | खालून ४ थी ओळ | | काढणें | |
| २६० | | | | शेवटली ओळ "घाट व तळीं" ह्याच्या खालीं वाचावी |

# शुद्धिपत्र

| पृ. | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ९ | दिले. | दिले |
| ,, | मजूरी. | मजुरी; |
| ,, | भोजनखर्च. | भोजनखर्च; |
| ,, | माळी. | माळी |
| ,, | उदमाबद्दल. | उदमाबद्दल= |
| १८ | कमावीत | कमावीस |
| ,, | मसालेदादी | मसाले, दादी, |
| २५ | ह. १७८५ | इ. १७८३ |
| २८ | कल्याण सुभेदार] | चिपळूणकर] |
| ३० | आरा | आदा |
| ,, | सबान | सबा |
| ४२ | ९४८५॥ | १४८५॥ |
| ,, | श. १६९८ | श. १७०३ |
| | स. १७७६ | स. १७८१ |
| ५४ | खिजमगार | खिजमतगार |
| ५५ | रोजमारा | रोजमरा |
| ५६ | खाजगांवा | खाजगीवाले. |
| ६१ | सनसब | सन सबैन |
| ७३ | साल | साठ |
| ७४ | गुबस्तास | गुमास्त्यास |
| ७७ | ४०५८॥· | ४०५४॥· |
| ८० | डोल | डौल |
| ,, | साहु | सदरहु |
| ८८ | भाल | भाले |
| ९१ | नगा | १०॥ |
| ९४ | खोट्याची | लखोट्याची |
| ९६ | वसवानी | वस्तवानी |
| ९७ | ब्राह्मणचाच्याने | ब्राह्मण. चाच्याने |
| १०१ | कसरम झाल्याबा | कसर मसाल्याबा |
| १०५ | तिसनचा | तिसैनचा |

| पृ. | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- |
| १२० | कार्यांत | कऱ्यात |
| १२२ | (मसुरु ५०; जोट ५०; लुगडें एक पैठणी १४ वगैरे) | (रु. ५० मसरू ६; रु ८ जोट २; रु. १४ लुगडें पैठणी १; ९ रु. छीट बंदरी; रु. १० पागोटी ३; रु. ६ मुसेजर १; रु. ५ ताफताहात १४.) |
| १३९ ओळ ३ | प्रो | पो. |
| १४१ ,, १ | आकारमौजे...... | आकार. मौजे...... |
| ,, | ११६ मादशाई | १०५ मादशाई |
| १४५ | (अंकुशी) | काढून टाकावा. |
| १४७ | जवा | जमा |
| १७७ | मध्यसिद्धांत | मध्वसिद्धांत |
| १९८ | ३।।।≥।। | ३।।।≥ |
| २२२ | ๕๕८९ पिंपळमूळ | ๕๕๕९ पिंपळमूळ |
| ,, | ๕๕८९ हळद | ๕๕๕९ हळद |
| ,, | ๕८८९ अजमोदा | ๕๕๕९ अजमोदा |
| ,, | ๕७ ๕९ शगीचें मूळ | ๕๕๕९ शमीचें मूळ |
| २३६ | रंगपंचमी | ऋषिपंचमी |
| २३७ | रंगपंचमीचा | ऋषिपंचमीचा |
| २४६ | १३६६६७ | १३९४५।।। |
| २६६ | हनाम | इनाम |
| २६७ | ३०० | ३२०० |
| २६८ | डिलानी | वडिलांनी |
| २७६ | मरणा | भरणा |
| २९४ | कमवीस | कमावीस |
| ३०४ | ๕१६ | ๕๕१६ |
| ३०८ ओळ २३ | झोपाळ | झोपाळा |
| ३१२ ,, १६ | जिल्बाचे | जिल्बांचे |
| ३१३ ,, १९ | तवे | तवे |

# आभार

श्री. चिंतामण गणेश कर्वे ह्यांनी सर्व पुस्तक वाचून व्यक्तिसूची व विषय-सूची तयार केली ह्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच. त्याचप्रमाणे श्री. शंकरराव जोशी ह्यानी विस्कळितपणें लिहिलेलीं चिटोरीं, छापलेला मजकूर, मंडळांत पडलेलीं टाचणें ह्यांची जुळवाजुळव केली, त्यांचें वर्गीकरण केलें आणि मुद्रितें तपासलीं म्हणून त्यांचेहि आभार मानणें माझें कर्तव्य आहे.

—— × ——

## संक्षेप

पे. म. = पेशवेकालीन महाराष्ट्र

शि. सारसंग्रह = शिवकालीनपत्र सारसंग्रह

पे. रो. = पेशवे रोजनिशी

पे. डा. = पेशवे डायरी

भारत-इतिहास-संशोधक मंडळ-पुरस्कृत ग्रंथमाला क्र. ३४.

# पेशवाईच्या सावलींत

## प्रकरण १ लें

## ऐतिहासिक

तुळशीबागवाले } { श. १६७१-९५ इ. १७४९-७३

### पेशव्यांच्या संबंधानें माहिती

१३ रु. जमा, विक्री जाफरखानी शेला पुरंधरकरास सरकारच्या आहेराबा (चैत्र).

(शक १६७२ च्या वैशाखांत पेशव्यांकडे लग्न[1] झाल्याचा उल्लेख आढळतो.)

४८।। रु. जमा, कापडखातें रोख सरकारांत आहेराबा सनगे दिल्ही त्याचे.

१२५ रु. ( खर्च ) राघो गोविंद बा पानें नागवेलीची सरकारांत लग्नाचे नेमणुकबा सुमार २०००० गुा फकीरा तांबोली देऊन जाब ' घेऊन पाठविला शुा १० ( वैशाख ).

१४।।।= रु. ( जमा ) मावजी पाटील याजकडे आहेरास सरकारांत करावयास तिवटें २.

( ह्यानंतर श. १६८४ ज्येष्ठांत पेशव्यांकडे मुंज झाल्याचा दाखला सापडतो. )

७३। रु. सरकारांत आहेर, सरकार मुंजे[2].

( शक १६८७ च्या श्रावणांत पेशव्यांच्या स्त्रीच्या फलशोभनार्थ जमाखर्ची रकमा पडल्या आहेत.)

९।। रु. जमा, नीलकंठ महादेव सरकारांत ओटभरणास[3] आहेर नेला त्याजबा

---

१. हे लग्नप्रसंग श. १६७२ च्या वैशाखात दोन झाले. सदाशिवराव भाऊचा वैशाख शु. १ स द्वितीय विवाह कृष्णराव कोल्हटकरांची कन्या, नांव पार्वतीबाई इशीं झाला हा एक प्रसंग व दुसरा विश्वासराव यांचे वैशाख शु. ६ स लग्न झालें तो. वधू हरी बाळकृष्ण दीक्षित पटवर्धन यांची कन्या दुर्गा.

२. नारायणराव पेशवे, ज्येष्ठ शुा ५ शुक्रवार. ( ता. २८-५-१७६२ )

३. हें ओटभरण थो. माधवराव पेशवे ( रमाबाई ) यांचें असावें; महिना श्रावण.

लुगडें चोळखण आला तो.

६८।।। रु. घरखर्चाकडील जमा, आहेर सरकारांत फलशोभनास केला त्याचा जमा धरून नावें नीलकंठ महादेव.

( श. १६८९ च्या आषाढ महिन्यांतही सरकारांत आहेर करण्याजोगें कार्य (!) उद्भवलें होतें. )

६३।। रु. खर्च आहेर मेजवानी

२।। सौ. भिकाबाई
१९।- सौ. पार्वतीबाई पेशवे
४१।।≥ आहेर श्रीमंत नारायणराव
६३।।

(श. १६९१ च्या श्रावण महिन्यांत नारायणरावाच्या बायकोस न्हाण आलें.)

खर्च २२।।- रु. माधवराऊ नीलकंठ श्रीमंत नारायणराव यांचे स्त्रीस वाढून नेलें त्यास.

५०।।।=।। रु. माधवराऊ नीलकंठ आहेर श्रीमंत नारायणराव सनगे.

( एक पेशवा मरून दुसरा गादीवर बसला त्या समयीं केलेला खर्च ४शक १६९४.)

२१ रु. नेवासे खातें दुखवटा सेला श्रीमंताकडे गु। जनोबा ( मार्गशीर्ष ).

२०।=।। रु. नवसु जामदार दुखवटा सरकारचा सेला थेवरी.

१४।। रु. नजर श्रीमंतांस मोहोर, सातारियाहून आले ते समयीं ( पौष ).

( घड्याळजी )

१ रु. घड्याळची सरकार गु। सिताराम श. १६९५ श्रावण.

कल्याण सुभेदार } { श. १६९६ इ. १७७४

१८० रु. श्रीमंताकडे लग्न झालें तेव्हा पुणेंयास तांदूळ बाजार पो। घेऊन दिल्हे त्याची किंमत.

२२८≥ सुंदर बाबाजी कारकून

११।।।- हा छ ८ जोवल ता। छ १९ रजब सांवताचे वाडीस जातांना ठेविले मुदत माहे २८११ तैनात दरमहा रु. ५ प्रो.

---

४. नारायणराव वल्लाळ ह्यांस पेशवाई.

तुळशीबागवाले } { श. १६९८
{ इ. १७७७

(हरि विश्वेश्वर व हरि मुरार हे श्रीमंत दादासाहेबाचे शागीर्द होते. कारण त्यांच्या नांवानें प्रत्येकीं ५ रु. श. १६९६ मध्यें पडले आहेत.)

(श. १६९८ च्या फाल्गुन महिन्यांत सवाई माधवरावाचें चौल झालें.)

खर्च किल्ले पुरंधर खातें

४९॥= आहेर श्रीमंतांस चावलास.

( महादजी शिंद्याचें लग्न आळंदीस श. १७०० मध्यें झालें. )

१५ रु. केळीचीं पानें महादजी शिंदे याचे लग्नास आळंदीस पानें डांगा ६५० ( पौष )

(श. १७०१ सालीं सवाई माधवरावाची मुंज झाली)

७४॥ रु. ( १७०१ वैशाख ) श्रीमंतांस मुंजीस आहेर व नजर केली त्यास

६० सनगे
१ फेटा
१ दुपटा
१ विजार
१ झगा
१४॥ मोहोर नाणें १

( ह्याच वेळेला पेशव्याच्या शिक्षणाला आरंभ झाला काय ? )

·।॥· बाळाजीराम लेले खातें श्रीमंत रावसाहेब यांस रंगीत पाटी ( पाट ? ) रवाना पुरंधर सुा १ गु हरी कातारी वा ९ वैशाख

( श. १७०३ मध्यें खालील रकमा खर्ची पडल्या आहेत. )

३१। रु. सरकारांत वाघ व कासव लाकडी करून दिल्हा त्यास खर्च.

११।॥ आमोलीक नो सुतार रोज ७ कासवाकडे १२ वाघाकडे.

आडसेरी सुा दरमहा रु. १९ प्रो. १०॥ फिरंगोजी रोज २४ वगैरे.

३५८ किल्ले पुरंधर किल्ले वज्रगड येथील लोक वाघोऱ्याहून आले ते श्रीमंताचे लग्नाकरता साहित्यास पुण्यास पाठविले त्याचे रोजमऱ्याचे वाटणीस ( माघ )

२३ रु. अलीबहाद्दूर याचे घरीं लग्न झालें त्या बाा[५]

६ रु. तिवट, १२ रु. शेला, ४॥ रु. लुगडें, ·।॥· खण ( श्रावण )

---

५. हे अलीबहाद्दुराचें दुसरें लग्न असावें.

१५॥ सदाशिव मल्हार अलीबहाद्दूर याचे घरीं आहेरास ( श्रावण ).

(पुढल्याच सालीं पौष महिन्यांत पुन्हा लग्नाबद्दल रकमा पडल्या आहेत त्या येणेंप्रमाणें)

१३॥। रु. नेवासें खाते सरकारांत लग्नसंबंधें ब्राह्मणभोजनाकडे लवणशाखेबा. खरीदी निंबें गुा सयाजी माळी सुमार ५००० दर हजारीं २॥। रु. प्रो.

५०० रु. खाते किल्ले पुरंधर शुा १४ लग्नसंबंधे चौकीच्या लोकांस खर्चास बा याद वगैरे.

(पुढें हें लग्न माघ मासांत झालेलें दिसतें. कारण-)

४१० रु. आहेर मेजवानी गुा गणेश गंगाधर देणें जोहरी शिरपेंच श्रीमंतास गडगनेराबा जमा रंगो गोविंद.

-।- तैवज खर्च श्रीमंताचे मेजवानीबा सुपारी चिकणी वजन ८८।-

१॥≥ श्रीमंताचे गडगनेराबा गुा इरकी तांबोलीण पानें विड्याचीं

१॥ पिकलीं १२०० दर ८००

८≥ हिरवीं ५००

१४५ रु. किल्ले पुरंधर बा ७ देणें भोई सरकारांत लग्नसंमंधें पालख्या तीन करून दिल्या होत्या त्याच्या अजोऱ्याबा देणें निघालें तें बा हिशेब गुा बाळाजी दादाजी याचा जमाखर्च किलेयाचे कीर्दीस जमा असे ते ( फाल्गुन ).

१०१ रु. जमा आहेर मेजवानी ( फाल्गुन ) श्रीमंत राजश्री रावसो यांचे लग्नाबा सुनमुखाची पैठणी पातळे व चोळखण

६७॥। तांबडें जरीकांठी आंख २७१

३३। हिरवें आंख १३३

१०१

१२॥।- जमा फ्रोक्त कोठींपैकीं जिन्नस नामे नेवासे खातें बा याद गुा बाबाजी राम नेवासियाहून मिरच्या घेऊन सरकारांत पाकशाळेकडे गाडा आला होता तो गाडा माघारा जातां त्याजवर रवानगी जिन्नस नेवासियास पाठविले. मिा माघ शुा

| कल्याण सुभेदार | सवाई माधवरावांचें लग्न | श. १७०५ इ. १७८३ |
|---|---|---|

५७॥।≥ श्रीमंत राजश्री माधवराव नारायण पंतप्रधान स्वामींचे लग्न झालें माघ शरीरसंबंध कृष्णाजी भैरव थथे यांची...

(हा लग्नाचा कारभार पुढच्या सालच्या चैत्र महिन्यांतही चालूच होता.)

१३७ रु. जमा आहेर मेजवानी सरकारचीं सनगें मेजवानीस वाड्यांत खासगत रा. तात्यास आलीं तीं.

(बाळोबा परांजपे, सदोबा करमरकर व रामचन्द्र मराठे हे सरकारचे आचारी ह्यावेळीं होते. कारण त्यांच्या नांवानें १२ रु. खर्च पडले आहेत.)

(गरीब विद्यार्थ्यांचीं लग्नें करून पेशव्यांच्या बायका पुण्य संपादन करीत.)

२५३५ रु. जमा प्रांत पुणें, देणें दिवाकर दीक्षित वरात छ २१ रमजान देणें श्रीमंत मातुश्रीबाई याजकडे विद्यार्थ्यांच्या लग्नाबा गंगाधरराव भिकाजी रास्ते यांजकडे देविले.

(श. १७०८ सालीं दुसऱ्या बाजीरावाचें पहिलें लग्न झालें.)

४०।≈ रु. रामाजी उमाजी खातें श्रीमंत बाजीराव याचे लग्नाबा कारकुनास सनगें आली त्याचे आख २०२ दर रुपयास आंख ५ प्रो किल्ले पुरंधराकडे दिले त्याचे ऐवजीं रोख रुपये ज्याचे त्यास दील्हे ( भाद्रपद ).

६४॥ रु. श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांस आहेर १२॥ रु. तीवट; ३५ सेला; १३॥ रु. लुगडें, ३॥ रु. खण ( ज्येष्ठ ).

( श. १७०९ च्या कार्तिकांत सवाईमाधवराव जेजुरीस देवदर्शनास गेले असावे. मार्गशीर्षांत नाना फडणवीस मेणवलीस गेले होते.)

१०० रु. श्रीमंतांची स्वारी जेजुरीस श्रीचे दर्शनास जाणार सबब साकुर्डे येथील कुरणाचें गवत कापावयाबा वगैरे ता महीपतराव त्रिंबक



(पुरुषांप्रमाणें पेशव्यांच्या बायकांचेही खिजमतगार स्वतंत्र अगर निराळे असत. उ. ( श १७१० )

रु. ७ श्रीमंत सौ मातोश्री रमाबाईसाहेब यांचे मेजवानीचे दिवशीं शागीर्दपेशास

६ खिजमतगार यांस
१ राजेश्वरभट तेलंग
——
७

( इनामाचे रुपये नांवें मांडले असल्यामुळें पेशव्यांकडे चोपदार, शागीर्द वगैरे कोणत्या जातीचे लोक होते हें समजण्यास मार्ग आहे.)

४ रु. कपूरचंद चोपदार सरकारचा ( श. १७१० )[६]
१२ रु. श्रीमंतांकडील शागीर्द पेशास
३ बाळोबा परांजपे आचारी
५ शागीर्द
१ विठोबा ताम्हणकर
१ गोपाळ फाटक
१ रामाजी क्षीरसागर
१ बाळा भावे
१ सदाशिव फाटक
—
५
४ फजल भालदार यास सारे भालदारांचे

कल्याण सुभेदार } { श. १७११ / इ. १७८९

२ रु. सरकारात शेला गोपिकाबाई वारली सा दुखवटेयास शंकरदास पो आणून दोरा घातला परंतु सरकारात घेतला नाही सा माघारा दिल्हा तो न घेई सा दिल्हे

तुळशीबागवाले } { श. १७११–१८ / इ. १७८९–९६

॰॥॰ शुा १० राजश्री बाळाजी जैनार्दन याची स्वारी मेणवलीस गेली त्याजबा खाजगत पालखी दिल्ही वोझ्यास बेगारी

(१७११ मध्यें सवाई माधवरावाच्या बायकोस ऋतु प्राप्त झाला.)

२५॥ श्रीमंत सौ रमाबाईसाहेब यास वाढून नेलें त्याजवर २३। रु. पातळ पिवळें १; २। रु. खण १ ( आश्वीन ).

१॥=॥ श्रीमंत सौ बाईसाहेब यांचे वोटभरणाबा वाढून नेलें त्याजबा पेरू वगैरे. ( आश्वीन )

१।≡॥ सरकारच्या वाड्यांत वाढून नेलें त्यास ( फाल्गुन ).
॥≡॥ पेढे ८८१
।= बत्तासे ८८॥।
८= इलाची ८८।

---

६. श. १७१० श्रावण शुा २ (३।८।१७८८) रविवारीं पंचवटी येथे मृत्यु.
७. मानू = नाना फडणीस

।· बरफी ८८॥

१।≥॥

८०॥। रु. श्रीमंत सौ बाईसाहेब याचे वोटभरण झालें त्याजबाा आहेर श्रीमंतास १० तिवट; ४५।= शेला; २३॥= लुगडें; १॥। खण (कार्तिक).

(१७१२ मध्यें पुनः ह्याच निमित्याने खर्च पडला आहे.)

॥=॥ आहेर मेजवानी मिा वाा ८ (वैशाख) श्रीमंत सौ बाईसाहेब यास नाहाण आले सबब वाढून नेलें त्यास. ८—॥ बुक्का; ।= गुलाबपाणी; ८≥ अत्तर.

(१७१३ च्या चैत्रांत पेशव्यांची स्वारी तळें कात्रज व बनेश्वर येथे गेली होती तेव्हा फराळाचा खर्च येणेंप्रमाणे पडला आहे.)

स्वारी बनेश्वराहून तळ्यावर आली तेव्हा

२॥≥ मिठाई (पैकीं २८— पेढे ८८२); ८≥ पेरु २०; ।— अंजीर; ·॥· द्राक्षें ८८३; ।—॥ केळीं पिकलीं २५; ·।· मिरच्या ८८२; ·।· केळीं हिरवीं ४०; ८≥॥ सेंगा मुळे ८८५; ।—॥ खीरे आलें, वगैरे; ।=॥ वांगी ८८५

१७१४ सालींसुद्धा आहेर लग्नें व मुंजी ह्या खातीं श्रीमंत रावसाहेब यांच्या नांवानें ६३॥ रु. पडले आहेत.

(सरकारवाड्यांतील गणपती)

·।· गणपती सरकारचे वाड्यांतील आणिला त्याची सोंड जाया झाली साॅ दुसरा आणला त्याजबाा देणें जिनगर

(श. १७१५ च्या चैत्रांत खालील तपशील आढळतो.)

५० रु. मिा शुाा ५ सटवा बुरुड पेठ गुरुवार यास श्रीमंताचे लग्नाकडील ब्राह्मण-भोजनाकडील कामाचे ऐवजीं दिल्हे होते ते हल्लीं जमा वजा करून घेतले.

(ह्याच सालीं श्रीमंतांची स्वारी माघांत मुंढव्याच्या बागेत व फाल्गुनांत बनेश्वर आणि तळें कात्रज येथे गेली होती.)

(१७१८ सालीं दु. बाजीरावाचें पुन्हा लग्न झालें त्याबद्दल कांही खर्च खाली लिहिल्याप्रमाणे

शक १७१८ फाल्गुन महिना

श्रीमंत बाजीराव सो याचे लग्नाबद्दल.बरहुकूम याद. गुजारत हैबती जगताप प्रांत पुणें.

---

८. श. १७१४ फाल्गुन वद्य ९ (६।३।१७९३) बुधवारीं स. माधवरावांचें दुसरें लग्न. (ग. वि. गोखले यांची मुलगी यशोदाबाई.)

९. श. १७१८ माघ व. ५ गुरुवार १६।२।१७९७ चिंतामण हरी फडके; कन्या राधाबाई तृतीय पत्नी, लग्न मुंढव्यास.

( खर्च )

३८४।= लग्नखर्च श्रीमंत बाजीरावसाहेब यांचे लग्नाबद्दल ब्राह्मण भोजन श्री ओंकारेश्वराचे देवळानजीक बागेंत झालें त्याबद्दल.

१०० पत्रावळीचे खरेदीबद्दल. गुा रघुनाथ गुरव.

१५४॥· देणें आचारी खटपटे यांस गुा अनाजी लक्ष्मण.

२० मजुरी. माणसें कामास ठेविलीं त्यांचें देणें. गुा नरसो बल्लाळ.

२ बागेंतील चौकीस गारदी आणले त्यास बकऱ्याबद्दल.

५॥। द्रोणाचीं पानें खरेदी.

४ गुा नरसो बल्लाळ.

१॥। गुा बाळाजी विनायक

५॥।

१ रोषनाई. तेल दिव्यास रात्रीं.

१॥= घर बिगारे कामास लाविले त्यास पोटास.

१०॥ खरेदी फुटाणे बिगाऱ्यास.

१ कडबा चोयास.

५० देणें. सटवा माळी याचे वावर बागेतील ब्राह्मण भोजन झालें त्यास जागा केली. वांग्या काढल्या सबब देणें. माळी मजकूर

२५ खरेदी दूध

१॥। फराळाकडे रात्रीं. ·॥· पत्रावळी, १। पोहे.

१८= फरासखान्याकडील सामान आणलें त्यापैकीं खादी गहाळ झाली ती खरेदी करून दिली.

४ भांड्यास कल्हई करविली त्यास ३ तांबट देणें. गुा अनाजी लक्ष्मण.

१ कोळसे खरेदी केले. गुा महादजी

·॥· सुतळी पोर्सी शिवावयास.

·।≥ तैवज खर्च गुा दत्तू टिळेकर ·।= विड्याचीं पानें २००,८– सुपारी.

·॥= साखरपाण्याबद्दल; ·॥·साखर, ८= लिंबें.

४८– उष्टीं ब्राह्मणांचीं काढण्याबद्दल देणें. ब्राह्मण गुा रामाजी बापूजी असामी ३२.

·।– सरकार कोठीचीं लाटणीं आणलीं त्यांपैकीं गमावलीं तीं खरेदी करून दिलीं. गुा अनाजी लक्ष्मण.

८≈ गुा बाळाजी दादाजी. लाकडाच्या मजुरीबद्दल.

३८४।=

माहे आषाढ शके १७१८

जमा मिती वद्य प्रतिपदा.

२ घरखर्चाकडील फ्रोक्त कोठीकडील. लोटा पेशजी श्रीमंतांचे लग्नांत चिमणाजी बल्लाळ भट यांनीं हरवला होता त्याचा फडशा केला त्याबद्दल. जमा फाल्गुन शके १७१८

४७५।।।· सरकार पोत्यापैकीं लग्नखर्चाबद्दल श्रीमंत राजश्री बाजीराव साहेबांचे लग्नाचे ब्राह्मणभोजनाकडे साहित्यास दिले. हस्तें – महिपतराव बापूजी रुपये १००० पैकीं खर्च ब्राह्मणभोजनाकडे बाा हिशेब. २३४।।।≈ मजूरी. २३९।– भोजनखर्च. ५० देणें माळी. जमिनीमधील उदमाबद्दल. ५२४।· बाकी शिलक राहीले ते जमा मिाा शुा १.

जमा.

१००० प्रांत पुणें बाा गुा हैबती जगताप वाा ३०.

१००० श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब यांचे लग्नाबाा ब्राह्मणभोजन श्री ओंकारेश्वरानजीक बागेंत झालें.त्याचे खर्चाकरितां हुजूर पोत्यापैकीं रोख आणिले. हस्तें महीपतराव बापूजी माघ वाा ६ चांदवड.

( ह्याच सालीं बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. )

१४ रु. नजर सरकारांत वस्त्रें जालीं सबब मोहोर नाणें १; गुा बाबाजी लक्ष्मण.

( ह्याच्यापूर्वीं वैशाखांत असाच खर्च पडला आहे. )

१४।· रु. श्रीमंतांस नजरेबाा मोहोर नाणें १; गुा बापू पोतदार वाा ५.

२ रु. देणें ओवाळणी कुणबीण निाा श्रीमंत यशोदाबाई १७१९ आश्वीन.

( मानधाता नांवाचा बाजीरावाचा चोपदार होता. )

२ रु. देणें मानधाता चोपदार नि।। सरकार साल गुा प्रो सालमाचे.

( चिमाजी आप्पासाहेबांचें ( दुसऱ्या बाजीरावाचे धाकटे बंधु ) लग्न १७२० (!) मध्यें झालें. )

७१७८– रु. बाळाजी लक्ष्मण व विष्णु गोपाळ खातें श्रीमंत राजश्री आप्पासाहेबांचे लग्नाबाा ब्राह्मणभोजनाकडे खर्चाबाा याद वाा ३० गुा अप्पाजी गंगाधर ( ज्येष्ठ ).

---

१०. १७१८ मार्ग. शु.५ रविवार ४।१२।१७९६ हडपसर येथे प्रधानकीचीं वस्त्रें मिळालीं.
११. श.१७१९ वैशाख वद्य ५ मंगळवार मोरोपंत दामले कन्या सीताबाई १६।५।१७९७.

१५१८= श्रीमंत अप्पासाहेब यांचे लग्नाचे पत्रावळीबा ( आषाढ ).

१२।।। नामे बाळाजी लक्ष्मण केळकर व विष्णु गोपाळ खातें श्रीमंत राजश्री आप्पासाहेबांचे लग्नबा जेष्ठमासी ब्राह्मणभोजनाकडे पाकशाळेस दूध बा याद.

१ रु. वा २ ( वैशाख ) श्रीमंत आप्पासाहेबांचे लग्नाचें सामान मागावयाचे तगाद्यास सरकारचे कारकून व प्यादे वगैरे आले रा. गोविंदपंत गोडबाले यांजकडून त्यांस रोजाबा.

ह्यावरून बाजीरावी अंमल कसा होता तें दिसून येतें.

१००० रु. ( ज्येष्ठमास ) जमा प्रांत पुणें. बाळाजी लक्ष्मण केळकर व विष्णु गोपाळ दातार खातें राजश्री आप्पासोचें लग्नाचे ब्राह्मणभोजनाकडे साहित्यास हुजूर पोत्याहून देविले ते.

ह्याच सालीं वैशाखांत " श्रीमंत रावसाहेब " यांची स्वारी वोझरास गेली तत्प्रीत्यर्थ ९७३ रु. खर्ची पडले आहेत.

( ह्याच वर्षी विनायकरावें[१२] यांची मुंज झाली. )

४५ रु. बाळाजी लक्ष्मण केळकर व विष्णु गोपाळ खातें श्रीमंत रा विनायकराव यांचे मुंजी बा ब्राह्मणभोजनाकडे खाद्या पासोड्या धुवट वार ३० दर १।। प्रो. ( माघ )

चिपळुणकर } { श. १७५५. इ. १८३३.

लग्नास अनेक विघ्नें होतीं. श्रीकृपेनें सिद्धीस गेलें. ज्येष्ठ वद्य १ गोरज झालें, लग्नास सर्व विषय आठ दाहा हजारांचा पाठविला. वाटेनें खर्चास मात्र दिलें. नंतर आजपर्यंत पदरचें खातों. लग्नास आम्हीं पदरचे अडीच हजार लाविले त्यांत जागा हुंडी पुण्याहून हजाराची आणिली. दरमहा दोनशें रुपयांचा खर्च चालला आहे. श्रीकृपेनें कसें पार पडेल पाहावें. सौ० चि. मुलीवर त्यांनीं वस्तवानी ५० हजारांची घातली. दोहीकडील सरकारांतून केले. शोभा चांगली झाली. परंतु पुढें बंदोबस्ताचें कांहीं होत नाहीं. बडे साहेब गेले. अमलावर पूर्वी येथें दुय्यम आकीकटर ( ! ) साहेब होते. तेच आगटींग झाले. बखेड्यास कांहीं पार नाहीं. सरकारांतून कांहीं देत नाहींत. सिल्लक मिळून जवाहीर त्यांत लिलाव करून जे निघेल त्याचे व्याजावर कांहीं देणार असें आंत बाहेर ऐकतों. त्यांत

---

१२. श. १७२० माघ शु. ३.

बायको व सौ० मुलीचा निर्वाह व वस्तवांनीं लिलावांत गेल्यावर राहिलें काय ? आठ चार दिवसांत शेवटास जाईल. होईल तें लिहून पाठवितों*.

(रामराव तात्या चिपळूणकर यास रघुनाथ सदाशिव थत्ते यांनीं श्री असीसंगम येथून अधिक भाद्रपद शु. ११ मंदवार शके १७५५ रोजीं लिहिलेलें पत्र.)

## लग्न

तुम्ही वडिलांकडील सविस्तर मजकूर ल्याहावा म्हणून लिहिले. त्यास वडिलास व आम्हांस काशीला आलों इतकें मात्र नफा मानावा. लग्न जेष्ठ व. १ जाहले परंतु लग्नांत बहुतच वाहवा झाली. त्यानें घेणें देणें दृष्टोत्पत्तीस आलें नाहीं. आम्ही आसीवर लग्नास १५ दिवस सर्व गेलों होतों. देहेनगी जावई यास बहुत दिली परंतु सजाईती दिली तेथे देणें करणें कोणाचे हातीं नाहीं. साहेब येऊन करील तें खरें. दुसऱ्याचा हुकूम नाही. (काशीहून तात्या चिपळूणकर ह्यास रमाबाई चिपळूणकर हिनें आषाढ शु. २ शके १७५५ रोजीं लिहिलेलें पत्र*.)

तुळशीबागवाले } { श. १६७५ इ. १७५३

पेमगड किल्ला १६७५ च्या फाल्गुनांत सर झाला.

४। रु. किले पेमगड देणें शिवाजी शिंदा किला फत्ते जाल्याचें वर्तमान घेऊन आला त्यास तिवट.

किल्ला घेण्याकरता केलेला कांहीं खर्च येणें प्रो.

९८१८= किले पेमगीर जमा अमानत खातें २०० किलेदार रु. ५००० पैकीं १०० सीबंदी नवी ठेविली किला घ्यावयास वगैरे

## सावनूरची स्वारी

(ह्या स्वारीचा (श. १६७८) खर्च २,१४,७७६ रु. पेक्षा अधिक असावा).

जमा लष्करखातें

२,१४,७७६ रु. पुण्यास हुंडया लष्करांतून करून ऐवज देविला तो लष्करखातें मोघम लिहिला त्याचा हल्लीं जमाखर्च बा। हिसेब लष्कर नामे जिकडील तिकडे (आषाढ)

शृंगेरीकर स्वामींनी ह्या स्वारींतील लोकांस दर्शन दिलें कारण " १५ रु.

---

* राघोपंताचा मुलगा गणेशपंत थत्ते यास चिमणाजी रघुनाथ पेशव्यांची मुलगी द्वारकाबाई दिली. लग्न श. १७५५ मध्यें झालें. नांव सरस्वती ठेविलें ह्यासंबंधींची हीं दोन्हीं पत्रें आहेत.

स्वामी मठ शृंगेरी यास मोहोर १ स्वारींत दिल्ही." आणखी

२७॥।= धोंडो नारायण जमा महादशेट वीरकर साल गुा मशारनिल्हेस लष्करांत दुखण्यांत व उत्तरकार्यास किरकोळ जिन्नस.

खाजगीवाले }

देहेनगी सरकारचे माणसास

।· अप्पासाहेबांचा जासूद भाऊ सुटल्याचें पत्र घेऊन आला त्यास.

१ संतु थोरात भाऊसाहेबांचें वर्तमान घेऊन तासगांवाहून इचलकरजीचे मुकामीं सतेराव आला सबब इनाम तासगांवीं दिल्हा.

२॥ उछाई खर्च ती भाऊसाहेब[१३] सुटले सबब पेढे वाटले १॥ मिरजेचे मुकामीं; १ लस्करांत.

जमा सरकार पो

५००० ती राजश्री भाऊ यांणीं चिरंजीवाचे लग्नास तैनात खेरीज बक्षीस चिरंजीव राजश्री रामचन्द्र आप्पाकडून देविले ते हस्ते महादाजी धोंडदेव गोखले हुकेरी.

३८।. सुंदर नाईक सांवताकडे गेले तव्हां खर्च.

चिपळुणकर } { श. १६८२ इ. १७६०

तर्ले बोरघांट आधिक श्रावण

२१५३ तर्ले बोरघांट

१९४८ जमा नीलकंठ माहादेव

५ सटवोजी चौपणाली

२०० खा चुना नथु ओतारी

२१५३

आषाढ

२०१ तर्ले बोरघांट

२०० देणें हैबती

१ देणें हैबती व डेरे-खर्चास

२०१

१३ परशुरामभाऊ पटवर्धन, १६-६-१७९८ रोजीं सुमारें दीड वर्षाच्या कैदेनंतर सुटका.

कल्याणसुभेदार } { श. १६८३

शक १६८३ मध्यें रामाजी महादेव बिवलकर हे सुभेदार होते. त्याच्या हि अगोदर पासून ते होते. रामाजी महादेव, आनंदराव राम, रामराव अनंत आणि आनंदराव राम ह्या चार पिढ्यांत सुभेदारी सारखी होती. रामाजी महादेव हे पुण्यास श. १६९४ च्या श्रावणांत वारले. पुढे त्यांची बायको श. १६९७ च्या आश्वीन महिन्यांत निवर्तली. हिच्या उत्तरकार्यास रु.१,५९८॥= खर्च केला. खुद्द रामाजीच्या वर्षश्राद्धास रु. २,०७७८= खर्च करण्यांत आले.

आनंदरावाला रावजी म्हणत असावेत. तीर्थरूप वारल्यावर हे ठाण्यास आले. मुहूर्तानें वाड्यांत प्रवेश केला.

रावजी श. १६८८ ज्येष्ठ शुा १ ह्या दिवशीं पाटीवर बसला.

कल्याणसुभेदार } { श. १६९०<br>इ. १७६८

(आनंदरावास वडील जीवंत असतांनाच पालखीचा मान मिळाला होता.)

८५ रु. जमा. सरंजाम पालखी सरकारांतोन खर्च लेहून घेतले ते जमा.

कल्याणसुभेदार } { श. १६९१<br>इ. १७६९

सुभेदार पूर्वी ठाण्यास राहात. कल्याणचा वाडा बांधल्यानंतर ते कल्याणास राहण्यास आले. ह्या वाड्याची मुहूर्तमेढ श. १६८८ च्या फाल्गुनांत रोवली. कार्तिकांत पाया खणण्यास आरंभ झाला होता. श. १६९१ मध्यें वाड्याचें काम संपलें असावें. कारण "२५ रु. बक्षीस खर्च. तीन वर्षे नेहमीं वाड्याच्या कामावर चाकरी करतात त्यास कडी रुप्याची दिली."

कल्याणसुभेदार } { श. १६९५<br>इ. १७७३

ग्याझेटिअरमध्यें रामाजी महादेवाला सरसुभेदार म्हटलें आहे. पण सर्व जमाखर्चांत सुभेदार हेच शब्द आहेत. त्रिंबक विनायक म्हणून सरसुभेदार होते.

तुळशीबागवाले } साष्टीची मसलत { श. १६९६<br>इ. १७७४

६८,००४ रु. रा. पंतप्रधान साष्टीचे मसलतीबा।

१०,०७० देणें हुजूर पोते

७,००० देणें माधवराव बोकसे निा जंजीरे अरनाळा हस्तें विसाजी कृष्ण फडके लोकांचे रोजमऱ्यास
२५,००० देणें राघोजी आंग्रे
१०,००० आरमाराचे खर्चास
१६,००० देणें आणखी पोत्यास
४ देणें सांडणीस्वार रा साष्टी इनाम
१५,००० गुा बापुजी हरि पाटणकर अवरंगाबादेहून गारदी आणावयासि हुंडी करून ऐवज दिल्हा.
२००० तोफखान्याकडे रोजमऱ्यास तोफांचे रवानगी समयीं वगैरे

६८,००४ (१६९६ मार्गशीर्ष)

९०,३५९ रा. पंतप्रधान भरणा सरकारांत साष्टीचे मसलत संबंधें कर्ज दिल्हे.
५२७६ रु. गोविंद नारायण आगाशे दिमत हशम साष्टीस लोक रा केले त्याचे.
(१६९६ पौष)

१०५ नाजुक खर्च मसलत साष्टी (१६९६ फाल्गुन)

## साष्टीचा हल्ला { श. १६९६–९७ इ. १७७५–७६

१८॥ सदाशीव राम दामले मि। मार्गशीर्ष शुा ५ साष्टीस इंग्रेज आला ते समयीं खासगत आणावयासी गलबतें पाठवावीं म्हणून गंगाजी वागचावरा याजबरोबर निरोप आला त्याजवरून गलबत पाा (श.१६९७ वैशाख वाा ५)

७ बक्षीस खर्च रावजी साष्टीच्या हल्यांत कोटांत सांपडले ते मुंबईस इंग्रजानें पाा त्याचा शोध लावून आले त्यास.

४॥ छ. ३८ रोज देणें कासीद इंग्रजाकडील. इंग्रजाचें पत्र आलें सबब तीवट१

२॥ देणें कोळी शोधास पाा त्यास.

३॥ बापूजी वेळासकर छ २६ रोज मुंबईस रावजीकडे गेले साा

६८– छ १५ रोज देणें रामभट आचारी मुंबईस रावजीकडे पाा सबब खर्चास (श. १६९६ मार्गशीर्ष)

१२ साष्टीचे हल्यांत जखमी जाले त्यांस खर्च (श. १६९७)
६ कृष्णाजी मोटे

तुळशीबागवाले } { श. १६९६ माघ
इ. १७७५ फे.

३५ रु. घरखर्चाकडील जमा आहेर गोवेकर फिरंगी याकडील वकिलाने दिल्ही
१५ तिवट; २० जाफरखानी.

तुळशीबागवाले } { श. १७०१
इ. १७७९

पुण्यांत असलेल्या कांहीं संस्थानिकांच्या वकिलांचीं नांवें.

७०० रु. महादाजी अनंत पाा नेवसें वगैरे महाल चेरसदे पो वरात छ ११
रजब देणें वकील यांस खर्चास.

४०० संस्थानिकांकडील वकील हुजूर आहेत त्यांस
२०० कोनेरराव वकील निाा रणमस्त शंकर भूमकर
२०० नमस्कारराव वकील संस्थान सावनूर..

३०० आण्णाजी तमाजी नि। कुल ( ! ) सीलेदार सरकारांतून सावनुरास वकीलीस आहेत त्यास ( १७०१ )

७००

कल्याण सुभेदार } कल्याणसुभा इंग्रजांनीं घेतला { श. १७०२-३
इ. १७८०-८१

६८५८–। इनाम गांव मौजे उसटणें ताा तळोजें साल मजकुरीं इंग्रजानीं कल्याण
घेतलें. मौजेमजकुरचा रुमाल कल्याणास राहिला साा गुदस्तां प्रो
जमा धरिले.

१४४॥= पळणसंबंधें वाईस जातां भाडें खर्च.

२५ जमीदार तर्फ तळोजें आणि मौजे उसटणें पो साल मजकुरीं इंग्रजानीं
मुलूख घेतला आकार बाा गुाा रु. ३५ पो.

१ रु. पोस्तखर्च चाकर खासगी इंग्रजाचे गडबडींत वस्तवानी किल्यास
नेल्या साा.

१३।= मजुरी खर्च इंग्रजाचे गडबडींत कुळंबिणी पळवावयासी व वोझी वगैरे
वस्तवानी न्यावयासी खर्च.

तुळशीबागवाले } कर्नाटकची स्वारी { श. १७०८ शा. भाद्र
इ. १७८६

९८५ किल्ले पुरंधर किल्ले पुरंधरचे लोक जिवाजी गोपाळ याजबरोबर कर्नाटकांत

चाकरीस गेले आहेत त्यांस खर्चास वगैरे आसाराम कपुरचंद यांनीं येथें हालीसिका देऊन लष्करची हुंडी घेतली ते देणें ( १७०८ वैशाख ).

३०० लोक कर्नाटकाचे स्वारीस जीवाजी गोपाळ याज बा। होते त्यास खर्चास बळवंतराव बिनीवाले यांजकडून बेलगांवाहून पावले सा। हल्लीं पुण्यांत देणें बिनीवाले यांस.

कल्याण सुभेदार } **शामलाची धामधूम** { श. १७०६ इ. १७८४

२ मजुरी खर्च बाबु बिन गणजी सीरधनकर भंडारी रखवाली चौकी बंदर आबु (?) शामलाचे धामधुमीमुळें नेहमी चौकीपाहेरेयास ठेविली ( १७०६ आश्वीन )

१५।।।रु. पोस्तखर्च किरकोळ इंग्रजाचे गडबडींत बातमीस वगैरे

१३।।~।। बाजे खर्च किरकोळ स्वकार्याबद्दल बातमीस माणसें मुंबईस पा। त्यास

-।।· विनायक बल्लाल मुंबईस गेले बातमी करतां त्यास उतार

२ नवस श्रीगणपती इंग्रजाचे गडबडीबद्दल पेढे

४८।। भाडें. रुमाल पळणसमयीं वाईस पा। त्यास

२१६८ सरकारखातें जमा हुजरून शंभर माणूस जदीद ठेवावयासी सांगितलें त्याचे रोजमुऱ्या पो दिल्हे ते

१।। मोघम खर्च इंग्रज आ। २ कोकणांतून पुणियासी त्यास खर्चास दिले. तुंगार्तनचे दंग्यामुळें सरकारची बाकी देखील ब्राह्मणांनीं वसूल दिली नाहीं सा। हक्क ( चौधरी ) वसूल आला नाहीं. ( श. १७०३ )

२५८= दारू सरकारांतून पाठविली त्यास खर्च रु. ५०। पो विकटगडकडे रु. २५८= बाकी.

११९।। पुणें खातें ता। कृष्णाजी विश्वनाथ सन समानीन अखेर इंग्रजाची गेर झाली ते समयीं गवेतांत ऐवज घालून किले विकटगडास पा. तेथून गवेत पुणियासि नेले त्यांतील ऐवज मोजदाद करून ठेविला. (श. १७०३)

४५।। जमीदार मौजे मुंजीवली व वेंगणि ता। चोण अधिकारी व कुळकर्णी बा। आणे वगैरे मिळोन आकार दरसाल रु. २२।~।। सीत सीतैन ता। साल मजकूर सन अर्बा समानीन पो सन सीत सबैन पावेतों पोईजकर यांणीं बाबाजी प्रल्हाद व गणेशपंत पाटणकर विद्यमानें फडशा करून ऐवज घेतला बाकी ई। सन सबा सबैन तोतयाच्या सालापासून सालें ८ पो

वजा तोतयाचें साल सन सबा त्याची तिजाई सरकारांत घेतली व गांव लुटला सा वजा. बाकी सालें ७ पो वजा सन समानीनांत कल्याण इंग्रजानें घेतलें त्याच्या पारपत्यास सरकारच्या फौजा आल्या त्याचे दंग्यासुळें प्रांत लुटला गांव वाटेवरचा सा. इा सन इहिदे ताा सलास तीन साला अजी गांवांत दंग्यामुळें वसाहत जालीच नाहीं सबब वजा...

चिपळूणकर } {श. १७१७ मार्ग. व. ८ {स. १७९६ जाने. ता. २

प्रति रघोजी भोसले सेनासाहेब सुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वामीचे कुशल लिहीत जाणे. विशेष. तुम्ही पत्र पाठविले तें पावलें लिहिला मजकूर कळला. तुम्ही आपले ऐवजाविषयीं लिहिलें तें सर्व कळलें. त्यास ही गोष्ट सरकारचे लक्षांत आहे. तुम्ही लिहावें नंतर ऐवज पाठवावा असें नाहीं. फौजेची रवानगी सुभ्याबरोबर देऊन करावयाची होती या गडबडीमुळें चार दिवस लागले. या उपरी ऐवज तुमचा लवकरच पाठविण्यांत येईल. राा छ २१ माहे जमादिलाकर. तुमच्या ऐवजाचा विसर पडणार नाहीं. फौजेच्या रवानगीमुळे चार रोज अधिक लागले इतकेच मात्र. त्यास आता सत्वर ऐवज पाठविणेत येईल. तुम्ही ही खातरजमा ठेवावी. बहुत काय लिहिणें हे विाा.

पौो पौष शुद्ध ११ बुधवार शके १७१७ राक्षसनाम संवत्सरे (ता.२०-१-१७९६)

तुळशीबागवाले } नेरळास पेशव्यांचें शेत { श. १७१८ { इ. १७९६

१२५ रु. प्रांत पुणें नेरळचे तांदूळ कोकणचे मापे खंडी ५ सरकारचे सन... चे ते आणावयाची सोय न हीं. यांजकरिता फ्रोक्त करावयास सांगितलेल्या वरून रा. गणेश बाबूराव यांनी फोक्त करून पाठविली.

कल्याण सुभेदार } व्याघ्रगड किल्याचा सरंजाम { श. १७३४ { इ. १८१२

श्री

यादी किले व्याघ्रगड सुाा सलास अशेर मया तैन व अलफ किले मजकूरचे सरंजामास बेरीज वट सनद. रु. ७०००.

पो दुमाले हली चालत असता सरंजामाचे बेरजेत लागले ते ज्याचे त्याजकडे चालवावे म्हणोन चिंतोपंत रावजी देशमूख याणी सांगितले त्याबाा बेरीज

---

१. हा नागपूरकर जानोजीचा दत्तक पुत्र म्हणजे दुसरा रघोजी भोसले ( इ. स. १७७५-१८१६ ). ह्यावेळीं म्हणजे खर्ड्याच्या लढाईचे वेळीं तो इकडे आला असतांचे हे पत्र आहे. फौजेच्या रवानगीचा उल्लेख आहे तो ह्या प्रसंगींचाच असावा.

२४२॥ बाळाजी जनार्दन मौजे सरज्यापुर श्रीबेलबागेकडेस
२५० तात्या बापट जमीन इनाम मौजे हुमगांव पा।
५० बापु सीवराम मुढे खरसीकर मौजे आरडे
१८३॥।-॥। ताा तांब व ताा तलवटी जरीबामुळें पेशजी कमी
२५० जकात घाट तीवर येथील मार्ग चालत नाही सबब
३४०॥ कमावीत चीटी मसालेदादी फीर्यादी वगैरे बेरजा लागल्या आहेत त्या

चिपळूणकर } { श. १७३७ भाद्र. शु. १० / इ. १८१५ सप्टं. १३

श्रीमंत महाराज राजश्री बाबासाहेब स्वामीचे सेवेसी विनंती. सेवक बापुजी गंगाधर चिपळोणकर साष्टांग नमस्कार विज्ञापना. गंगाधरशास्त्री क्षेत्र पंढरपुरी मारले गेले ते समयी तुम्ही बरोबर होता तेथील मजकूर कसा जाला तो लिहून देणे म्हणून आज्ञा त्यास. आषाढ शु. १४ गुरवारीं[1] आम्ही गंगाधरशास्त्री यांचे बिऱ्हाडीं बसलों होतों. दोन घटका रात्र अवशीची सुमार जाली तो इतक्यांत राजश्री त्रिंबकजी तात्या यांजकडील कारकून व दोन प्यादे नेहमी शास्त्रीबाबा यांजकडे असत त्यांपैकीं एक प्यादा व कारकून सूचनेस आले कीं देवदर्शनास चलावें. तेव्हां शास्त्री यानी उतर केलें कीं मला ताप आलेला आहे मी येत नाहीं. नंतर मी शास्त्रीबावास पुसिलें कीं मी जातों. नंतर तेथून निघून राजश्री रावजी मराठे व आम्हीं उभयतां देवळांत गेलों तेथें राजश्री त्रिंबकजी तात्या बसले होते. यानी आम्हांस पुसिलें कीं शास्त्रीबावा कां आले नाहींत. आम्हीं उत्तर केलें कीं त्यांस ताप आलेला आहे. तेव्हां तात्या बोलिलें कीं देवदर्शन घेतल्यानें देव कृपा करील. नंतर राजश्री रावजी मराठे आमचे बरोबर होते त्यास सांगितलें कीं तुम्ही जाऊन तात्या बोलिलें हें सांगावें. नंतर मराठे शास्त्रीबावा यांजकडे गेले. मग आम्हीं देवदर्शन करून देवळांत बसलों होतों इतक्यांत शास्त्रीबावा देवदर्शनास आले. ते तात्यापाशीं बसून देवदर्शनास गेले. देवदर्शन घेऊन फिरून तात्याजवळ कांहीं बसून निघाले. आम्ही बरोबरच होतो. कमानी दरवाजाचे वाटेनें चाललों. शास्त्रीबावा पुढें व त्यांचा हात राजश्री रामचंद्र बडवे यांनीं धरला होता व शास्त्रीबावा यांचे माघे आमचा मशालजी, त्याचे माघे आम्हीं चालत होतो. भजनीबाबा याचे जाग्यापासून पुढे दहा

१. ता. २०-७-१८१५.

पंधरा हातचे सुमार गेलों. तो इतक्यांत मागाहून गलबल होऊन आम्हास तरवा-रेचा परज लागला. नंतर पाहू लागलो तों शास्त्रीबोवा यावर गर्दी होऊन खालीं पडले त्याचे मशालची व आमचा मशालची मशाली टाकून पळाले व बडवाही पळाला. नंतर मी इतक्यांत पाठीमागून एकीकडे बाजूस झालो. गर्दी पाहून भय-भीत होऊन पळून निघालो. तो राजश्री नरसिंगराव भावे याचे बिऱ्हाडीं जाऊन बसलों.

(वरील मजकूर ज्या कागदावर आहे त्या कागदावर 'नक्कल' म्हणून लिहि-लेलें आहे. यासंबंधानें एकंदर आठ निरनिराळे कागद लिहिलेले आहेत. एका कागदावर ' मसुदा ' म्हणून लिहिलेलें आहे. कित्येक ठिकाणीं खोडून ' शोध ' म्हणून घातलेलें आहे. पुष्कळ विचार करून बाजीराव साहेबाला उत्तर काय द्याव-याचें तें ह्यांत ठरविलें असावें. दुसऱ्या पत्रांत थोडा जास्त मजकूर आहे तो असा)—

देवदर्शनास गेलों तेथें सरकारचे महापुजेची तयारी करितां देवालयांतील दाटी काढून झाडलोट करवीत राजश्री त्रिंबकजी तात्या गरूडखान्याजवळ बसले होते. तेव्हां मी दर्शनाकरितां परवानगी लावून आंत गेलों तो तात्यानीं पुसिले कीं दाजी आले कीं काय? तेव्हां आम्हीं बोलिलों कीं त्याचे शरीर स्वस्थ नाहीं. तेव्हा तात्या म्हणाले कीं वार निवळ आहे आल्यास देवदर्शन होईल तेव्हां आम्ही रावजी मराठे यांस सांगितलें कीं जाऊन सूचना करावी म्हणून पाठविले. नंतर तात्या बोलले कीं बरें असल्यास यावें नाहींतर न यावें. तेव्हां मी उतर केले कीं स्वस्थ असल्यास येतील नाहीं तर येणार नाहीं. मिति भाद्रपद शुा १० बुधवार शके १७३७ युवानाम संवत्सरे शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

( दुसऱ्या एका लेखांत "कमानी दरवाजाचे वाटेने चाललो" याचे अगो-दर " प्रथम देवाचे पायरी जवळ येऊन चोखामेला उजवा घालून त्या गल्लीने " हे शब्द घालून नंतर खोडलेले आहेत

रावजी मराठे हा शास्त्रीबोवांचा मेहुणा असें एका कागदांत आहे.

तसेंच शास्त्रीबोवा यास मारतात असा मजकूर प्रथम लिहिला असून तो खोडून शास्त्रीबोवा यावर गर्दी होऊन खालीं पडले हा ' शोध ' घातला आहे. त्याचप्रमाणें शास्त्रीबावा पडले व ' आई, आई, मेलो मेलो ' म्हणाले हे शब्द खोडले आहेत. सारांश त्रिंबकजी डेंगळे यांनीं शास्त्रीबोवांस मारलें असें दिसू नये असा प्रयत्न केलेला दिसतो.) ( चिपळूणकर रुमाल दप्तर नं. ११ )

---

## प्रकरण २ रें

# व्यक्ती

खाजगीवाले } खाजगीवाले यांजकडील नोकरांचा मुशाहिरा { श. १६९३ इ. १७७१

१५०१ रु. आश्रित
६६४ " आचारी व ब्राह्मण शागीर्द
४७३३ " बारगीर आसामी
८०८ " खिजमतगार
१२१२ " खास बारदार
२५५ " जासूद
२१७२ " घोडके
६०८ " सारवान
१३६४ " भोई
१८६ " चोपदार
१९४ " नालबंद आसामी
१०४ " आब्दागिरे
१०८ " दिवटे

६४६ " किता असामी ( किरकोळ नोकर )
१२५० " रावताबावत
८२५ " खासबारदार
१९८ " खिजमतगार
१५५० " पालखी
७५०० " तैनात पोतदारी
(वरील पांच } सरकारांतून)
८० " मोकासा पाहेठाण
२००० " तैनात सिन्नर
२००० " तैनात पैठण
२६०४॥ " हिपरगी
१००० " ऐन जहागीर मौजे सिंगवें

शके १६९३ मध्यें २८४८=॥ बावडेकर इनामपैकीं म्हणून जमा आहेत. ह्याशिवाय नाशीक व सोलापूरचे.

चिपळूणकर } गुण्यांची कैद { श. १७२९ इ. १८०७

दाजिबा चिपळोणकर यांची पुरशीस श. १७४५

राघो नारायण गुणे यास श. १७२६ सांत सरकारांतून किल्यावर टाकिले. घरची जप्ती करून वीतविषय नेला. हे त्याकालीच मानिल्हेकडले कैलासवासी अताजीपंत वळे सांगत गेले. घरी मुलेंमाणसें होती. तेथें चौकी होती हे ठाऊक आहे. पुढें शके १७२९ चे सालीं गुणे मोकळे झाल्यावर जपतींत विषय गेला त्याजविषयीं सरकारांत मुत्सद्दी यांजकडे प्रयत्न बहुत केला परंतु सरकारांतून विषय माघारा झाला नाहीं हें ऐकिल्यांत आहे.

तुळशीबागवाले } { श. १६८३ / इ. १७६१

३८२५० गोपालराव गोविंद खिचपडत राहिले त्यास सरकारांतून खर्चास ऐवज देविला तो पोत्याचा ऐवज घेऊन राघो गोविंदाकडून देविले.

चिपळूणकर } { श. १७४१ आश्वीन शु. ११ / इ. १८१९ सप्टं. ३०

सरकार दौलत मदार कुपणी इंग्रज बहाद्दर...कलक्टर सुभा पुणें याणी वेदमूर्ती राजश्री गोपाळशास्त्री बिन रामशास्त्री माहुलीकर वस्ती पेठ शनवार शहर पुणें याचे चहारा-रंग निमकाळा, ठेंगणे आहेत, दाढी व डोई पिकलेली, मिशा काळ्या आहेत व तोंड लांबोळें, नाक उंच आहे. डावे हातावरील मनगटावरी लहानपणी पोळल्याले आहे. वर्ष ४१, यास हुजूर पोत्यातून वर्षासन याचे नांवें पेशजी पासून पावत आले ते......रुपये

२००० जातीस
१००० पालखीस
२०० कापड आख १००० सी दर ५ प्रमाणें
----
३२००

मोबलग तीन हजार दोनशे रुपये अश्वीन वा। ३० येऊन हे पत्र हुजूर दाखऊन सदरहु बतीसे रुपये घेत जावें. जाणिजे व तारीख ३० माहे शपटेंबर सन १८१९ ईसवी मुकाबला शके १७४१ प्रमाथीनाम संवत्सरे सन अशरीन मयातैन व अलफ सन १२२९ फसली अश्वीन शु॥ ११ गुरुवार.[2]

सही इंग्रजी.

(दुसऱ्या नकलेंत गोपाळशास्त्री बिन रामशास्त्री प्रभुणे अशी सबंद सही आहे.)

हें पेनशन अगर 'चकती' व रहाता वाडा चिपळोणकर यांजकडे ७००० रुपयांस गोपाळशास्त्री यांनी गहाण टाकला होता.

चिपळूणकर } खर्च { श. १७६२ वैशाख शु. ११ / इ. १८४० मे १२

२५ रु. – श. १७६२ वैा शु॥ ११ देणें गोविंदपंत चोळकर यांस

१. हे सुप्रसिद्ध रामशास्त्री प्रभुणे पेशव्यांचे न्यायाधीश यांचे चिरंजीव.
२. मो. जंत्रींत ११ शीचा क्षय सांगितला आहे. एकादशीसह द्वादशी आहे.

बक्षीस पेसजी गोपाळशास्त्री माहुलीकर यांचा एकंदर हिसाब करविला व सरकारची समजूत घालून दिल्ही त्याजबद्दल मारनिल्हेचे घरी पाठवून दिल्हे हस्ते रामचंद्र धोंडदेव साठे व हरीपंत मारनिल्हेस दुखणे लागले होते म्हणून घरी पाठवून दिले चांदवड.

आनंदराव राम ( सुभेदार कल्याण ) याची बायको गोपिकाबाई श. १७११ ज्येष्ठ शुा २ स वारली ( ता. २६।५।१७८९ ).

कल्याण सुभेदार } { श. १७०८ इ. १७८६

श. १७०८ च्या जेष्ठ महिन्यात रु. ५२।-।। जमा केले आहेत त्याचा तपशील येणेप्रमाणे " दौलतराव कदम याजकडे कर्ज येणे त्यास मौजे आभे ताा अंबरनाथ येथील वसूल गोविंदराव कारलेकर सुभेदार ताा कल्याण याणी घेतला " वगैरे. ह्यावरून कल्याणची सुभेदारी कांहीं काल तरी रामरावाने घालविली होती असें वाटतें.

**चिपळूणकर** } { श. १७७० इ. १८४८

मार्तुःश्रीचें चिरंजीवांचे कारभाऱ्यामुळे जमेना. सबब ह्यानी केलेलें त्याणी मोडावें असें चाले व आप्पासाहेबांकडील मंडळीवर आकस फार चालविला यामुळे यजमानाची स्वारी आम्ही मंडळी आसी बेळगांवीं आलों आहो. ( ज्येष्ठ शु. ८ श. १७७० वासुदेव धोंडदेव ह्याचें पत्र ता. ९।६।१८४८ ).

**( चिंतामणराव आप्पासाहेब सांगलीकर यांचे बायकोचा मृत्यू**

चिपळूणकर } **कोल्हापूरकरांचा दंगा** { श. १७४९ इ. १८२७

शेवेसी. राजाराम जगनाथ एकबोटे चरणावर मस्तक ठेवून सिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागाईत आश्वीन शुा १ रविवार पावेतो मुकाम सांगली येथे आपले आशीर्वादे करून सुखरूप असो विशेष. इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री चिंतामणराव आपासाहेब यांची बायको भाद्रपदे वाा १४ गुरुवार प्राथकाली सूर्यउदयी नित्याप्रा उठोण शौचेस शेतखाण्यात गेली तेथेच काय व्यवस्था झाली ते न कले. आत पडली तो प्रानोत्क्रमण जाले. बाहेर दोन घटका

---

१. हा मजकूर जमखंडीकरांच्या कारभारासंबंधी दिसतो.

२. ता. २०-९-१८२७.

कुणबिणीणी वाट पाहिली. उठोण येत नाहींत म्हणोन दरवाजा उघडून पाहिला तो आत पडली आहे. उठवून उचलून आणली तो प्रान नाहीं. नंतर दोन चार घट ( का ) वैद्य उपाय केले. नंतर प्रान गेला असे ठरले. मग पुढील कार्याचा उद्योग केला. याप्राो वर्तमान जाले. इकडे महामारीचा उपद्रव जाला आहे. ईश्वर-इच्छेने जे घडेल ते खरे. मी चिंचणीहून काल श्री भागिर्थी स्नानास आलो. आज निघोन चिंचणीस गेलो. चिंचणीकर हे चार दिवस दम धरावा म्हणतात कारण कीं श्री करवीरकर यांचा दंगा आहे. ऐवजाची सोय जाली पाहिजे. त्यात यांचे दोन ठाणे एकसंबे व भोज ऐसे दोन ठाणे घेतले व तेथे पागेचे. सिंगरे दाहा बारा होते ते मेले आणि गावास बहूत खराबी केली. त्यामुले चिंचणीकर वगैरे मंडळी पटवर्धन सारे सिबंदी ठेवतात. दोनशे च्यारशे माणसे व स्वार असे ठेवले आहेत. त्यामुले राहा म्हणतात. हिशेब आद्याप करीत नाहींत. करूं म्हणतात. मागाहून काय होईल ते लिहून पाा. जमखंडीकर राजश्री गोपाळराव · निमा ऐवज देईन म्हणतो. घेत असल्यास घ्यावे. नाहींतर जावे. साफ उत्तर सांगितले. त्यास काय करावें ते लिहून पाो...... दाजिबा चिपोळणकर यास पत्र शके १७४९ )

तुळशीबागवाले } { श. १७०७ इ. १७८५

३०॥= तुकोजी होळकर श्रीचे दर्शनास उत्साहात आले ते समयी वस्त्रे.

१२॥ तिवट १; १८८= शेला १

( तुळशीबागकरांनी काशीसही एक घर विकत घेतलें होतें. )

२५० रु. जनार्दन देव हस्तें खुद. रोख घर काशींतील पांच हजार रुपयास करार करून खरेदीखत लिहून घेतलें ते समयीं बाकी राहिली ती ( १६७९ ).

( श. १६६८ मध्यें सरकारी खर्चानें १ घोडा यांच्याकडे होता. )

१६ रु. सरकारची घोडी घरीं आहे तीच्या पोरग्याचे आसामी बाा रोख जमा.

११६८॥ रु. घरखर्च बक्षीस-यशवंत कृष्ण मानीं चाकरी फार दिवस एकनिष्ठपणें केली साा त्याचे नातीचें लग्न जालें त्याज बाा बक्षीस, व मृत्य पावले त्याचे प्रायश्चित्तास व उत्तरकार्यास दिल्हे ते माफ एकूण. ( ह्यावरून यजमानांची गुणग्राहकता दिसून येतें. )

( तुळशीबागकरांच्या घराण्यांतील एका स्त्रीनें पंढरपूरच्या पुंडलिकाच्या देवळाचा जीर्णोद्धार केला )

३०० रु. रवाना पाडळी मातुश्री राधाबाईनीं पंढरपुरीं पुंडलीकाच्या देवळाचा जीर्णोद्धार करून नवें केलें. १७०६ मार्गशीर्ष.

माधवराव नांवाच्या मुलाच्या लग्नाला २१२५।–॥ रु. खर्च करण्यांत आले.

शक १७०६ पौष.

( नारो आप्पाजीचा भाऊ जनार्दन आप्पाजी हाही सरकारी नोकर होता व ह्याच्या रोजनिशींतील म्हणून पेशवे डायरी ह्या ग्रंथांत पुष्कळ उतारे घेतले आहेत. )

६९ रु. जनार्दन आप्पाजी बा मुा सरकार पो (श. १६६८).
( तुळशीबागकर ह्यांच्या पैकीं एक स्त्री सती गेली असें दिसतें. )

८।= रु. आहेर मेजवानी. सो आक्का सहगमन फाल्गुन वा ७ स ( श. १७१४ ) गेली ते दिवशीं वोटी भरावयास लुगडें चोळी. ( ता. ४।३।१७९३ )

सती जाणें ही गोष्ट विरळाच घडत असे असें दिसत नाहीं. निळकंठराव गोविंद खासगीवाले मृत्यु पावले तेव्हां त्यांचीहि स्त्री सती गेली.

२४। रु. नीळकंठराव गोविंद मृत्य पावले त्याजबा दुखवटा
१६। ,, स्त्री सहगमन गेली त्यास. १५ रु. पातळ; १। चोळी

१७१४ कार्तिक.

तुळशीबागकरांचा मुलगा तात्या याचें दुसरें लग्न वऱ्यें मुक्कामीं १७०९ च्या फाल्गुनांत झालें त्यास ३४४३॥। रु. खर्च केले गेले. तेव्हां प्रथम विवाहाला ११०५४॥–॥। रु. उडाले ह्यांत आश्चर्य नाहीं. हें लग्न १६९७ च्या फाल्गुनांत झालें असावें.

## तुळसीबागकरांचें उत्पन्न

९४८५॥ रु. घरखर्चाकडील जमा

| | |
|---|---|
| ७००० | ऐन |
| १२०० | पालखीचे |
| १००० | कापड आंख २००० |
| ८२ | सेत सनद |
| ६६ | आबदागिऱ्या |
| ५५ | दिवट्या |

२२।। दिवटींचें तेल रोज वजन ८८। प्रो वजन ८=।
६० तैवज

९४८५।।

८०३४।। खासगत वेतनाचे नामें प्रांत पुणें
पो आदा मौजे पिसर्वे येथील खंडणीचे रु. १४५१ बाकी

३०७।। फडणीशी प्रांत पुणें महादाजी बाळकृष्ण १७० ऐन; ३७।। आख ७५; १०० पोरगे २

५३७।। नामे सीवराम रघुनाथ खासगीकडील असामीचे ५०० ऐन ३७।। आख ७५

चिपळूणकर } { श. १७५१ इ. १८२९

१८८० दाजीबा चिपळोणकर मेले तेव्हां उत्तरकार्यानिमित्त खर्चले. त्यात तरवारदान अश्वदानाच्या बरोबर होतें. हे श. १७५१ वैशाख शुा ७ रविवारीं वारले (ता. १०।५।१८२९).

तसेंच रु. २५ दासीनिष्क्रय–शय्यादान
रु. २५ – सीबिकादान

कल्याण सुमेदार } { श. १६९९ इ. १७७७

४० रु. श्रीमंत राजश्री नानां फडणीस याचे लग्नास मो। माहुली मा। गोविंदपंत सबनीस रोख रुपये देऊन सनगे जामदारखान्या पो घेतली

कल्याण सुमेदार } { श. १७०७ वैशाख शु. १३ इ. १७८५ मे २२

१२ माहे रजब मजुरदार आा ४ भोई नवे ठेऊन आंबेगांवी श्रीमंत नानांचे लग्नाकरतां पाठविले त्यास दिल्हे.

कल्याण सुमेदार } { श. १७०५ इ. १७८५

१८।।– श्रीमंत नाना फडणीस यांचे स्त्रीचे गर्भादानसमयी तिवट शेला लुगडे खण. माहे सवाल छ २७

---

१. हें नानांचें तिसरें लग्न दिसतें. वांई येथील सावकार गाडगीळ हे नानांचे सासरे.

कल्याण सुभेदार } { श. १७०७ श्रावण व. १४
इ. १७८५ सप्टेंबर २

३ श्रीमंत नानास पुत्र झाला तो सांगावयासी आला सा।

तुळशीबागवाले } { श. १७०६ आश्वीन
इ. १७८४ सप्टे. आक्टोबर

६॥ रा. नाना फडणीस यांस पुत्र जाला त्याची बातमी सांगावयासी आले त्यांस तिवटें २ दिल्हीं.

चिपळूणकर } { श. १७५३
स. १८३१

नाना फडणीसाची जाहागीर राजश्री बाबा कापशे भागानगरास गेले. तेथील काम जाले. दाहा हजार रुपयांचें गांव ज्याहागीर पूर्वी होती त्याचे मोबदला गाव दिल्हे त्याजबद्दल खर्च सत्रा हाजार रुपये पडला...कुशाबा चिपळोणकर यास रामचन्द्र जनार्दन जोशी याचें पत्र श. १७५३

तुळशीबागवाले } { श. १७१३ मार्ग.
इ. १७९१ डिसें.

नारोपंत पोंक्षे हे मार्गशीर्ष ( १७१३ ) महिन्यात निवर्तले; कारण ५ रु. त्यांजकरतां दुखवटा खर्च पडला आहे.

कल्याण सुभेदार } { श. १७४५
इ. १८२३

**भावे यांची मिळकत**

......राजश्री सिवाजी नरसिंगराव भाव्ये मोगलाईत जातेसमयीं ऐवजास गाहाण वाईचा वाडा व वाईची बाग इनाम शेरीची व पाटणकर याचे इनाम खरेदी घेतले ते व बाग कोथरूड येथील व वाडा चीकटे याचा पंढरपूरचा गाहाण होता तो व मौजे अडूरगांव इनाम येथील चौथाई हिसा कुलकर्णसुध्धा व शेटये याचा वाडा त्याजकडे आहे तो लिहून साहा मैन्यांचे मुदतीचे खत करून देऊन

दाजी प. करमरकर यांचें पत्र श. १७४५

चिपळूणकर } श. १७६९
इ. १८४७

महादजी रघुनाथ ठोसर पेनशन सालिना रु. १२००

तुळशीबागवाले } { श. १७१३ मार्ग. इ. १७९१ डिसें.

माधवराव नीलकंठ पुरंधरे हे मार्गशीर्ष (१७१३) महिन्यांत निवर्तले कारण १३॥। रु. दुखवटा खर्च पडला आहे.

चिपळूणकर } { श. १७५२ फा. शु. ३ इ. १८३१ फेब्रुवारी १५

मिरजकरांचें लग्न फा. शु. ३ शके १७५२ मध्यें झाले.

तुळशीबागवाले } **मेहेंदळे यांचे घराची जप्ती** { श. १७१९ चैत्र व. ११ इ. १७९७ एप्रील २२

७ रु. बट्टाखातें वा। ११ शनवार चैत्र १७१९ बहिरो रघुनाथ मेहेंदळे यांचे घराची जप्ती सरकारांतून जाली त्यास मेहेंदळे यांचे कागदीं निघालें ते आपले कागदीं जमा नाहींत सा। बट्टा खर्च लिहून दिले.

चिपळूणकर } { श. १७०७ का. स. १७८५ नोव्हें.

३ इनाम रा. राघोजी आंग्रे कुलाबकर यास पुत्र जाला त्याची साखर आली त्याचे वाटींत घालावयास होन नाणें.

तुळशीबागवाले } { श. १७०८ ज्येष्ठ इ. १७८६ जून

११६॥≥ श्रीकडे देणें राघोजी आंग्रे सरखेल याची स्त्री देवदर्शनास आली त्यास प्रसादा बा। सनगें.

४३ लुगडें १; ३॥= खण १; ५॥।= मुलास कुंची; २७ लेकवळ्यास (७ तीवट, २० सेला), १८।= कारकून आसामी २ (९ तीवटें २; ९।= सेले); १८॥।- बरोबर बायका आल्या त्यास; ८- नारळ, आंग्रे यांचे स्त्रीस; ५ इनाम चोपदार.

{ श. १७०३ आषाढ व. १२ स. १७८१ जुलै १९

## रामशास्त्री प्रभुणे यांस कर्ज

**३७४॥।= व्याजखातें नामें रामशास्त्री प्रभुणे बा। हिशेब गु। रंगो जीवाजी ई॥ आषाढ वा। १२ शके १७०३ पाच साला हिशेब दिल्हे एकंदर रु. ३३७०८= पो जमा मजकुर रु. २३०० बाकी येणें १०७०८= त्यास व्याज दर से. ।॥। प्रो**

( रामशास्त्रयांच्या तैनातीला चोपदार वगैरे असत )

रु. ३ शागीर्दपेशा निा रामशास्त्रीबावा रु. १ चोपदार; १ रु. खिजमतगार; १ रु. आसाराम जमादार

कल्याण सुभेदार } पेनशन { श. १७६९ स. १८४७

रामचंद्र विश्वनाथ गोखले. पेनशन सालिना रु. २०००

तुळशीबागवाले } { श. १६८३ स. १७६१

३५००० नांवे वेंकजी माणकेश्वर पोतनीस जमा राघो गोविंद सरकारांतून उसणे राघो गोविंद यास दिल्हे ते घेतले.

चिपळूणकर } { श. १७४२ भाद्रपद शु. २ इ. १८२० सप्टें. ९

यादी राजश्री दिनकरराव मोहिते हंबिरराव सेनाकोट राजश्री शाहाजी भोसले अक्कलकोटकर यास पुणे मुक्कामी राजश्री बाळाजीपंत दादा नातु सांगतील त्याप्रमाणे खर्चास द्यावे म्हणोन मेहेरबान राबर्टसनसाहेब बहाद्दूर रसीदंट याणी सांगितले यावरून राजश्री कुशाबा आबा चिपळूणकर याजकडून मोबदला ऐवज घेतला गुा काशी सीवराम बेंद्रे. ( रु. ३००० घेणे ) व्याज दरमहा दर सेकडा ·।।· आणे प्रमाणे.

तुळशीबागवाले } सखारामबापूंच्या स्त्रीचें डोहोळजेवण { श. १६९७ का. इ. १७७५ आ.

३४ जनार्दन आपाजी, सनगे गडास जमा सुपेकर डोहोळजेवण श्रीमंत सखारामपंतबापूचें स्त्रीस—

३० लुगडी खंडित २

४ चोलखण पैठणी जरी

---

३४

चिपळूणकर } भोरकरांस कर्जाचा तगादा { श. १७४९ आश्वीन व. १ इ. १८२७ आक्टोबर ६

याचे उत्तर श्रीमंत राजश्री पंतसचीव यांजकडे आमचा ऐवज येणे त्याचे तगाद्यास भोरास कारकून पाठवावयाचा म्हणोन राघो नारायण गुणे यांस सांगितले होते त्यावरून गुणे मानिले याणी मल्हार बाबुराव खानवेलकर यास आणून

भेटविले की हा ग्रहस्थ गरीब रिकामा आहे यास तगाद्यास पाठवावे. त्यावरून भोरास पंतसचीव याजकडे शके १७४५ चे साली तगाद्यास पाठविले होते. आज-मासे चार पाच महिने भोरास तगाद्यावर होते. पुढे तगाद्यावरून उठवून आणून खानवेलकर यांस निरोप दिल्हा. त्याजवर तो ग्रहस्थ कोठे गेले व कोठे आहे याची अम्हास माहीतगारी नाही. गुणे याचे घरी खानवेलकर मुकत्यार कारकून आहेत असे आम्हास कधी ठाऊक नाही.

वैद्य } { श. १७४७ ज्येष्ठ वा १४ / इ. १८२५ जून १५

२५ रु. जेष्ट वा १४ ( श. १७४७ ) पंतसचीवं[1] यांचे द्वितीय लग्न जालें तेव्हां आहेर केला ते सणगे ४-१ सेला १ तीवट १ लुगडे १ खण

कल्याणसुभेदार } {

कल्याणच्या सुभेदारांची वंशावळ व त्यांची कारकीर्द

रामजी महादेव श. १६८१

|

आनंदराव राम प्रा. श. १६९३

|

रामराव अनंत श. १७०१ प्रा.

|

आनंदराव राम प्रा. श. १७१८

आनंदराव याचे रूप अनंत असें यांत केलेलें आहे.

कल्याणसुभेदार } { श. १७११ श्रावण / इ. १७८९ ऑगस्ट

सुभेदाराकडील एक मुलगी ( रामराव अनंत ह्याची बहीण असावी.) कल्याणच्या बाळांकडे दिली होती. कारण २ रु. बाळांकडे लाकडी खेळ श्रावण-पाटी न्यावयासी घेतला कातारी पो सरंजाम सुा असा उल्लेख श. १७११ च्या श्रावण महिन्याच्या जमाखर्चांत आहे.

---

१. सचिवांचे गादीवरील सहावे पुरुष जे शंकरराव रघुनाथ ह्यांनी काशीमेरेश्वरांचे पुत्र दत्तक घेतलेले चिमणाजी शंकर, ह्यांचें हें लग्न असावें.

# प्रकरण ३ रें

# महसूल

खाजगीवाले } रयताव्याचे शेतापो जमा {

८८- मऱ्याजी पाटलाबा डाग उत्पन्न २९॥≢ रु. पो वजाखर्च चावडी बा

११॥= साल गुा

५ ऐन देणें २६ रु. पो आरा २१ बाकी हाली

६॥= सवाई पट्टी २६ रु. दर ।· प्रो ज्याजती ८=

---

११॥=

१० साल मजकुर पो

२१॥= बाकी जमा

सेताकडे खर्च सेतकऱ्या

१०|||=॥ सन समानचा फडशा

३ ऐन आकार रु. ४० पो निमे कृष्णाजी सींदे २० बाकी रु. २० वजासूट ७ बाकी रु. १३ पो आदा बाकी हालीं

६॥ दीडी पट्टी बा

१।=॥ सरपटी दर बिघा ।≢॥ प्रो २|||- पो निमे सेत मऱ्याजी पो

५।= सीतचा फडशा

४ ऐन आकार रु. २६ पो आदा १० सीत १२ सबान बाकी

१।= सरपटी जमीन बीघे ४॥ दर ।-। प्रो.

शेतकऱ्याचा दर व तो देण्याचा काळ या गोष्टी खालील जमाखर्चावरून कळण्यासारख्या आहेत.

वैद्य } { श. १७२२ इ. १८००

२६ शेतसारा बिघे ४ दर ६॥ प्रो.

१० कार्तिक मासी
५ पौष मासी
११ चैत्र मासी
———
२६

( त्याचप्रमाणें वसुलीचा दर व काल तुळशीबागवाले यांचे दप्तरींहि आढळून आला. )

वैद्य } { श. १७२३ श्रावण इ. १८०१ जुलै

६ वैशाख शके १७२३ छ २५ रोज इनामपट्टी बागाबा देणें देशपांडे त्याजपासून सरकारांत घेतली सा बाग समाईक बिघे ८५ एा ठराव रु. १२ प्रो निम्मे दिले चांदवड

तुळशीबागवाले } { श. १७२४ आश्वीन इ. १८०२ आक्टो.

जमीन महसुलाच्या बाबतींत खालील उदाहरण मनन करण्यासारखें आहे.

३०० रु. दरबार खर्च रा. बाबुराव आंग्रे यांनीं ब्राह्मणांचीं शेतें पूर्वी नगदी होतीं तीं मोडून ऐन जिनसी सिरस्ता घातला त्यास ब्राह्मण फिर्याद होऊन फिरोन नगदी वहीवाट करावी आणि कसर जमा झाली ती घ्यावी त्यास ती मना करून गांवची मोकळीक केली त्याबा.

२०० खुद्द आंग्रे
५० बाबाजीपंत चिटणीस
५० धोंडजी लंवडे
———
३००

( भाताच्या किंमती वाढल्या असाव्या म्हणून ही तकरार दिसते. )

तुळशीबागवाले } **रसद** { श. १६७४ इ. १७५२

१५००० सरकार राजश्री पंतप्रधान बा रसद साखरी प्रांत खानदेश मोगलाई अमलाची कमावीस केली त्याजबा.

तुळशीबागवाले } सरकारी उत्पन्न { श. १६८२ इ. १७६०

जमा

५२००१।- रु. यावल खातें सन सबाचा जमाखर्च ४१००० रसद सन सबा वगैरे

७०००० ,, अंताजी आपाजी रसद गांडापूर ( १६८२ ).

६०६४२ ,, ,, ,, ,, ,, ( १६८४ ).

१०००० ,, रामचंद्र धोंडदेव रसदेचे कोकमठाण व संवत्सर येथील रसदेचे सरकारांत १६८२.

८८०० ,, दाजी त्रिंबक बोकील यांस कऱ्हाडचे गांवची कमावीस सांगोन रसद घेतली होती रु. ११२०० त्यास तो ऐवज दाजीपंती द्यावा याप्रो सरकारांतून करार झाला वगैरे

४५००० ,, पा पुणे व दाभाडी पाटणे रसदेबाा गुा महीपतरावजी वाजी [ १६८६ ]

तुळशीबागवाले } { श. १६८८ इ. १७६६

२३४२५ रु. दाभाडी पाटणे सालमजकुरचे रसदेचे ३०००० तीस हजार पो देणें वरात तोफखाना

२५२७ ,, माधवराऊ नीळकंठ रसद प्रांत पुणे रु. ४०००० पो देणें ते भरणा तोफखाना वाा वरात

कल्याण सुभेदार } { श. १६८८ इ. १७६६

एकंदर रसद पावणे तीन लक्ष रुपये असावी

१३४४११ रु. श्रीमंत राजश्री पंतप्रधान पो देणें रसद भरणा पावणे तीन लक्ष पो भरणा माा हरि कृष्ण व बाळाजी महादेव

( रसद ठरली कीं सरकारांत खतें लिहून घेत. )

साष्टीची रसद ५०००० रु.

५००३२॥=रु. सरकार साष्टी सालमजकुरचे रसदेस हुजूर द्यावयाबद्दल रा केले ( पो ३२॥= रुपये पाठविण्याची मंजुरी )

तुळशीबागवाले } रसद { श. १६९१ इ. १७६९

१५४९८९ रु. नेवासे वैजापूर व खंडाळे सालमाचे रसदेचा भरणा हुजुरपोत्यास

१००००० रु. पाा नेवासे
५०००० ,, ,, वैजापूर
४९८९ ,, ,, खंडाळे ( श. १६९१ )

कल्याण सुभेदार } { श. १६९५ भाद्र. शु. १४ इ. १७७३ सप्टं. १४

( कल्याणमामलतीची रसद एक लक्ष रुपये असावी. )

१,००,००० कल्याणचे मामलतीचे रसदेचे भरणियास कल्याणाहून बराबर राणोजी नाा खासबारदार व सदाशीव गोपाळ सबनीस दिाा नन्हेखान भरीत बैल कल्याणकर तोपची याचे सुाा २५ दर बैलास ४००० प्रो [ श. १६९५ भाद्रपद शुाा १४ ]

( नेरळच्या मामलतीची रसद ५०,००० रु. असावी. )

५०,००० भरणा रसद सालमार ताा नेरळ हुजूररसदेचे भरणियासी सालमजकूरचे ऐवजी राा केले ( पण पुढें ह्याहीपेक्षां अधिक असल्याचें दिसतें. )

८७६॥ जमा हुंडणावळ सालमजकुरीं सरकारांत तालुके नेरळ येथील रसदेचा भरणा हुजूर केला रुो ६९७०० एकूण दर से. रुो १॥ प्रो रु. १०४५॥ पौ वजा १५ भाडेंखर्च पुणियासी ऐवज बैलावरून पाठविला त्याचें भाडें सरकारांत खर्च पडलें

१८८ बटा इटाव
३६ परत बहुडा नीरस रुा निघाले

( मुळांत येथें १६९ बेरीज दर्शविली आहे ! )

बाकी हुंडणावळ

तुळशीबागवाले } { श. १६९५ इ. १७७३

९०००० लक्ष्मण नाा चाबुकस्वार जमा नेवासे नेवासच्या रसदेबाा हाली सिका [ १६९५ ]

तुळशीबागवाले } खर्च पौषमास { श. १७१७ श्रा. व. ११ / इ. १७९५ आगष्ट १०

१५००० बाळाजी रघुनाथ दाभाडी पाटणें कुसुंबें येथील सन सीत तिसेनचे रसदेबद्दल ऐवज देणें रामचंद्र नारायण पुणें सुभा, सन खमस तिसेनात खासा स्वारी नबाब निजामअलीखान याजवर खरड्यास जाली ते समई स्वारीखर्चास जिन्नस वगैरे. माारनिलेचे गुजारतीचा खर्च जाला त्याबद्दल ऐवज माारनिलेचा सरकारांतून येणें त्यापौ देहाये माारचें रसदेचा ऐवज येणें तो देविला बाा अजमास आदा बाा कबज रामचंद्र नारायण मिती श्रावण वाा ११.

चिपळूणकर } हिंदुस्थान महालाची रसद { श. १७३५ / इ. १८१३

यादी हिंदुस्थानचे महालाचे रसद भरण्याबद्दल ऐवज वीचुर याजकडे देविले गुाा आबादास महाजन

५०००० रु. ऐन भरणा

२५००० आश्वीन वाा १ शके १७३५

२५००० मार्गेसीर्ष वाा १ ” १७३५

५००००

५००० महाजनाचे रदकर्जास देविले बाा वरात ...

५५०००

चिपळूणकर } { श. १७३६ / इ. १८१४

---

हिंदुस्थान प्रांताचें उत्पन्न–रा. रा. बापाजी मोरेश्वर सेवक विठ्ठलराव नरसिंह चि. वि. तुम्हाकडून प्रांत हिंदुस्थान येथील महालानिहायबद्दल सालमाारचे रसदे ऐवजी हाली सिका घ्यावयाचे ठरले रु. ६९००० [ श. १७३६ ]

खाजगीवाले } जकात { श. १७०४–१४ / इ. १७८२–९२

खाजगीवाल्यांच्या दप्तरांत मला सात दस्तक आढळले. पैकीं एक पंतसचिवांनीं दिलेला असून ६ पंतप्रधानांचे आहेत. एक नक्कल असून बाकी अस्सल आहेत. चौकीदार, कमाविसदार, रहदार, बाजेलोक व जकाते महाला-

निहाय ह्यांस हे हुकूम सोडले आहेत. "राजश्री नीळकंठराव गोविंद यांचे खासगत कोठीचे बैल सर ६० साठ खेरीज फिर्गाण कोकणांतून तांदूळ व मीठ व देशांतून गल्ला खरेदी करून सरसाल आणितील त्यांस आणूं देणें जकातीचा तगादा न करणें जाणीजे " असा बहुतेकांत मजकूर आहे. एक दस्तक मात्र " तेल व व तूप जोत्या सुा २० वीस हरएक जागांतून खरेदी करून पुण्यास आणितील त्यास आणूं देणें. जकातीचा तगादा न करणें " अशा मजकुराचा आहे.

ह्यावरून मुख्यत्वें दोन गोष्टी अनुमित होतात. [ १ ] पेशवाईत इकडून तिकडे मालाची ने आण केली असतां जकात असे. [ २ ] लाचलुचपतीचा अगर भिडेचा उपयोग होत नसे. खाजगीवाले यांच्यासारख्या गृहस्थांना सुद्धां सरकारची परवानगी आणून नाकेदारांस द्यावी लागत असे.

सदरहु पत्रें अरबी सन ११९०, ११९१, ११९२, ११९३ चीं आहेत.

आणखी एक अस्सल पत्र सलास समानीन मया व अलफ [ ११८३ ] सालचें आहे त्यांत " पाा सिनर येथून सरकारी तांदुळाचे बैल सर २५ पचवीस पुणियास येत असे. तरी मार्गी जकातीविसी तगादा न करता येऊं देणें वस्तीस राहतील तेथें गवत जागा देऊन चौकी पाहरा करणें जाणिजे छ २६ रविलोवल." असा मजकूर आहे. सिन्नरहून स्वतःकरता पेशवे तादूळ आणीत असत. ( श. १७०४ माघ वाा ३ ता. १।३।१७८३ )

वैद्य } {

·।।। · जकात खर्च कराचीहून मिरच्या आणिल्या त्यासमई मार्गानें देणें पडलें तें [ ४ रुपयांच्या मिरच्या ]

३ जकातीबद्दल [ तूप जमखिंडीहून आणलें त्यास ]

८।। · व्यापार— जकातखर्च मुंबईहून वाईस येता सुरण आणला त्यास पडली ते गुाा महादू गाइकवाड.

तुळशीबागवाले } { श. १६८५ आश्वीन इ. १७६३ आक्टो.

२५१३३ भवानीशंकर रघुनाथ ऐवजबाा बाळाजी कृष्ण बापट जकाती कोकण गुाा दिनकरराव लक्ष्मण रु २५००० पैकीं परभारे

चिपळूणकर }  {

२५० श्रीमंत पंतसचीव यास जिल्हे बाबेबद्दल दरसाल रुपये द्यावे लागतात ते रुपये २५० चार हप्त्यांनीं देणें.

तुळशीबागवाले }  { श. १७०० / इ. १७७८

४००० किले पुरंधर जकात कल्याण भिवंडी निा भिकाजी विश्वनाथ.

१०५५।≶॥ कागद गढ्या नेवासें खातें बाा याद

१५१०८– गढ्या सुाा २९९

१२॥ जकात

४८॥। भाडें कागद वाड्यांतून नेवाशास व नेवाशाहून पुण्यास पाा वगैरे.

१२॥। जकातखर्च कराड्याहून तांदूळ पुण्यास आणले त्याची जकात देणे रावोजी आंग्रे सरखेल

१०। तांदूळ खंडी दर १ प्रो

२॥ वऱ्या व भात.

कल्याणसुभेदार }  {

१०२। जकात घोडी व उंटे मुाा पुर्णे किंमत रु. ८५० दर सें. रु. १२॥ प्रो. ( प्रतापगडास जातांना )

वैद्य }  { श. १७३५ / इ. १८१३

·॥।· जकातखर्च कराचीहून मिरच्या आणल्या त्या समई मार्गानें देणे पडले ते [ ४ रुपयांच्या मिरच्या ]

३ जकातीबद्दल [ तूप जमखिंडीहून आणलें त्यास ]

८॥· जकातखर्च मुंबईहून वाईस येता सुरण आणला त्यास पडली ते सुाा महादु गायकवाड

चिपळूणकर }  { श. १७५० चैत्र वा॥ ३ / इ. १८२८ मे २

चिटी सरकार राजश्री तान्हाजी राजे सिर्के देशमुख व सरदेशमुख मामले

रायरी ताहा जकाती माहालानिहाय. सुा समान इशरीन मया तैन अलफ राजश्री दाजी गंगाधर चिपळूणकर याजकडे सिकेकाई ओझेभर व एक कोहळा पा आहे त्यास जकातीविषयी अडथळा न करता जाऊ देणे जाणिजे छ १७ माहे रमजान मोर्तबसुद. तानाजी राजे सिर्के दस्तुर.

जनार्दन बापुजी गोरे कारकून.

तुळशीबागवाले } { श. १७५३ इ. १८३१

८।।। जकाती बाा घाटांत तटुचे मुा खोपवली

•।६ मुंबईहून बाहेर निघते समयी जकात कापडा बाा

।– जकातीबाा ( मुा खोपवली )

८।।। घाटांत जकात

चिपळूणकर } { श. १७३९ इ. १८१७

पेशवे सरकारांतून प्रांत पुणें व जुन्नर येथील जकात व प्रांत कल्याण व भिवंडी येथील हुंड्याची जकातीच्या मामलती चिंतो वामन देशमूख यांनीं केल्या. त्याजपासून विनायक रंगनाथ चापेकर यांनीं केल्या. पुणें जुन्नर येथील जकातीचा मक्ता कार्तिक व. १ शके १७३८ तागायत कार्तीक शु. १ शके १७३९ अधिक श्रावण सुद्धा १३ माहीचा ठराव रु. ७५००० हप्तेबंदीनें द्यावयाचे; त्याप्रमाणें आश्विन शु. १५ शके १७३९ पर्यंत ६४००० रु. सरकारांत भरले. पुढें लढाईमुळें अमदानी बंद झाली.

प्रांत कल्याणभिवंडी येथील हुंडेकरी पुणेकर याचे मिठाचे व किराणा व जरमीना कापड व भुसार वगैरे जिनसांचे जकातीचा मक्ता कार्तिक शु. १ शके १७३८ तागायत शके १७३९ आश्विन अखेर अधिक श्रावणसुद्धां तेरमाही ठराव रु. ११०००० याची वहिवाट ज्येष्ठ मास पावेतों होऊन भरणा रु. ६०१२३। रु. चा झाला. पुढें महाल सरकारांतून इंग्रज कंपनी बहाद्दर यांजकडे दिला तेव्हां अम्मल गेला.

'यावरून पेशव्यांचें कोणते प्रांत इंग्रज सरकाराकडे केव्हां गेले तें समजतें व राज्यक्रांती झाली असूनही सरकारी जमाबंदीला बिलकुल अडथळा आला नाहीं, राहिलेल्या मुदतीचे मक्त्याचे पैसे कंपनी सरकारास मिळाले.

पुण्याच्या जकातीचें लिलाव सन १२४२ फसलीचे २,११,००० रुपयास

भास्कर विश्वनाथ यांनी घेतले. पण मुदतींत बाकी दिली नाही सबब २,०६,००० रुपयांस अगोदर बोलणारा गोपाळ विश्वनाथ दाते साहेबास सांगतो कीं, तो मामला १५ महिने २५ रोज आम्हास दिला पाहिजे (ता. १० मे सन १८३२).

---

कल्याण सुभेदार } **गांजाचा मक्ता** {

कल्याणभिवंडी प्रांताचा गाजाचा मक्ता ५०० रु. होता.

---

तुळशीबागवाले } **पऱ्या, कर, हक्क** {

३०० मौजे बोकरी सन तिसाचे बा याद ऐन खंडणी रु. ३०० याची वाटणी. सरदेशमुखी रु. २७।. बाकी बेरीज २७२।।। रु. पो निमे मोगलाई १३६।= रु. बाकी स्वराज्य १३६।= पो सावोता ८।= बाकी १२८ तपशील

६४ निमे मोकास बाब
६४ ,, (लागत नाहीं)
१२८
२३६ श्रीकडील बाब
६४ प्रांत पुणें मोकास बाब
३००

चिपळूणकर } {

४८।। म्हैशीचे टिपेबद्दल दर रुपये १।। प्रमाणें
१ लग्न टका सोनू पालेकर याचे लेकींचे लग्न झाले त्याजबद्दल रुपया १। सूट वजा ·।·
१ म्हसके धनगर याने राखीचा कोलम चोरिला सबब.
पालक पट्टी तिसरे सालीं द्यावयाची ती.

कल्याण सुभेदार } {

३ रु. लग्नटका इनामगांव मौजे उसाटणें बाळाजी भोईर याची लेक नवरी, कानोजी ठाकुरकर याचा लेक नवरा लग्न १ जमा पोता

२० पाळणक सालाबाद प्रो जमा धरून खर्च लिा

१४ पाटील

६ मढवी

कल्याणला भोजनखर्चाबद्दल सरकारी नेमणूक सालिना २०० रुपयांची असे.

तुळशीबागवाले } **शिस्त** { श. १६८८ इ. १७६६

११०१॥ कसरखातें नामें मौजे पिसर्वे सन सबाचे सिस्तीचे रु. २६०१॥ पो सुभ्याकडील हिसेबी जमा रु. १५०० बाकी ( १६८८ ).

कल्याण सुभेदार } { श. १६९४ इ. १७७२

सुभेदारांचें चिरनेर व भोम गावांचें उत्पन्न.

२४० घरटका

४२॥ वणम्हैसी

८८|||≡ मोहतर्फा

१४। माचबकरी

१७१|||- वरकस

११९|||= ताड

८६|||=॥ रेंददारुभटी; टाहूर

१॥ पोतदारी

६८- दल्हे डोंगर ( दलहें–जमिनीचा तुकडा )

४०|= कमावीस

५ वेठी पो

४८= बसणी गलबतें सावकारी

२९|||= लग्नटका पाटदाम झाडदस्त किरकोळ

१|= डमाणी ( भेंडे=मासे मारण्याची जाळी पाण्यांत अडकवून ज्यांना ठेवतात ते बोयरे ! )

ह्याशिवाय मुंजिवली (ठाणे जिल्हा) चिरनेर ( कुलाबा ) हे गांवहि इनाम होते. आंगऱ्यांकडून अष्टागरांत वाड्या इनाम मिळाल्या होत्या.

तुळशीबागवाले } { श. १६९७ इ. १७७५

खर्च–प्रांत पुणें देणें मालोजी

६००० घोरपडे नजरपट्टीचे वराते पो॥ शु. १०

५०० देणें दुलभसेट नजरपट्टीची वरात १५०० पों जमा गंगाधर बल्लाळ

३०० देणें चंदन गडकरी वरात नजरपट्टी पों छ १६ जिल्हेज वा। १४

२५० देणें चंदन गडकरी नजरपट्टी वरात छ १७ जिल्हेज.

खर्च–फालगुणमास

३७० सोनजी पा। कोलता मौजे पिसर्वे दसकपट्टीबद्दल देणें. प्रांत पुण्याकडे गु॥ हरि अनंत.

नेवासें खाते ( श. १६९८ इ. १७७६ )

२००० जमा प्रांत पुणें मालोजी घोरपडे याजकडून वराते बा। दहकपटी पौ वरात छ २९ जिलकाद. चैत्रमास (ह्याचें साल वेगळें दिसतें)

१२९०० नजरपटी पौ वरातांस

४३५० बाबूराव पाटणकर

३३५० मुधोजी निंबाळकर

४२०० सुभानराव पाटणकर

१००० आपाजी जनार्दन

१२९०० आधिक भाद्रपद

चिपळूणकर } { श. १६८२ फा. इ. १७६१ फे. मा.

९००२ हैबतराव भवानीशंकर कर्जपटीबा। गोविंद हरी याची वरात सरकारातून जाली ते शामराव आबाजी यानी उगवून द्यावा याविसी पत्र पाठविले आणि देविले ते जमा गोविंद हरी

२००१ माघ वद्य ५

४००१ माघ वा। ३०

३००० चैत्र आखेर

९००२

कल्याण सुभेदार }

११॥≈ सुरण सरकारांत दिल्हे

२१० नहरपटी कातरजचें तळ्याचें पाणी पर्वतीस आणिले त्याची पटी

सरकारातून झाली विा हरी बल्लाळ फडके मा आण्णाजी पंत भावे रु. ५०० पैकी करार जाले ते.

## सांखळटक्का व भिकणे

१९।-॥ सांखळटका ताडांपो दर ताडास ८८॥। प्रो

६।= भिकणे बाळाजी महादेव, मुक्तेश्वर बोरगांवकर, देशपांडे वगैरे रयतेनी द्यावयाचे ते जमा.

तुळशीबागवाले } { श. १६७४ इ. १७५२

४४५ कबारपट्टी पो (१६७४) (महार? कबाड? कबाड = बैल-उंट घोडा ह्यांवरून आणलेला कडबा)

८७४॥।- दिवाणपट्टी

१५ रु. काजी इभ्राम भालेपट्टी पो वसुल रोख जमा. (१६७५ ज्येष्ठ)

२३४ रु. मौजे जेजुरी दारुपटीचे ऐवजी (१६९५)

तुळशीबागवाले } { श. १६९६ आषाढ इ. १७७४ जुलै

(मोरीचें काम त्र्यंबक तान्हाजीच्या मार्फत झालें व त्यानें उत्तम प्रकारें हिशेब ठेवल्यामुळें त्याला बक्षीसही देण्यांत आलें.)

५० रु. त्र्यंबक तान्हाजी कारखाना मोरी यास बक्षिस कारखान्याचें लिहिणें लिहिलें सा १६९६ आषाढ.

ह्याशिवाय[1] मोरी नदिकिनारा शहर पुणें ह्याचा जमाखर्च आढळतो तो—

जमा—पौषमास. (श. १७०५)

५००० मोरी नदी किनारा शहर पुणें कामाबद्दल सरकारांतून ऐवज देविला बाा चिठी लक्ष्मणभट दिवेकर याजकडून माघ शुाा १५ मितीनें देविलें तें नामे दिवेकर माार गुाा केसो शंकर कान्हेर दिाा बुंदले मिती चिठीची पौष वाा १० गुाा सदाशीव रघुनाथ कारकून नलपटीची पावती दिल्ही गुाा सदाशीव गंगाधर

खर्च—माघमास

१७३८ कारखाना मोरी नदी किनारा शहर पुणें

---

१ ह्या उल्लेख प्रकरण ११ 'पुण्यासंबंधीं माहिती' तेथें लक्षांत घ्यावा. येथें नळपट्टीबाा घेतला आहे.

तुळशीबागवाले } { श. १७००
स. १७७८

३९४। सदाशीव मल्हार बाभुळपट्टी व बैलपट्टी बा। सन समान बा। याद रु. ३५२९८≈ पो आदा ३१३४॥≈ बाकी हल्लीं तोफखान्याकडील वरात.

१५०० महादाजी अनंत बाभुळपट्टी बा। सन समानचे तोफखान्याकडे दिल्हे ते ( श. १७०० ).

१२०० प्रांत पुणें बाभुळपट्टी बा। जमा सदाशिव मल्हार

तुळशीबागवाले } { श. १६९९
स. १७७७

८७४।।- नेवासें खातें दिवाणपट्टी बा। वेंकाजी अनंत दि। बापु (१६९९)

७५० सखाराम जिवाजी दादो जिवाजी यांजकडील कर्जपट्टी सरकारची त्याज बा। देणें ( १६९८ )

५००० रु. जमा वासुदेव ना। दांडेकर पोतेचाल दहकपट्टी पो (१७०३).

९४१२।। हरी अनंत खातें प्रांत पुणें येथील दहकपट्टी बा।

७३७८= हरी अनंत दहकपट्टी बा।.

६९५ मौजे जेजुरी येथील वाणी उदमी यांजकडील

१८।= म्हाळसाबाई कोम मल्हार केशव देशपांडे मोजे तेरडे येथील

१०।।। त्रिंबक सोमनाथ हवालदार तेरडे येथील

१३ मोजे पिसोळी येथील देशपांड्या बा।.

७३७८=

१५००० प्रांत पुणें दहकपट्टी पो भरणा सरकारांत रत्नशाळेकडे बा। पावती रु. २५००० पो पेशजी दिल्हे १०००० बाकी हल्लीं.

( ह्यावरून दहकपट्टी ही मोठी उत्पन्नाची बाब होती असें उघड होतें. )

तुळशीबागवाले } { श. १६९८
स. १७७६

९४८५।। खासगत वेतन

९४६३ ऐन

२२।। खेरीज कबज दिवटीचें तेल बा।

९४८५।।

पो पेशजी सरंजामपट्टी बा रु. ७००० व नहरपट्टी बा १०००
एकुण रु. ८००० सरकारांत दिल्हे बाकी येणें ते नामें प्रांत पुणें (१७०३)

९३॥ घरखर्च खातें सरकारचे दहकपट्टीस दिल्हे इनाम बिघे ७५ दर बिघा १। प्रौ (श. १६९८)

तुळशीबागवाले } { श. १७०३ स. १७८१

६७। हरी अनंत खातें नजर मौजे जेजुरी वाण्याकडील पट्टी बा गु गंगाधर धोंडदेव (श. १७०३)

१८२१ नेवासें खातें देणें रा. नानाफडणीस गु श्रीधर गोविंद पा वैजापूर येथील दखल बादी बा (श. १७०३)

६७७। केरोजी जामदार इनाम पट्टी बा ऐवज प्रात पुण्याकडील आला तो.

तुळशीबागवाले } { श. १७०४ स. १७८२

१०० हरी अनंत खाते दहकपट्टी पो गु त्रिंबक सोमनाथ यांजकडे ऐवज येणें त्यापौ. (श. १७०४)

४९२ लग्नपट्टी बा को दाभाडी व कुसुंबे येथील गु सिद्धेश्वर त्रिंबक

५०० प्रांत पुणें दाभाडी पाटणें येथील सरकारचे लग्नपट्टी बा नामें रघुनाथ त्रिंबक (१७०४)

जमा–श्रावणमास— शके–१७०५

२५०० हणमंत जाधवाकडील सरकारच्या लग्नपटीचा ऐवज येणें त्यापो. वसुल-माळी बा पत्र गणेश चिटको.

खर्च–श्रावणमास (इ. १७८३ ऑगस्ट १६)

२००० हणमंतराव जमा जाधवा बा ऐवज सरकारचें लग्नपटीच्या हुंडयाचे. गु गणेश चिटको हुंडया २. वा ४ शनवार सदर्हु पक्की मितीनें

पुढें श. १७०४ सालीं तळ्याची ताल बांधली त्या कामीं जवळजवळ ५०००० रु. खर्च झाल्याचें दिसतें. हें काम गोपाळ वैजनाथ ह्याच्यामार्फत झालें असावें. श. १६८३ नंतर कात्रज तळ्यावर पुनः बराच खर्च केलेला असून तो लोकांकडून पट्टी करून वसूल करण्यांत आला होता. हा सर्व खर्च गोपाळ वैजनाथाच्या नांवानें पडला आहे. हें दुसऱ्या खेपेचें काम श. १७१० पासून १७१३ पर्यंत चाललें होतें.

जमेकडील रकमा खाली दिल्या आहेत.

८६३७||| = तळें कात्रज येथील कामा बा। सरकारांतून सिद्धेश्वर महीपत बिनीवाले यांजकडून देविले ते गु॥ कृष्णाजीपंत दातार हस्तें बाळाजीपंत पोतदार (श. १७१० ज्येष्ठ)

१००० इ॥ तळें कात्रज सदरहु कामा बा॥ पुण्यांत पट्टी बसविली त्याचा वसूल भिकाजी धोंडदेव उडतकर यास सांगितला त्यापैकीं जमा रविवार पेठे बा॥ नि॥ माधवराव त्रिंबक पटवर्धन याजकडील चांदवड छापी सुलाखी (श. १७११ कार्तिक इ. १७८९ ऑक्टो. नोव्हें.)

१००० मि॥ शु. १४ मार्गशीर्ष तळेपट्टी पो पेठ बुधवार
१७५ ,, ,, ,, नारायण
५०० ,, वा॥ ११ ,, ,, शुक्रवार
१००० ,, ,, ,, रविवार
३०० पौष ,, ,, गुरुवार
३०० ,, ,, ,, भवानी
२०० ,, ,, ,, गंज
१७५ तळेपट्टी पेठ रविवार १७१२ वैशाख
५०० ,, ,, शुक्रवार ,, अधिक
२०० ,, ,, गंज ,, ,,
७५ ,, ,, मंगळवार ,, ,,
२०० ,, ,, गणेश ,, ,,
१००० तळेपट्टी पो वरात फत्तेसिंगराव भोसले यावर

रु. २५००० पौ जमा

१०००० पौषमासीं
१०००० माघमासीं
――――
२००००

बाकी गु॥ जिवाजीपंत याणीं हरिभक्त याजकडून देविले. श. १७१३ चैत्र.

"नहर पर्वती" ह्या कामास १७०१ च्या पौष महिन्यांत सुरवात

---

१ हे दीक्षित पटवर्धन (पुणें कसबा पेठ). ह्या घराण्यांतील सदाशिव दीक्षित ह्यांनीं ही पेठ थो. बाजीराव प्रधान ह्यांचे राजवटींत श. १६५४–१६६० बसविली. ह्या पेठेस पूर्वी मलकापूर पेठ म्हणत.

झाली व तें काम १७०४ सालीं संपलें. एकंदर खर्च ८३२६८ रु. झालेला आढळतो. ह्या सर्व आंकड्यांचा अर्थ इतकाच घ्यावयाचा कीं, त्याहून कमी खर्च झाला नाहीं, जास्ती झाला असेल. तसेंच ५३९६० कारखाना "मोरी" निमित्त खर्च पडले आहेत. हें गटाराचें काम १७०४ सालापासून १७०६ पर्यंत चालू होतें. ह्या नळमोरीपट्टींत अनंतराव रास्ते १००००; बारामतीकर ६०००; माधवराव पवार १५००; खानमहमद वाईकर २००; परशरामभाऊ ५०००; शहाजी भोसले ४४००; अमरसिंग जाधव ७००; हरिभाक्ति गुजराथी १०००; लक्ष्मणभट दिवेकर ५०००; वगैरे लहान मोठ्या देणग्या आहेत. बाकीचा खर्च सरकारनें सोसला असावा. कारण, १५००० रु. नहर पर्वती येथील कामाबा॥ सरकारांतून जवाहीरखान्यावर नहरपटीचे ऐवजी देविले (श. १७०२.) ५००० रु. जमा नहरपर्वती, ताल कात्रजचे तळें व मोरीच्या कामाबा॥ ऐवज देविला आहे सरकारांतून त्यापो॥, असे उल्लेख आहेत.

२५० रु. जमा ताल तले पर्वती नहरा बा॥ ऐवज सरकारांतून मोरीच्या कारखान्याकडे देविला आहे. त्यापैकीं सेवटची रक्कम रु. ७५०० पौ॥ आदा रुपये ५९०० बाकी येणें ते एकंदर रुजवातींत धरून गोपाल वैजनाथ यांजकडे लिहून दिल्हे आहेत. जमाखर्च नामे सदाशीव रघुनाथ कारकून.

तुळशीबागवाले } { श. १७११ / स. १७८९

राज्यांत एकंदर पट्टया किती असत तें वरीलप्रों॥ खालील रकमांवरून समजेल.

५०० भिकारपट्टी बा॥ सरकार पोत्यास जमा केले गु॥ अनाजी लक्ष्मण पुरंधरे मि॥ शु. ३ सोमवार (वैशाख श. १७१५ ता. १३।५।१७९३ ).

२०० जमा गणेश गोविंद राजवाडकर

३०० ,, माणीकचंद नगरवाले

५ रु. कमावीस जमा लग्नटक्का लग्ने २ दर २॥ प्रों॥. १७११ आश्वीन

१।= वरवडटक्का बा॥

८≡ चवलेपट्टी धनगराकडील १ येकूण

१००० रामचन्द्र लक्ष्मण खाते जमा गंगाधर आपाजी बहुलेकर पेशजी श. १७१६ फाल्गुन मासीं देणें महादाजीपंत गुरुजी कर्जपट्टीचे रुपये पेशजीचे पंचवीस हजार त्याचा जमाखर्च होणें राहिला तो सरकारांत करविला त्या बा॥

रु. १००० गंगाधर आपाजी यांचें नांवें लिहिले होते ते हल्लीं नामें रामचन्द्र लक्ष्मण खाते दरबारखर्च लिा असे (श. १७१९)

वैद्य } { श. १७२१ इ. १७९९

२॥ रु. पाटदाम महार पांचगणीकर यानें वाळूत येथील मुळनाक महाराचे पोर्गीशी पाट लाविला साा गुा हैबती पाटील गोळे

२ पाटदाम मौजे वाळूत तर्फ कुडाळ पो गुा संतू अगोडा, राम्या बिन रायाजी गोळा याची बहीण जाई हिशी पाट लाविला साा जमा रुपये चांदवड हस्ते राम्या गोळा शके १७२३ श्रावण

२ पाटदाम गुा कृष्णा (फाटलें) याची पोर्गी संताजी बिन राणूजी यास दिल्ही साा दंड रु. ३ पो रोख आले ते जमा मलकापुरी

८॥· खैरात देणें प्यादे बावधान, इनामपट्टीच्या वसुलीस आले त्यास तुपास आा २ दर ८।· प्रों शके १७२३

तुळशीबागवाले } शेतावरील कोकरपट्टी { श. १७२४ इ. १८०२

५ रु. घरखर्च शेतसारा कोकरपट्टी बाा इसने समानीनचे करार जाले रु. ३० पो जमाखर्च केला आहे रु. २५ बाकी हल्लीं.

४ रु. पालखीपट्टी सहाशें रुपये सरकारांतून रा. बाळकृष्णपंत विनायक यास वरात दिल्ही त्यांही नारो राम फडके तगाद्यास पाठविला त्यास (१७२४)

८ रु. सिधेखर्च सरंजामपट्टी सरकारांतून १६०० रुपयांची वरात रा. चिंतोपंत देशमुख यास दिल्ही त्यांनीं बाबाजी नारायण तगाद्यास पाा व दोन प्यादे त्यांस (१७२४)

चिपळूणकर } घरवणी { श. १७५०–५३ इ. १८२८–३१

सरकारांतून घरवणीचा तगादा कुळांस होऊन कुळें नेऊन वाड्यांत बसविलीं. नंतर रा. सुभेदार देशपांडे यांचे भेटीस काल दोन प्रहरानंतर गेले त्याचे बरोबर जाऊन बापूंचें व त्यांचें बोलणें निखालस जालें कीं घरवण घ्यावयाची याप्रमाणें बोलणें जाले. आज कुळांनी रुपये नेऊन भरले.

(हें पत्र इंग्रजी अमलांतील आहे. पत्रावर शक नाहीं पण १७५० ते ५३ च्या सुमाराचें असावें.)

अकलूज देशमूख } **अकलूजच्या देशमुखांचे हक्क** { श. १७४८ इ. १८२६

वतनबाब देशमुखीबद्दल + अनस येतात त्यांची कलमें पो आकलूज व दहिगांव येथील

१ पो आकलूज येथील

१ के॥ मजकूर पेठे मुधा

१ गुजर व वाणी वगैरे या दर दुकानास दर सणास गूळ वजन दु दा डी टकाभार ( फाटलें आहे ) प्रो यतात ते सण

१ नागपंचमी १ पोळा

१ दसरा १ दीपवाली

१ संक्रात १ संवत्सर प्रतिपदा

६

१ सिमग्यास दर दुकानास गुळ वजन दुदाडी टकाभार येकसेर प्रो व खोबऱ्यांची वाटी दर दुकानास येक प्रो

१ तेली याजकडील दर सणास तेल वजन दोनसेर प्रो येतात

१ पेंड व सरम कणसाळु कबाडें दोन येतात

१ ताट लग्नाचें व गोंधळाचे वगैरे येतात ते

१ गौली याजपासून दर घरास दूध वजन ८८१ यकसर बारमाही दर येकादशीस घ्यावयाचें.

१ चर्मी जोडे चांभाराकडील दरसाल दसऱ्यास दोन प्रो येतात ते ( फाटलें आहे ) डील घ्यावयाचे.

१ मांगांकडील दवासन पायबंद व चीवट घ्यावयाचे.

१ ढोराकडील मोट येक वर्षाआड घ्यावयाची.

१ कलालाकडील दारु दरभटीस दर महा वजन ८८।० प्रो येतात ते व मास विकावयास आल्या .. उकाळा घ्यावया...

१ लग्नास तेल खीसका—व साड्यास खाडवा वाटी घ्यावयाची.

पो मजकूर सिक्याबदल

१ तेल दरगांवीं दर घाण्यास वजन ८८४ प्रो घ्यावयाचें.

१ राबता महार

१ दरसाल दीड महिना घ्यावयाचे ते देहे

१ मौजे फोड सिरस
१ मौजे बागर्डे
१ मौजे लोणंद
१ मौजे माडवे
१ मौजे भाम
१ मौजे यळीव
१ ठाणें नातपुते
१ मौजे फडतरी
———
८

१ दरसाल दर गांवास पंधरा दिवस घ्यावयाचे ते देहे सुा २१

१ मांगाकडील दवासन पायबंद व चीवट १ देहे सुा ८ वडीलकीचे व भाऊ हिशाचे त्यास दर गांवास चिवट यक व दवासन पायबंद दोन प्रो घ्यावयाचे.

१ देहे सुा २१ यास दवासन पायबंद एक प्रो घ्यावयाचे.

१ चर्मी जोडा चांभाराकडील

१ देहे सुा ८ दर गांवीं दोन प्रो.
१ देहे सुा २१ दर गांवीं यक प्रो घ्यावे.
———
२

१ पेंडवल दरसाल दर गांवीं कबाड दोन प्रो घ्यावे.

{ श. १६७५
{ इ. १७५३

२६५०० हैबतराव जाधव बयाजी लक्ष्मण चऱ्होलीकर यांस निमे माम लत सरकतीनें देऊन निमे ऐवज चाळीस हजार द्यावयाचा करार केला त्या पो. (१६७५).

६०० दाजी त्रिंबक यानी कऱ्हाड प्रांतीचे रसदेचे द. ४६०१० सरकारांत देविले. तो ऐवज पुण्यास जमा करून ठेवला आणि ऐवज न घेतां दुसरेकडून भरणा केला. ऐवज बसून राहिला त्याचें व्याज ... (१६७९)

### अधिकार नेमणूक

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामाजी माहादेव स्वामी गोसावी यांस पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन

# राज्यव्यवस्था

## अधिकार नेमणूक

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामाजी माहादेव स्वामी गोसावी यांस पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीये लिहित जाणे. विशेष, तुम्ही विनंति पत्र पाठविले ते प्रविष्ट जाह्ले. करडा घोडा आरबी पाठविला तो कार्याचा नाहीं. कुमाइत घोडा तेथे राहिला आहे तो सत्वर पाठवून देणे. ( या खालील मजकूर फाटून गेला आहे. )

| कल्याण सुभेदार | अधिकार नेमणूक | श. १६९३ वैशाख शु. ११<br>इ. १७७१ एप्रिल २५ |
|---|---|---|

राजश्रिया विराजित ( पृ. ४८ शेवटच्या पत्राप्रमाणे ) विशेष; तुम्हाजवळ आरबी घोडा आहे त्याचे सरकारात प्रयोजन आहे. तरी पत्र पावताच आरबी घोडा हुजूर पाठवून देणे जाणिजे. छ ९ मोहरम सुा इहिदे सबैन मया व अल्फ. बहुत काय लिहिणे घोडा जलद पाठविणे हे विनंती.

| किता | श. १६९४<br>इ. १७७३ |
|---|---|

(एका हिशेबावरून सुभेदारांचें उत्पन्न (शक १६९४ मधील) दिसतें तें असें)

४६६०८= हिशेब साष्टी माा सदाशिव राम दामले

| | |
|---|---|
| १५०० | खुदवेतन नेमणूक दरसाल |
| २५० | सरंजाम पालखी एकसाला आड सरकारांतून नेमणूक |
| ४६२॥= | मुकासागांव मौजे मुंजीवली |
| २२५० | सिलेदार नेमणूक राउत आा १५ दर १५० प्रो |
| ६० | कारकुनीची असामी निा सरपाटील |
| १३७॥ | फरास दिवट्या व कामाठी |
| ४६६०८= | |

किता } { श. १६९६ / इ. १७७४

नेरळ सुभ्याचा बद्दलमुशाहिरा–एक वर्षाचा (शक १६९५ सालचा) २०५० रु. असल्याचें दिसतें.

३७०० सरकार कल्याणकडे बाा मुाा सुभा कल्याण सन खमस
३५०० ऐनवेतन राा. ७००० पो वजा निमे दिनकरपंत.
२०० भोजनखर्च.

तुळशीबागवाले } { श. १६९७ / इ. १७७५

२७९०॥= किले पुरंधर वरात कारकुनाचे वेतना बाा रु. ५७९०॥= पो परभारा गडास पावले ३००० बाकी.

कल्याण सुभेदार } भागीची मामलत { श. १६९८ / इ. १७७६

२७५० रु. वेतन नरहर गोपाळ भागीची मामलत सबब दुसाला वेतन खासगीकडे जमेस आले. हल्लीं भागीचा हिशेब
१७५० वेतन सन सबैन ३५०० पैकीं
५०० मोकासी याजकडील सन सबैन पो १००० पो
५०० सन इहिदेंत निमे वेतन पो १७५० पावावे ते २२५० घेतले ते नीमेचा ऐवज वगैरे

किता } { श. १७०१ श्रावण व. ५ / इ. १७७९ सप्टं. १

राजश्रिया विराजित राजमान्य राजेश्री रामराव नारायण स्वामी गो यांस–

पो माधवराव नारायण प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणे विशेष; राा रामराव अनंत यांचे तीर्थरूप अनंदराव राम याजकडे मौजे मुंजीवली वाइंगणी ताा चोण तालुके राजमाची बागा व खेरीज तैनात पेसजीपासून चालत आहे त्यास आनंदराव राम मृत्यु पावले साा (सबब) मारनिलेचे नावे पेशजी प्रो करार करून हे सनदपत्र सादर केली असे. तरी मौजे मजकूरचा आकार होईल तो याचे नावें खेरीज तैनात तालुके मजकूरचे हिसेबी खर्च लिहीत जाणें जागीजे. छ १९ साबान सुाा समानीन मया व अलफ बहुत काय लिहिणें हे विनंती

तुळशीबागवाले } { श. १७०१ इ. १७७९

७५०० देणे गाडदी दिा सय्यद अहमद वगैरे यास रोजमरे याचे आकारापो वरात छ १९ साबान इ. २०००० पो जमा गोविंद नाईक ( १७०१ )

कल्याण सुभेदार } { श. १७०५ माघ शु. ६ इ. १७८४ जाने. २७

राजश्री चंद्रसिंग सिर्के हवालदार व कारकून किले विकटगड गाो

अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य-स्नाो माधवराव नारायण प्रधान आशीर्वाद व नमस्कार सुा आर्बा समानीन मया व अलफ तालुके कर्नाला येथील मामलत आनंदराव राम यांजकडे होती त्यास ते मृत्यु पावले सबब त्याचे पुत्र राजश्री रामराव अनंत याचे नावे करार करून हे सनद सादर केली असे तरी तुम्ही मारानिले याचे रजातलबेंत वर्तोन सरकार लक्ष राखोन किले मजकूर येथील अलंगनोबत चौकी पाहारा यथास्थित करीत जाणें जाणीजे छ ४ सोवाल आज्ञाप्रमाण ( लेखन सीमा ).

कल्याण सुभेदार } कांहीं अधिकारी { श. १७०५ इ. १७८३

राघो बल्लाळ फडणीस ताा सुवर्णदुर्ग; गोविंदराम कारलेकर हवालदार ताा सोनाळें; बाळाजी गणेश साठे पोतनीस साष्टी; बाळाजी महादेव भिडे फडणीस ताा साष्टी; नारायण केशव दप्तरदार साष्टी; चापजी विश्वासराव हवालदार किले करनाळा; विठोजी नाईक देवघरे हवालदार व कारकून किल्ले करनाळा ( श. १७०५ ); नारो केशव हवालदार करनाळा ( १६८३ ); जगन्नाथ नागेश तोफगोळ्याच्या कारखान्यावर कारकून; बळवंतराव भिकाजी सरचिटणीस प्रात कल्याण; लक्ष्मण प्रल्हाद कल्याणच्या सरकारवाड्यांतील कारकून; गोपाळ नारायण हशमनीस कल्याण.

कल्याण सुभेदार } { श. १७१८ ज्येष्ठ शु. ६ इ. १७९६ जून ११

राजश्री हवलदार व कारकून किले करनाळा गोसावी यास

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य-स्नाो बाजीराव रघुनाथ प्रधान आशीर्वाद व नमस्कार सुा सबा तिसैन मया व अलफ तालुके कर्नाला येथील मामलत आनंदराव राम याजकडे होती त्यास ते मृत्यु पावले सबब त्याचे पुत्र राजश्री

रामराव अनंत याचे नांवे करार करून हे सनद सादर केली. तरी तुम्ही मारनिले याचे रजातलबेत वर्तोन सरकारलक्ष राखोन किले मजकूर येथील अलंगनौबत चौकीपहारा यथास्थित करीत जाणें जाणिजे इ.

किता } वर्षासनें {

१३०७८≈। मोघम खर्च

१५। नजर श्रीमंत रावसाहेब मोहर दसऱ्यास

८२३ वर्षासनापैकीं दील्हे

२०० नाना फडणीस

१०० रामचंद्रपंत देवधर

७५ त्रिंबकराव चिटणीस

५० नारोपंत परचुरे

१२७ सदाशिवभट दाते

१४६ नारो निळकंठ मुजमदार

२५ राघोपंत बिवलकर

१०० लक्ष्मणपंत देशमूख

८२३

९६८= किता

१० सीवरामपंत मोडक

१० कारकून निा चिटणीस

५ सदाशिवपंत

५ कुशाबा जोशी

१० बाळाजी गणेश भिवडकर

५ दादाजी फडके

१४।।। सदाशिवपंत म्हसकर निा रावसाहेब

१५।= गोपाळ जोशी ( निसबत ) श्रीमंत रावसाहेब

६ रामचंद्रजी निा दप्तरदार

१० गोविंद आप्पाजी

५ सदाशिवपंत अभ्यंकर

९६८=

६२॥ चोपदार निा सरकार

६४ खिजमतगार ,,

**१४०० रु.** देणें नारो निलकंठ मजमदार हुजूर वर्षासन इा सन सबैन ता**।** इहिदे
दुसाला दर ७०० प्रो ७०० कल्याणकडे ७०० नेरळकडे

| किता } | वेतन | { श. १६८८<br>इ. १७६६ |
|---|---|---|

सखाराम जोशी कारकून–एक सालाचें वेतन रु. ७५

सदाशिव चिमणाजी कारकून–नेमणूक रु. १०० वर्षाची.

बाळाजी महादेव साठे–२०० रु. एकसाली वेतन गुमास्तगिरी चौधरी प्रात करनाळा इा सन समान ता**।** सालमजकूर तीसाला दरसाल रु. २०० पैकीं आगरे याजकडे सरंजामास निमे मुलख गेला त्यांजकडून यावयाचे रु. १०० बाकी सरकार अमल पो दरसाल रु. १०० प्रो

१७५ रु. जमा वेतन सरनाईकी किले विकटगड वेतनपैकीं खासगीकडे दरसाल पंचवीस रु. द्यावयाचा करार आहे त्याप्रो जमा सात वर्षांचे सन सबापासून.

| तुळशीबागवाले } | वेतन | { श. १६८८<br>इ. १७६६ |
|---|---|---|

३०० नारो दत्तो किले प्रचंडगडचे सबनिसीचे आसामी बा**।** सन सबाचे ( १६८८ )

३५० पुरंधराकडील सन तीसाचे आसामी फडणीशी ( १६९१ )

| तुळशीबागवाले } | वेतन | { श. १६९०<br>इ. १७६८ |
|---|---|---|

३०६॥ माधवराव निळकंठ रुपये जमा वेतन फडनिशी प्रांत, पुणे, समानचे ( १६९० )

| कल्याण सुभेदार } | { श. १६९८<br>इ. १७७७ |
|---|---|

१५० रु. रामचंद्रपंत देवधर दप्तरदार हुजूर वर्षासन पो

८१८= सरकारसाठी मोघम खर्च हिशेब पुणें ( श. १६९८ पौष )

१६ मौजे पुरंधर श्रीमंतांचे दर्शनसमयीं

६ चोपदार

२ दाजी शागीर्द निा सरसुभेदार

२ खिजमतगार निा बापू

२ चोपदार निा विसाजीपंत

४ खिजमतगार निा सरकार

४४ नजरमोहरा ३

१५ श्रीमंत रावसाहेब

१४ सौ. पार्वतीबाई

१५ मातुःश्री गंगाबाई

———

४४

२ खिजमगार निा पार्वतीबाई वगैरे

५० देणें कारकून हुजूर कबजाची पाहणी केली सबब वर्षासन दुसाला

१०० देणें गोविंदभटजी नित्सुरे दरबारी कामकाज केलें सा।

५० देणें लक्ष्मणपंत देशमुख सात हजारांचें कामकाज केलें सा।

तुळशीबागवाले } { श. १६९५-१७१४ इ. १७७३-१७९२

६ गुा कुशाल परदेशी प्यादे यास सालमजकूर पैकी रोजमर (माघ १७०१)

१००० किल्ले पुरंधर लोकांच्या सामाही वाटणीस (१७०५ आषाढ)

७०० ,, दीपवाळीचे वाटणी बा। (१६९५).

७०० किले पुरंधर येथील लोकांचे दुसरे रोजमऱ्याचे भरतीस दिल्हे (श्रावण १७१४)

७३ ,, प्यादे व जासूद् निा सरकार देणें जासूद जथे हाय यास दीडमाही रोजमरा सालमार पो (१७०४)

किता } { श. १७०१ इ. इ. १७७९

(सरकारी नोकरांचे पगार हप्त्याहप्त्यांनीं व ठराविक सणांस होत असावे.

१००० देणें लोकांस रवाना माची बराबर निंबाजी गरुड पोतेचाल अक्षतृतीयेचे वाटणी बा।

६ किले पुरंधर बाा मुाा देणे विठनाक दिाा डोंगरोजी नाईक यादव यास साल मजकूर पैाा आठवा रोजमारा ( शके १७०१ ज्येष्ठ )

५०० किल्ले पुरंदर शुाा २ राजमाची नागपंचमीचे वाटणीबद्दल ( श्रावण १७०१ )

तुळशीबागवाले } { श. १७०२ इ. १७८०

२७० किल्ले पुरंधर प्याद्या बाा सन समानीचे दरसाल पाो दसमाही दर आा रु. ५० प्राो रु. ३०० वजा कारकुनी व सादीलवारी दर असामीस रु. ५ प्राो रु. ३० बाकी ( १७०२ )

तुळशीबागवाले } { श. १७०८ इ. १७८६

१५६ बाळाजी नरसिंह वेतन सरकारचे पोतानिशीचे असामी बाा सन समानीनचे येणे रु. ३१२ पाो निमे वाटणीचे आले ते ( १७०८ )

तुळशीबागवाले } { श. १७१० स. १७८८

२०० वाा ३० वशाख १७१० देणें पोतनीस सरकार यांस इाा सन सीत समानीन ताा सन समानीन दुसाला ताा विनायक हरि सोमण.

तुळशीबागवाले } { श. १७११ इ. १७८९

१५० किले पुरंधर माहिपतराव बापुजी याचे असामीचे वेतन सालमाा सन तीसेनचे देणें ते ( १७११ )

खाजगीवाले } { श. १७२१ स. १७९९

६४ रु. सरकार पाो घोडी व उंट निसबतीस आहेत सबब त्याचे चाकरीचे माणसाचा रोजमरा

२८ सारवान आा १ इाा मोहरम ताा रजब पुढें सावनांत उंट सरकारांत दिल्हे सबब रजेस पो. मुाा माहे दरमहा तैनातीपैकीं रोजमरा रु. ४ प्राो आकार एकूण

३६ मोतादार आा १ इा मोहरम ताा जिल्हेज अखेर मुा १२ माहे दरमहा तेनात पो रोजमरा रु. ३ प्रो. ( १७२१ )

१० रु. सरकारपागेची घोडी व उंट निसबतीस आहेत त्यांचे माणसांचा रोजमरा

४ मोतादार १ माहे २ दर २ प्रो.

६ सारवान १ माहे २ दर ३ प्रो.

तुळशीबागवाले } { श. १७२३ इ. १८०१

३ रु. प्रांत पुणें नारो निलकंठ मजमदार यांचे वेतन सुभ्याकडून पावावें तें पावलें नाहीं. हल्लीं मारनिल्हे यास सरकारात लक्ष रुपये मागतात तेव्हां मजमदार यानीं विनंती करून वेतनें माहलोमाहाली येणें राहिलीं ती वसूल करून देतों म्हणून आबा काळे यांजकडील ब्राह्मण सिपाई मागून घेतले ते इकडे तगाद्यास बसले आा ६ ( १७२३ ).

(दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत सर्व वसूल प्रत्यक्ष बाजीराव करून घेई.)

खाजगीवा पगार {

५६ बारगीर रामजी खोड अवल ताा अखेर मुदत माहे १२ दरमहा तैनात रु. ६ प्रो कबज रु. ७२ पो वजा ६ आकरमाही; १ कारकुनी बाकी रु. ६५ पो आदा कैलासवासी बाबाचे वेळेस रु. ९ बाकी हल्ली.

४१ महादाजी पखाली इा अवल ताा अखेर मुा माहे १२ दरमहा ३॥ प्रो वजा कारकुनी १ बाकी.

कल्याण सुभेदार } { श.१६८१ पौषशु.१२ इ.१७५९ दिसें. ३०

इनामपत्र समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधी राजमान्य राजश्री राघोजी आंगरे वजारतमाब बनाम राजश्री रामाजी महादेव उपनाम बिवलकर सुभेदार सुा सितैन मया व अलफ दिल्हे इनामपत्र येसे जे मसलतीमुळें तुमची खासा स्वारी माहाल थल ताा अष्टागीर सुभा प्रांा चेऊल येथें येऊन मुकाम करून स्वामीकार्य सिद्धीस पावल्या नंतर माहाल मजकूरपैकीं वाडिया व वाडया मजकूरची सेत जमीन— वाडिया थल वाडी बाबत बिवलकर निा विठ्ठल वाडी प्रभवडी

निा नाना गोडबोला व गण जोशी व गोप पाटले व वाडी मजकूरचे सेत बना काव्या

येकूण हरलीवालीवाडी याची सेत जमीन देखील इनामविसी विनंती केली यैसियास राजश्री स्वामींच्या राज्यांत आपण येकनिष्ठ सेवा करून श्रमसाहास केले व करीत आहेत याजवरून वाडियाचा विषय आहे ऐसे नाहीं म्हणून त्या-वरून हरली वाड्या व वाडियाची सेतजमीन जलतरू-पाषाणक्षेपनिक्षेप हल्ली लावणी माड पेढ सुपारी व झाडझाडोरा व पेस्तर लावणी जीतजित्रप होईल त्या देखील वाड्या मजकुराची शेतजमिनी देखील कुलबाब कुलकानू खेरीज हकदार सालदरसाल आकार होत जाईल त्याप्रमाणें इनाम खर्च पडत जाईल तर आपण व आपले पुत्रपौत्रादी वंशपरंपरेने वाड्या मजकूर सेत जमीन देखील इनाम अनुभवित जावे रवाना छ ९ माहे जमादिलाखल (मोर्तब सुद) (वाटोला शिक्का)

कल्याण सुमेदार } { श. १६८२ माघ शु. १२ / इ. १७६१ फेब्रु. १६

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रामाजी महादेव स्वामी गोसावी यास—

पो बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार, विनंती उपरी, येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणें विशेष. गुलाब मोहिद्दीन व गुलामअली चौधरी प्रा कल्याणभिवंडी यांस तो अडखली व ता तुंगारतण व ता वारापाडे व को आवटे पो करनाला येथील वतनाचा हक्क बारा वर्षे पोहोंचत नाहीं; तुम्हाकडे वसूल झाला आहे येविशीं तुम्हांकडील राजश्री नारो केशव यांस चौधरी हटाकितात त्याची पत्रे पो मजकूरचे जमिनदार बोलावून हिशेबाचा फडशा करून देतो म्हणोन याजपाशी असता हक्काचा निकाल करून देत नाही. ऐसियांस येविशीं आज्ञा होऊन सदरहु बारा वर्षाचा हक्क राहिला आहे तो देवा-वा म्हणून चौधरी याकडील गुमास्ते माहादाजी जनार्दन याणी हुजूर विदित केलें. यास याचा हक्क बारा वर्षे यास कां न पावला ठेवावयास प्रयोजन काय हल्ली हें पत्र तुम्हास लिहिले असे. तरी पत्रदर्शनी याचा हिशोब करून याचा हकाचा पैका होईल तो वारून देणें उजूर न करणें. येविशीं फिरोन बोभाटा येऊं न देणें. जाणिजे छ १० रजब सुा इहिदे सीतैन मया व अलफ. पुढे चौधरी याचा हक्क सुरळीत

चाले नाहक गैर वाजवी खलेल न होय तें करणें. जाणिजे छ मा॥ बहुत काय लिहिणें हें विनंती.

कल्याण सुभेदार } { श. १६८३ इ. १७६१

( रामाजी महादेव याचा बाळाजी महादेव नांवाचा भाऊ असावा; ह्याने शक १६८३ मध्ये भिवंडी प्रांताची गुमास्तगिरी गुलाम मोहिद्दिन व गुलाम अलिचौधरी याजपासून खरेदी केली. )

तुळशीबागवाले } **दरबार खर्च** { श. १६८३ इ. १७६१

शके १६८३ पाटिलकी खरीदी केली वृशभनाम संवत्सरे जेष्ठ मास

नांवें

७००९ ।– खरीदी पाटिलकी मौजे कोकमटाण पा॥ कुंभारी येथील चौथाई पाटिलकी व कुपण घेतले त्यास खरिदीस व महजरास वगैरे खर्च ऐन खरिदी

२६० सन सबा सन ११६६ शके १६७८ रोख सखलादा वगैरे खर्चास गांवकरी यानी घेतले शके १६८३ सन ११७१ जेष्ठ शु. १३

२४०० देणे बाबुराव विष्णु पा॥ मोजे खिरडी पा॥ पाटोदे याजवळ महादाजी आबाजी पुरंदरे दिवाण राजश्री बाळाजी बाजीराउ प्रधान याचे नावे पाटिलकीचे खरिदीखत पूर्वी गांवकरी यानी दिले होते ते मानसिंग दि॥ पागा याने जातखत पसतिशा रुपयांचे देऊन खरिदीखत व गांवकरी यांचा रोखा सोडवून घेतला त्यापैकीं रोख रुपये मानसिंगानें ११०० दिल्हे बाकी देणे राहिले ते हस्ते माहादाजीपंत खिरडीकर तक्षीमदार बाबुरायांचा याजवळ मैराळ कृष्ण कमावीसदार पैकीं गांवकरी यानी पेसजी दिल्हे रुपये ७३५ बाकी ७४९।· पैकी वजा सूट रुपये ७५ बाकी ६७४। याखेरीज गला कैली सोळीले मापे खंडी ६॥। ३॥ एकूण खते २ पैकी गावकरी यानी पेसजी वसूल दिल्हा.

खंडी ६। ४॥——बाकी ०।४·९ रुपये १०॥। पावणे आकरा व नख्त साहासे सवाचवऱ्याइत्तर एकूण सासे पंच्यासी व सनगें समजाविसी बदल रुपये १५ एकूण सातसे रोख हस्ते मजकूर पावतींचे कबज असे

६०० सखंभट मुले जोसी मौजे मजकूर खते सुमार ७ एकूण रुपये ५९३ व समजाविसीमुळे ७ एकूण रोख हस्ते मजकूर पावती घेतली असे.

२८३ भिकाजी सेलका वस्ती मौजे मजकूर नख्ताचीं खतें २२ एकूण १८०६ पैकीं वजा दुबारा खते सुमार १६ एकूण रुपये ९५० बाकी रुपये ८५६ पैकी गांवकरी याजकडून वसूल पावला ६२६ बाकी २३० व गल्याबद्दल खते २ न्हानी खंडी १ व नक्ताच्या खतांत गला आहे एकूण २।४८। पैकी गांवकरी यानी वसूल दिल्हा १।४८। बाकी गहू खंडी १ एकूण रुपये ५३ व नख्त—दोनसे तीस एकूण दोनसे त्र्यासी रोख देउन खते माघारी घेतली व कबज घेतले असें.

१५८३

सदरहू पैकीं पाटिलकीचे खरिदीखताच्या भरण्याहून ज्याजती ऐवज जाला रुपये ३४३ तिनसे त्रेतालीस ते तिही तक्षीमाचे भावाचे नावे कर्जदादन लिहिले असेल बाकी बाा खरिदीखत

५०००

११९७॥= महजरसमई खर्च

३१५।-पाा कुमारी गांव ३२ वजा मौजे मजकूर १ बाकी ३१ येथील पाटील कुलकर्णी महजरांवर साक्षी घालण्यास आले त्यास तिवटे दर गावास सुमार ३ प्रों सनगे ९३ एकूण

३२॥। काजी जैन खुर्दीन व महमद आकरम नायब वगैरे आा ८ एकूण तिवटे हस्ते

२७।≈।। दिा धीराजी पवार आा २ सनगे सुमार ४

५।।।· दिा सोभागसिंग कारकून १

३९।· त्रिंबक मल्हार व त्रिंबकजी नाईक दिा सरदेशमुख व कारकून २ एकूण सनगे ६

४।· गोविंदपंत दिा जगजिवनराव पवार धोंडो गोपाळ सनग १

२०।।·।। विसाजी लाडदी व धिराजी पवार व कारकून वगैरे आा एकूण सनगे ४ एकूण

५५।-।।येशवंतराव वा मानसिंग जाधवराऊ देशमुख देशपांडिये

७२८=।। येशवंतराव वा मानसिंग जाधवराऊ देशमुख देशपांडिये

५५८=।। खासा २५ भेटी समई २

३०८=।। महजर समई ४

५५८=।।

१७ धोंडो गोपाळ व कारकून दोन एकून ७ नगे ४

७२८=।।

८।= सबनीस व चिटनीस पा मजकूर सनगे २

४। नायकवडी १

२०।। सावल विहीकर व रुइकर सिवधडे पा संगमनेर सनगे तिवटे६

१८ बालाजीपंत टोपे पारसनीस येवलेकर सनगे २

१३ चत्रसिंग मानसींग दिा पागा याचा बाप सनगे २

६१६।।०।।मौजे मजकूर व मये मजरे कंचनपूर

६१६।।०।।

७४।।≈ तिही तक्षीमाचे भाऊ सनगे १४

११३।≈।।पाटलांचे भाउ ३४

५९।।=कुलकर्णी सनगे १२

८ चौगला सनगे २

१८१।।≈थळवाईक ६०

५३।- जमले आसामी २२

५१। आडाण आसामी सनगे २४

७८॥ कारू २५ तिवटे

६१६॥·॥

११९७॥=

१५७ नख्त

४२ जेकुदीन काजी शालजोडीबद्दल ४०, बाकी २

१० नायेब

७५ धोंडो गोपाल आा देशमूख देशपांडिये याचे बापास शालजोडी

२० कुलकर्णी

१० मौजे मजकूरच्या माहाराचे बायकांस साड्या

१५७

१५४।≈भोजन खर्च व घोडी यांस दाणा व पानसुपारी महजरसमइ गावगनाचे पाटील कुलकर्णी आले त्यास खर्च

१५०९।-

५०० सेरणी पाटीलकी समधे सरकारची पत्रे करून घेतली त्यांस सरकारांत देउन पावल्याचा जाब घेतला आसे छ ९ जमादिलावल सन सबा शके १६९८

७००९।-

१३२३८= मौजे कोकमठाण येथील गावची बाकी सन तिसाची सरकारची देणे ते पाटिलकीचे खरीदीखत करून घ्यावयास बक्षीस पांच हजार सरकारातून कोकमठाणचें ऐवजी देविले होते त्यापैकीं घेऊन नांवे लिा

३४१६॥= निलकंठ महादेव जमा सरकारातून कोकमठाणचे पाटिलकीचे खरिदीखत करून घ्यावयास सरकारातून बक्षीस पांच हजार कोकमठाणीहून दरसाल हजार रुपये प्रों मानसिंगाकडून देविले पांचहजार त्यापैकीं गावचे ऐवजी पावले रुपये

२६० सन सब

१३२३८= सन तिसांची बाकी हिसेबीं राहिले ते सन इहिदे खर्च लिा

१५८३८=

बाकी ऐवज कोकमठाणचे ऐवजी मानसिंगाकडून पावला नाहीं तो पुणे सुभ्याकडून घेतला सन ईहिदे पाा १७ सदरहू पावेतो गुाा रामचंद्र उमाजी आसे

भाद्रपदमास

५३ ग्वाा पाटिलकी कोकमठाण येथील कागदपत्रवाले महजर लोक ते समइ सनगे दिल्ही नव्हती ते हली दिल्ही मेजवानी

१५ रामचंद्र धोंडदेव दिाा पागा मानसिंग

१७ बालाजीपंत दिाा पागा रामचंद्रपंतांचा भाचा

२१ मानसिंगाचा लेक

५३

तुळशीबागवाले } { श. १६८५ इ. १७६४

३४३ मौजे कोकमठाण पाटीलकीची महजर करून घ्यावयास गांवास गेलों ते समयीं पहिलीं कर्जे गांवाकडे होतीं ते कर्जदार जमा झाले त्यांचीं कर्जे वारलीं. त्याची अलाहिदा याद आहे. ५००० रु. पाटिलकीबाा भरणा देऊन जाजती पावले ते ( १६८५ पौष )

तुळशीबागवाले } { श. १६८३ इ. १७६१

पाटोदे दिाा रामचंद्र दामोदर याजकडून देऊन पसतीशा रुपयांचे खत मानसिंगाचे सोडवून घेतले आकरासे मानसिंगाचे दिल्हे होते ते त्याचे बापाजवळ दिल्हे. सदरहू पसातिसशाच्या पावत्या दोघापासून दोन घेतल्या आसेत छ २६ सवाल सन ११७० ( वैशाख वाा १३ ता. १-६-१७६१ )

११०० मानसिंग दिाा पागा याने बाबुराव विष्णु जवळील खरिदीखत सोडवून रोख दिल्हे होते ते त्याचे बापाजवळ चत्रसिंगाजवळ देउन पावती घेतली आसे रूपये ३५०० चे खत व खरिदीखत गांवकरी याचे सोडवून मानसिंगाने घेतले त्यापैकी रोख दिल्हे होते ते दिल्हे छ २६

१२४० कर्जे वारण्यास आमानत रामचंद्र धोंडदेव दिा पागा मानसिंग याजवळ ठेविले ते तेच समई त्याजपासून घेऊन कर्जें वारिली गावकरी यांची पेसजीची बाकी होती तपसील छ ११ जिलकाद सन ११७१ (श. १६८३ ज्येष्ठ शुा १३ ता. १५-६-१७६१)

७०० त्रिंबक मल्हार दिा मल्हार दादाजी याची खतें ६ एकूण १४८४।

कल्याण सुभेदार

श. १६९४ माघ शु. १२
इ. १७७३ फेब्रु. ४

राजश्री आनंदराव राम उपनाम बिवलकर गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन गोसावी यांस

छ सेवक नारायण बल्लाळ प्रधान नमस्कार सुा सलास सबैन मया व अलफ शके १६९४ नंदननामसंवत्सरे तुम्हीं हुजूर कसबे पुणें येथील मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, आपले तीर्थरूप रामाजी माहादेव याणीं स्वामीशेवा येकनिष्टपणें बहुत दिवस केली; यास्तव स्वामीनी कृपाळू होऊन कुटुंबाचे योगक्षेमार्थ मौजे नांदिवडें तर्फ सैतवडे प्रांत राजापूर हा गांव देखील पेठ व बाग व मिठागर सुधा इनाम देऊन पत्रे करून दिल्ही. त्याप्रमाणें इनाम चालत आहे त्यास पेठ किल्ले जयगडाखालील मौजे मजकूरचे जमिनींत आहे याजकरितां इनामात आली यामुळे किल्ल्याची गैरसोय. सबब हाली इनामापैकी पेठ सरकारात किल्याकडे ठेऊन पेठेचे मोबदला मौजे उसाटणे[1] तर्फ तलोजे प्रांत कल्याण हा गांव स्वामींनी इनाम देऊन आलाहिदा पत्रे करून दिल्ही आहेत त्यास मौजे नांदिवडे येथील पेशजीचीं इनामपत्रें सरकारांत घेऊन खेरीज पेठ करून मौजे मजकूरची इनाम पत्रें स्वामींनी कृपाळू होऊन आपले नावे करून दिल्हीं पाहिजेत म्हणून. त्याजवरून मनास आणिता तुमचे तीर्थरूप याणी स्वामिशेवा एकनिष्ठपणें बहुत दिवस केली यास्तव कुटुंबाचे योगक्षेमार्थ मौजे मजकूर देखील पेठ व बाग व मिठागर सुधा गांव इनाम दिला त्यास पेठ किल्लया खालील मौजे मजकूरचे जमिनींत आहे याजकरितां इनामात दिल्ही यामुळें किल्लयाची गैरसोय सबब हाली इनामापैकीं सरकारात किल्लयाकडे ठेऊन पेठेचे मोबदला मौजे उसाटणें तर्फ तलोजे प्रांत कल्याण हा गांव इनाम देऊन आलाहिदा इनामपत्रें करून दिल्ही आहेत. त्यास

[1] उसाटण गांवचें उत्पन्न ९८०।=॥ होतें.

पेशजीचीं इनामपत्रें पेठ सुधां गांवची होतीं तीं माघारी सरकारांत घेऊन हालीं खेरीज पेठ करून मौजे नांदिवडे देखील बाग व मिठागर सुधा दरोबस्त कुलबाब कुलकानु हालीपट्टी व पेस्तरपट्टी खेरीज हक्कदार व इनामदार करून जलतरु-तृणकाष्ठपाषाणनिधिनिक्षेप सहित इनाम तुम्हास करार करून दिल्हा असे तरी मौजे मजकूर खेरीज पेठ करून सदरहू प्रमाणे तुम्ही आपले दुमाला करून घेऊन तुम्ही व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरेनें इनाम अनभऊन सुखरूप राहणे. जाणिजे छ ११ जिल्काद अज्ञाप्रमाण ( लेखन सिमा ) ( पत्रावर मुख्य प्रधान नारायणराव यांचा वाटोळा शिक्का आहे )

कल्याण सुभेदार } { श. १७०६ इ. १७८४

१० रु. जमा मसाला चिरनेर पो गुा विठोजी चव्हाण गणबाराव व मल्हार त्रिंबक साष्टीस हिशोबाकरतां आले होते ते न पुसता गेले सबब जमा पोता.

५ गणपतराव

५ मल्हार त्रिंबक

कमावीस जमा मद पाटील हजारी मौजे उसटणें ताा तळोजें मुंबईस जीनस बेलापूर पावेतों न्यावयाकरितां चार वेठे देणें म्हणून चिटी गेली असतां वेठे न दिल्हे साा ( रुपयांचा आंकडा फाटला आहे. )

कल्याण सुभेदार } { श. १७१८ ज्येष्ठ शु.६ इ. १७९६ जून ११

अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री लक्ष्मण राम गोसावी यांस-सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार सुा सबा तिसैन मया व अलफ-रामराव अनंत यांजकडे मौजे नांदिवडें ताा सेतवडे तालुके रत्नागिरी हा गांव दरोबस्त इनाम पेशजीपासून चालत आहे त्यास ते मृत्यु पावले सबब त्याचे पुत्र राा आनंदराव राम यांजकडे मौजे मजकूरचा दरोबस्त अंमल इनाम पेशजीप्रमाणें करार करून देऊन हे सनद तुम्हास सादर केली असे. तरी गांवचा अमल सुदामत चालत.आल्याप्रमाणें मारनिलेकडे चालवून आकार तालुके मजकूर येथील हिसेबी याचे नावे इनाम खर्च लिहीत जाणे जाणिजे छ ५ जिल्हेज आज्ञापना ( लेखन सीमा )

चिपळूणकर जमाखर्च } सरकारी कुरण श्री नक्कल { श. १७२२ चैत्र शु.२ इ. १८०० मार्च २७

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री माधवराव गणेश कादार पो सिनर गोसावी यास

सेवक बाजीराव रघुनाथ प्रधान नमस्कार सुा इहिदे मयातैन व अलफ राजश्री नारो दिनकर कारकून दिा खासगी निा नारो सिवराम याचे तीर्थरूप दिनकर धोंडदेव यास सन तीसा तिसेनात* गवत पावले आहे त्यास ते मृत्यु पावले. सा त्याचे पुत्र मारनिले यास पेशजी प्रो सालमजकुरी गवत पुले सर १५००० पंधरा हजार पुले देविले असत तरी पो मजकूरचे कुरणपो गाव-गनाचे बेगारी येऊन गवत कापितात त्यापो देणे जाणिजे. छ १ जिलकाद आज्ञा-प्रमाण मोर्तबा.

चिपळूणकर } दोन आण्याचें रोजासन { श. १७४२ श्रावण शु.१० इ. १८२० सप्टं. २

सरकार कंपनी ईसन बहादूर प्रांत खानदेश पो रायपूर महालांत

बनाम मामलतदार हाल व इस्तकबाल व देशमूख व देशपांडे पो रायपूर सुा ईहिदे अशरीन मया तैन व अलफ वेदमूर्ती राजश्री भास्करभट बिन महादेव भट ईा नारायणभट उपनाम भावे वास्तव्य वाई हाली वस्ती पुणे याणी विदित केले की आम्हास वर्षासन पो मारी सायरपौ दररोज ८= दोन आणे प्रो सालीना रु. ४४। सनद बाळाजी बाजीराव प्रधान याची होती त्याचा भोगवटा पाहून हाली मुकरर करून दिल्हे रु. ३५ पस्तीस रु. करार करून दिल्हे तरी सदरहू पसतीस रु. भटजी यास महाल-पोत्यातून देत जाणे या सनदेची प्रती लिहून देऊन अस्सल सनद भटजी यास भोगवटियास परतोन देणे जाणिजे तारीख २ माहे शपटंबर सन १८२० इसवी छ २३ माहे जिल्काद सन १२३० फसली मुा नंदूरबार सही इंग्रजी.

तुळशीबागवाले } { श. १६७३ इ. १७५१

(सरकारांतून वतनपत्रें वगैरे कागद करून घेण्यास बराच खर्च येत असे.)

१०० रु. पेठेच्या कागदाच्या दरबारखर्चास दिल्हे

४० ,, गंगाराम शेटया वतनपत्राच्या देणें कारकुनी ३० फडणीस,

*शक १५२० मध्यें.

५ बाजी चिटणीस, ५ महादाजीपंत गुरुजी. ( १६७३ )

तुळशीबागवाले } वतन { श. १६७८ पौष
इ. १७५६-५७

७५ सदाशिव बल्लाळ कुळकर्णी मौजे कोकमठाण मौजे मााचे पाटिलकीचें खरीदीखत करून घेतलें त्याजबाा दिल्हे धोंडो लक्ष्मण मिाा शुाा ९

५० किता
२५ सेल्या बाा
———
७५

तुळशीबागवाले } { श. १६७९
इ. १७५७

३४५ अंताजी अप्पाजी परखंदी येथील कुळकर्णाचे कागदाबाा. ३०० प्रतिनिधीकडे द्यावयास हस्ते आबाजी रामचन्द्र; ४५ कारकून वगैरे यांस द्यावयास ( १६७९ )

५५ परखंदीचे कुळकर्णाबाा वस्त्रें देणें प्रतिनिधि व एमाजीपंत आण्णा एकुण तिवटें २ व शेले २.

१ रु. इनाम देणें जासूद सरकार यास इंग्रज गेल्याची बातमी घेऊन आले त्यास शु. १२ चैत्र १७०३ ( इ. १७८१ एप्रील ६ )

कल्याण सुभेदार } श्री { श. १७०५ ज्येष्ठ शुाा १५
इ. १७८३ जून १५

अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य राजश्री महिपतराव कृष्ण गोसावी यांस-सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सुाा अर्बा समानीन मया व अलफ राजश्री रामराव अनंत याचे तीर्थरूप अनंदराव राम यांजकडे मौजे नादिवडे ताा सेतवडे तालुके रत्नागिरी बागा पेशजीपासून इनाम दरोबस्त चालत आहे. त्यांस अनंदराव राम मृत्यु पावले साा याचे नावे पेशजी प्राो करार करून हे सनद पत्र सादर केली असे तरी मौजे मजकूर बागा व मानिल्हेकडे इनाम चालवणें जाणिजे छ १४ रजब बहुत काय लिहिणें लेखन सीमा

तुळशीबागवाले } { श. १७०५ फाल्गुन
इ. १७८४ मार्च

८= इनामखर्च देणे कासीद कासीहून बाळाजी महादेव याजकडून कागद घेऊन आला त्यास

तुळशीबागवाले } **वास्तु-नियंत्रण** { श. १७२१ / इ. १७९९

१ देहनगी खर्च कोतवालचे माणसास, जुन्या वाड्यांतील सोपा रस्त्यावरील बांधावयास त्याबा

वैद्य } { श. १७३४-३५ / इ. १८१२-१३

रु. ३ देहेनगी खर्च

२ विा कचोपंत दादाकडील प्यादे पडवींची परवानगी सांगावयास आले सा

१ प्यादा विा गोखले मंडपाचे उत्तरेचा भिंतीचा खटला पडला सा परवानगी आणली त्यास.

खासगीवाले } **शेत व सैन्य पाहणी** {

१५ सेतांची पाहणी करण्याबा कारकून मिरजेहून आले त्यांस देहेनगी बा.

·।।· उंट नफर ४ सरकारांत छापण्याकरतां तासगांवास पाठविले त्यास वैरण देहेनगी सरकारचे माणसास

१ नवरंगराम चोपदार स्वाराची गणती झाल्यावर मिरजेचे मुकामीं.

तुळशीबागवाले } **सावनूरची स्वारी** { श. १६७९ / इ. १७५७

(ह्या स्वारीकरतां शेंकडा १।। रु. व्याजानें पेशव्यांस कर्ज काढावें लागलें होतें.)

११६।।। रु. व्याजखातें नांवे रा. पंतप्रधान सावनूरचे स्वारींतील मुद्दल रु. २४६६५।।। ह्या माघ वा १ श. १६७८ ता श्रावण शुा ६ श. १६७९ माहे ५८२० एकूण दर शे. १।। प्रो.

६० रु. मौजे येरवडें ताा हवेली जानोजी भोसले यांनीं मौजे मजकुरीं शेतें लुटून नेलीं त्या बा मजुरा देण्याचा करार रु. ९० पो पेसजी खर्च धरिलें रु. ३० बाकी (१६७९ अधिक).

तुळशीबागवाले } पोतदारी { श. १६८१ / इ. १७५९

खर्च

१७६३१ रु. मुधोजी भोसले जमा सदाशिव हरी पेसजी सदाशिव हरी यांनीं पोतदारींत सरकत केली चौथाईची त्याचे रसदे ऐवजीं मारनिल्हेस जामिनकी समयीं साठ हजार रुपये दिल्हे त्याची चौथाई मारनील्हेचे नांवें लिहिली होती त्याज-बा. ( १६८१ )

कल्याण सुभेदार } श्री { श. १६९१ आषाढ शु. ४ / इ. १७६९ जुलै ७

राज० (पृ. ५७ श. १६८२पहा.) विशेष राजश्री विसाजी केशव यांस हुजूर यावयाची आज्ञा जाहली त्यावरून ते हुजूर आले त्या प्रांतीचा बंदोबस्त असावा याकरितां त्याणी तुम्हास तेथे रहावयाविसी सांगितलें परंतु तुमचे निसबतीचे तालुक्याचे कमीजाजती निवडिलें आहे त्याच्या मखलाशा जाहल्या पाहिजेत त्यास जीं कलमें निवडिलीं आहेत त्याचे जाबसाल तुम्हाखेरीज कारकुनाच्यानें होणार नाहीं याकरितां हें पत्र सादर केलें असे तरी तुम्ही पत्रदर्शनी निघोन हुजूर येणें येत्येसमई दादो हरी व नारायण केशव दप्तरदार ताा साष्टी यांस व तालुके सुवर्णदुर्ग व नेरळ येथील दप्तरदार माहितगार यास बराबर घेऊन येणें हें पत्र पावतांच तुम्ही निघोन येणे व तालुक्याचे कारकुनास आपली माणसे निकडीने पाठवून आणवणे जाणिजे छ ३ रोवल सुा सबैन मया व अलफ बहुत काय लिहिणे हे विनंती

खाजगीवाले } सरकारांत स्वार चाकरीस लावले त्यांचा रोजमरा { श. १७१० / इ. १७८८

१०८९।= तासगांवचे ठाण्यांत स्वार १० चाकरीस आहेत त्याचा रोजमरा छ १३ सफर ताा छ २९ जिल्हेज अखेर सुाा माहे १०८१७ दरमाहा १५ प्रो एक माही रोजमरा १५० रु. प्रो आकार मुदल दराचे १५-९० वजा बट्टा सो ६। प्रो ९९।= बाकी नक्त मलकापुरी रु. १४९०॥=

कल्याण सुभेदार } { श. १७१२ / इ. १७९०

६१॥।- सन तिसां सबैनात दादासाहेबांचे गेरीमुळे फाजील ऐवज पावला

तो सरकारात कर्ज जमा धरले आहे तो ऐवज गावाकडे बाकी वोढत आहे सबब सरकार कल्याणाकडे खर्च लिा जमा

खाजगीवाले } { श. १७११ इ. १७८९

रु. १३५० पागेपो स्वार चाकरीस आा १० आहेत त्याच्या रोजमरेबाा दरमहा दर आा रु. १४८– नक्त प्रो रुपये १४०॥= एक माही प्रो बारमाही

१४०॥= सालगुाा पैकीं रोजमरा येणें तो हाली माहे सवाल

१२०९।= सालमारपैकीं इाा अवल सालताा आा साल मुाा माहे १२ दरमहा १४०॥= प्रो बारमाही रु. १६८७॥ पो पावती बाकी येणें रु. ४७८८= आदा चिकोडी.

१३५०

जमा रु.

३८४॥– स्वाराचे रोजमरे पो जमा दिाा नारायणजी तुपे स्वार १३

१६२ मलकापुरी

७० मल्हारशाई व फुलचेरी व पंचमेल वगैरे

११२॥– नाणेवार

९०॥– होन नाणें १९

२२ मोहोर नाणें १

११२॥–

३४४॥–

९१।= छ २ रमजान स्वार १५ इाा छ १८ रजब ताा छ ३० रोज १३ दरमहा दर स्वारी रु. १५ प्रो एकमाही २२५ पो तेरा रोजा सिरस्तेचे ९७॥ वजा मुदल दराचा बटा रुपये ९८ प्रो ६८= बाा बडोदी नक्त. ( श. १७१६ ).

२१०॥≡ छ. २० रमजान रोजमरा साबनचा इाा छ १ साबान ताा ३० छ एकमाही स्वार १५ दरमहा रु. १५ प्रो २२५ वजा मुदल दराचा बटा दर ८– प्रो १४८– बाकी बडोदी जमा.

गुाा आनंदराव घाटगे स्वार २ राजहंस घोडा १ व लक्ष्मी घोडी रास १

मिा झा पौष वाा ८ ताा चैत्र वाा ८ मुदत माहे ३ दरमहा रोजमरा दर ५० प्रो नक्त जमा छ २० रु. १५०

किरकोळ पागेपो जमा

८ रताजी जाधव आनंदराव घाटगे याजकडे चाकरीस ठेविला त्याचा रोजमुरा दरमहा रु. ४ प्रो त्यापैकीं जमा

१२॥≋। तासगांवचे ठाण्यांतील बारागिरास सरकारांतून कामगिरी आली त्याजबाा (१७२१)

८≋। भिलवडीस स्वार १ दाणावैरण १ रोज

७॥ पुण्यास कामगिरी स्वार २ दाणावैरण जातां येतां रोज ८

५ लष्करांत स्वार २ रोज ८६ दाणावैरण जातां येतांना.

२४।– सरकारांतून स्वारास कामगिरी आली सबब १९॥≋ कामगिरी हुबळी ४।= किरकोळ (१७२१)

१८॥–। सरकारांतून तासगांवचे बारगिरास कामगिरीस पाा त्यास

१ सरकारांतून बारगीर सावड्यांस कामगिरीस गेले होते तेथे गांवकरापासून घेतला (१७२१)

६५॥≋॥ परभारे गुाा सखाराम गोविंद हिसेब पागा

४४।≋ सरकारातून स्वारास कामगिरी आली त्याजबदल

२७॥।≋ चंदी उरली त्याजबदल

१६॥ रोजाबदल स्वाराचे

२१।·॥ लुटीपो जिनस विकला त्याजबदल

६५॥≋॥

४३७॥ परभारे जप्तीचे रोखे घेऊन स्वार गावगणा कामगिरीस गेले होते तेथें गांवकरापासून मसाला व कंबरखुलाई बाा पावले ते मिरजी मलकापुरी रुपये (श. १७२१)

१९४५।≋ स्वारांचे रोजमुऱ्यापैकीं जमा (श. १७२१)

कल्याण सुभेदार }

८०० रु. जमा इनाम गांव मौजे दिवील ताा बीरवाडी निाा प्रतिनिधी. मौजे मजकूरचा ऐवज प्रतापगडाकडे घेतला त्या ऐवजीं प्रतापगडची बरात प्राा साष्टीकडे येणें त्यापैकीं देविले ते जमा गुाा बऱ्याजी शिवराम.

१०० किले पुरंदरे देणे फिरंगोजी नरसाले सरनोबत किले पुरंदर लेकीचे लग्ना-बाा घरास गेले त्यास वरातेचा ऐवज देविला तो पावला नाहीं सबब पोता पो देविले ते ताा खंडोजी जाधव हुजुर बारगीर किले प्राा गुाा बापु जिवाजी वाा ४ ( तुळशीबागवाले )

३२७।= सन अर्बाचे अखेरीस ताा मुरबाड सेरे येथे सरकारचे भात व नागली कर्ज दिल्हे होते ते सरकारातून रदकर्जास लागले ( क. मु. )

६६ मौजे उसाटणे कर्ज देणे गावात नवी कुळे आली सबब ,,

१६२।। भरणा रद्दकर्ज सन इसने तालुके नेरळ नीळकंठराव रामचंद्र चासकर सिलेदार हुजूर पथक याची रोजमुऱ्याची नेमणूक तालुके साष्टीकडे आहे हुजूर रवानगी समयी सरसुभाहून तालुके नेरळाकडून बाकीचे ऐवजी गणेश कृष्ण पाटणकर याजकडून ऐवज देवविला तो ऐवज सरसुभ्याहून पत्र देऊन साष्टीकडून देवविला सबब साष्टी खात्याकडे खर्च लिहून जमा धरिले ( क. मु. )

२४०५ श्रीमंत राजश्री पंत प्रधान ताा चोण येथील कलमे रद्दकर्जाचे ऐवजी जमेस धरले होते सालमारी चोण महाल राजमाचीकडे जाला वगैरे. ( क. मु. )

तुळशीबागवाले } सावकारी व्यवहार { श. १६८० इ. १७५८

खर्च

२२५०० दमाजी गायकवाड मार्फत केशवभट कर्वे भरणा सरकारात माानिााचे गुजारतीनें झाला. त्यापैकीं पोत्यास.

२७५०० दमाजी गायकवाड समशेर बहादूर भरणा मार्फत केशवभट कर्वे. हुजूर पोत्यास दिले. दरमाहे दरशेंकडा १।। बिनसूट

३६४३।।।- जनकोजी शिंदे जमा कसरखतें. बाा पाा यावल. सरकारातून पर-गणा माानिााकडे दिला ते समई करार करून दिले होते. साल गुाा जमाखर्च जहाला नाहीं. सबब

---

जमा

६६५०० मुधोजी भोसले तुमचा ऐवज सन सबचे वाटणीचा वसूल रा. जानोजी भोसले याजकडे येणें त्यास दर्म्यान रा. पंतप्रधान त्या ऐवजाबद्दल

श्रीमंतांचे नांवें तुम्हीं वराता आम्हास लिहून दिल्या.

सदर्हु तुमच्या ऐवजीं श्रीमंतानीं चार लक्ष रुपये द्यावयाचा करार करून जानोजी भोसले यांजवर आपल्या वराता दिल्या. पुढें श्रीमंतानीं जानोजी भोसले याजकडून ऐवजाचा निकाल करून घेतला. तें समयीं हंसपुरीकडे चार लक्ष रुपयांची निशा करून घेतली. आणि गोसावी यांजवर सरकारच्या चिठ्या लिहून दिल्या ते तुमचे जमा मिा श्रावण शुा १३ शके १६८० चे मितीस हंसपुरी यांनीं औरंगाबादेस द्यावयाचा करार केला ते जमा.

३४९५० मुधोजी भोसले तुम्हांस श्रीमंतानीं चौलक्षांच्या सावकारांच्या खतावर उगवण्या घालून दिल्या त्यामध्यें दीड लक्षाचें खत नारो गोविंद यांचे नावें असे. त्या खतामध्यें आम्हास तुम्हीं देविले रुपये. हें खत कर्वे याजपाशीं असे. सबब आम्हांस त्यानीं पत्र लिहून दिलें. तें जमा धरून तुमचें नांवें केशवभट कर्वे बाा उगवणीचें खत मिा

श्रीमंतानीं सदर्हु चौलक्षाचे उगवणीचे खतांचे व्याज परभारें तुम्हांकडून देववावें; मुद्दल ऐवजाची निशा त्रिंबकजी राजे वगैरे याजपासून करून घेऊन श्रावण शुा १२ चे मितीनें एकोत्रा बिनसूट देण्याचा करार केला. सदर्हु प्रों कीर्दीस जमाखर्च केला. खतें सरकारांत घेतलीं ते रुपये तुमचे जमा; शके १६८० श्रावण शुा १२ नांवें केशवभट कर्वे मुा दीड लक्षांचा खतांत ऐवज आहे सबब लिहिला.

---

खर्च

१५२०६। नांवे राजश्री पंतप्रधान जमा व्याजखाते

१६६६६ मुधोजी भोसले सेना धुरंधर तुम्ही हिंदुस्तानात जातेसमई आमचे ऐवजीं सदाशीव हरी याजकडे रोख २५००० द्यावे म्हणून हवाला दिला. त्यास मानिाास रोख ऐवज देण्यास अनुकूल न पडलें. त्या उपरीं सदाशीव हरी याचे रवानगीस श्रीमंतानी जानोजी भोसले यांजवर चार लक्ष रुपयांच्या वराता सन सबचा तुमचा ऐवज देणें त्यापैकीं देविले त्या सदर्हु चौलक्षांच्या वराता मानिाानीं साठ रुपये रोख देऊन शंभराची वरात जानोजी भोसल्याकडे याप्राो श्रीमंतास चिठ्या देऊन त्याजपासून जानोजी भोसल्याकडे वराता देविल्या त्यास पंचवीस हजारांचें व्याज व हुंडणावळ व मनोती वगैरे शिरस्ताप्रों

करार केला. ते रुपये व्याजखातें जमा धरून नांवे लिा. सदाशीव हरी यांजकडे तुम्हीं पंचवीस हजार रुपये आम्हांस हिंदुस्तानास जाते समई देविले ते मितीपासून पंचवीस हजारांचे आजता श्रावण शुा १३ शके १६८० पों करार जहाले त्याचा जमाखर्च.

६४४॥ मुधोजी भोसले तुम्हीं श्रीमंतावर वराता दिल्या रुपये ६६५०० पों आमचे रोकडे येणे रुपये २५००० त्याची वरात वजा रुपये ४१६६६ बाकी रुपये २४८३४ यापैकीं राघोबा बाजी यांस वरात देविले रुपये ५००० बाकी रुपये १९८३४ सदहूस दरबारखर्च दरशेंकडा ३। प्रों श्रीमंतानीं वजा केला तो तुमचें नावें सबब वरात बरहुा ऐवज तुम्हास मजुरा देणें त्यास खर्च झाला तो नावें लिहून.

खर्च

५००० मुधोजी भोसले. तुम्हीं श्रीमंतावर वराता ६६५००च्या दिल्या त्यापैकीं राघो बाबाजी यास रुपये ५००० देण्याचा करार होता ते नांवे लिा जमा राघोबाबाजी बाा वरात.

६४३३८॥। हंसपुरी गोसावी. तुम्हांकडे हवाला. राजश्री पंतप्रधान याचा हाा जानोजी भोसले मिाा श्रावण शुा १३ शके १६८० रुपये आर्कटी औरंगाबादेस द्यावयाचा करार त्यापैकीं श्रीमंतांनी आम्हांस देविले बाा वरात मुधोजी भोसले रु. ६६५०० पैकीं दरबारखर्च दरशेंकडा ३। प्रों रुपये २१६१।· घेऊन तुम्हावर वराता दिल्या.

---

जमा

३०६२॥ व्याजखातें बाा चिठी रुपये १५००० सदाशिव हरी यास देविले होते. त्यापैकीं आमचा ऐवज रुपये ५०० याची वरात जानोजी भोसले याजवर श्रीमंताकडून कृष्णाजी नाईक दातार याचें नावें घेतली त्या ऐवजाची निशा हंसपुरीकडे श्रावण शुा १३ चे मितीनें निशा झाली. ऐन ऐवज रुपये ५००० व वरताळा १०० शंभराचे रोख साल द्यावे. या प्रों. ३३३३। एकूण ८३३३। यास वजा दरबार खर्च दरशेंकडा ३।· प्रों. रुपये २७०॥।· बाकी रुपये ८०६२॥ सदहु ऐवज नावें कृष्णाजी नाईक दातार. पौ जमा मुधोजी भोसले ५००० व व्याज ३०६२॥· नावें कृष्णाजी नाईक दातार.

१४३२९॥ व्याजखातें मुधोजी भोसले तुम्हांकडे आमचा ऐवज सरकारच्या चौलक्षांच्या उगवणीच्या खतापों नारो गोविंद याचें नांवें दीड-लक्षांचें खत आहे. त्या खतांत आमचा ऐवज रुपये ३४९५० येणें त्यास तें खत केशवभट कर्वे यांजवर दीडलक्षाचें आहे. त्यांनीं आम्हांस खतांत सदर्हु तुमचा ऐवज आहे म्हणून आपलें पत्र लिहून दिलें आहे; त्याचें व्याज इा पौष शुा १ शके १६७८ ताा श्रावण शुा १३ शके १६८० माहे धोंडा सुद्धा माहे २० रोज १३ दर शेंकडा २ रुपये प्राों रुपये १४३२९॥. एकंदर चौलक्षाचे उग-वणीच्या रुपयांचें व्याज तुम्हीं पटविणें प्रांत बंगाला येथील ऐवजी १६४००० केशवभट कर्वे यांचे नांवें वरात दिली. त्यास सदर्हु ऐवज उगवून देण्याविषयीं श्रीमंतानीं राजश्री दादासाो यांस पत्र दिलें. त्या ऐवजात आमचा ऐवज सदर्हुप्रमाणें आहे. तो नांवें पाटणें खातें. विाा केशवभट कर्वे.

१६२॥ राघोबाबाजी हाा मुधोजी भोसले यानीं श्रीमंतावर वरात दिली बीनसूट रुपये ६६५०० पैकीं रुपये ५००० द्यावयाचा करार केला. त्यास दर-शेंकडा ३। रु. प्राों श्रीमंतांनीं वजा केले तें नावें लिहून.

---

खर्च

११७८९॥। हंसपुरी गोसावी दिाा जानोजी भोसले. जमा कसरखातें. सरकारा-तून मुधोजी भोसले यांस जानोजी भोसले याजवर वराता चौलक्षांच्या दिल्या त्यास दरशेंकडा ३। प्रमाणें द्यावयाचा करार केला. त्यापैकीं वजा पावल्याची कसर कृष्णाजी नाईक दातार यास दिली. बाकी-तील रुपये १२००० जहाले त्यापैकी भिड्याच्या गुबस्तास दिले त्याची कसर वजा रुपये २१०। बाकीबद्दल वरात श्रीमंत राजश्री पंत प्रधान. छ ९ रजब सन सबा. मौजे सदर्हु ऐवज श्रावण शुा १३ औरंगाबादेस द्यावयाचा करार.

८०६२॥ कृष्णाजी केशव नाईक दातार पैठणी चिठ्ठी रुपये १५००० ची सदा-शीव हरी यांजकडे दिली. त्यापैकीं राघोबाबाजी यांजकडे रुपये १५०० व तुम्हांकडे रुपये २५०० एकूण रुपये १०००० दहा हजार बाकी रुपये ५००० हे तुम्हांकडे. याची वरात तुमचे नांवे असे. सदर ताा

शंभराचे वरातेचे साठ रोख द्यावे. एकूण ५००० चे हिशेबाप्रमाणें रुपये ८३३३।· यापैकीं दरबारखर्च दर शेंकडा ३। प्रों रुपये २७०॥। बाकी रुपये ८०६२॥। याची वरात हंसपुरीकडे श्रावण शुा १३ ची दिली. ते तुमचे नावे असे. गोसावी यांजकडील ऐवज येणें त्यास जड जोखीव आमचे खर्च लागेल तो मजुरा देऊं.

ऐवज येईल त्याप्रमाणें घेऊं.

५००० जमा मुधोजी भोसले.

३०६२॥· जमा व्याजखाते.

८०६२॥·

खर्च

१३५४२ व्याजखाते बाा वरात मुधोजी भोसले यांनीं श्रीमंतावर दिली. रुपये ६६५०० त्यास दरबार खर्च वजा रुपये २१६१।· पैकीं आमची वरात रुपये ४१६६६ याचे आम्हांकडे.

---

जमा

२५००० विठ्ठल कृष्ण, तुम्हीं आम्हीं मिळून दमाजी गायकवाड यांजकडे केशवभट कर्वे यांचे मार्फतीनें भरणा केला रुपये ७५०००. पैकीं रुपये आमचे ५००००. बाकी तुमचे जमा धरून गायकवाड याच्या भरण्यांत आम्हीं लिहून. परंतु ऐवज आला न आला तुमचा तुम्हांकडे व आमचा आम्हांकडे जो ऐवज उगवेल तो हिसेरशींत तुम्हीं आम्हीं घ्यावा. एकंदर रुपये ७५००० आमचे नांवें. केशवभटांचे मार्फतीनें दिले म्हणून जमा धरून गायकवाडाचे नांवे लिहून सदर्हू भरणा हुजूर पोत्यास.

---

खर्च

५०० शेख जुनदी. दिा तोफखाना मौकाशी मौजे बाा खत मिा शुा १२ व्याज दुहोत्रा गुा सदाशीव रोख.

१००० सभासिंग जमादार वस्ती पेडगांव दिा तोफखाना बाा खत मिा शुा ९ दुहोत्रा प्रों लिा अश्वीनमास. गुा सदाशीव मल्हार.

४००० अमदखान जमादार सोथेकर दिा तोफखाना. बाा खत अडचोत्रा प्राा गुा सदाशीव मल्हार. आश्वीन मासीं द्यावे. मिा वाा ५

६८६२॥ वल्लभ सुंदर मुरलीदास मा॥ रघुनाथदास दिली. सिक्का महमदशाही. जुने नाणें ४५० हस्तें गुमास्ता. दर माहे दरशेंकडा मोहोर ·॥· प्रों. व्याजाची बोली. मि॥ २ सदर्हु मोहोरास. दर मोहोरास १५। प्रों. पेस्तर मोहोरा द्यावयाचा करार आहे

---

जमा.

७६१२८॥· हंसपुरी महंत याजकडे श्रीमंतांनीं वरात दिली. ऐवज श्रावण शु॥ १३ आर्कट प्रती द्यावे. त्यास नागपुराहून मा॥नि॥नीं पिता-वरदास मथुसा यांनीं पत्र दिले. मि॥ श्रावण वा॥ ३ तो ऐवज औरंगाबोदहून पुण्यास आला. पावली मि॥ अश्वीन शु॥ १५ मार्फत भिमाजी दरबटे रोख मोहोरा ५१३५ व रोख रुपये ६।≥॥.

---

खर्च

२५००० शामराव आबाजी भरणा पोत्यास रसदेबा॥

५००० शामराव आबाजी. मि॥ शु॥ ५ जमा लक्ष्मण नाईक ताबेकर गमाजी यमाजी यांस देविले. ते दर शें. १। प्रों बा॥ पत्र.

२८५२५ केशवभट कर्वे हस्तें रघुनाथभट कर्वेः मोहोरा नाणें.

२२९०० दरसानी १६०० दर १४।—
५६२५ हली शिक्का औरंगाबाद नाणें
४०० दर मोहोरेस १४।—

२८५२५

१००० जनार्दन देव बा॥ खत देणें गोविंद नाईक दातार देवाजी यज्ञेश्वर दीक्षित चितळे यास देविले घराचा काशीतील कागद दीक्षितानी लिहून घेतला होता ते सोडविण्यास देविले ते दिक्षितांनीं दातारांस देविले. कागद सोड-वून आणिला. मि॥ वा॥ ५

८३०० लक्ष्मण नाईक तांबेकर. जमा निळकंठ महादेव. यांनीं संक्राजी केशव याजकडून देविले. त्यांनीं सखंभट कर्वे याजकडून त्यांनीं हैबतराव जाधव याजकडून देविले त्यांनीं एणें प्रों देविले

५०००१ राजश्री पंत प्रधान मुधोजी भोसले यांजला सरकारचे आज्ञेनें साव-कारांनीं दिले. भोसल्याकडून न येत तरी सरकारमधून द्यावेत. त्यास भोसल्याकडून ऐवज सावकारांस पावला नाही यास्तव सरकारातून

प्रकरण ७ वें

# सामाजिक व धार्मिक

सर्व हिंदुस्थानांत ब्राह्मणी राज्य त्या वेळीं पुण्यासच असल्यामुळें अखिल ब्रह्मवृंद पेशव्यांच्या आश्रयाची अपेक्षा करी ह्यांत आश्चर्य नाहीं. त्यामुळें सर्व हिंदुस्थानांतले ब्राह्मण पुण्यास लोटत. जगद्गुरु शंकराचार्य व द्रव्यैषणेला लाथाडून चतुर्थाश्रमांत शिरलेले संन्यासी द्रव्यार्जनार्थ पुण्यास येत हें खालील रकमांवरून दिसून येईल.

१५ रु. स्वामी मठ शृंगिरी यास मोहर १ स्वारींत दिली ती (श. १६७८ आश्वीन).

१८ रु. धोत्रजोडा श्रीशंकराचार्य
१५९ रु. धर्मादाय स्वामी शंकराचार्य } श. १६९९ ज्येष्ठ

१० रु. धर्मादायखातें विद्यारण्य भारथी संकराचार्य यांचे दर्शनास जातां } श. १७०६ आषाढ

५२॥। रु. धाा संन्यासी. श. १६८८ फाल्गुन

९ रु. वीणापरमहंस स्वामी. श. १६८६ चैत्र

५० रु. अद्वैतानंद स्वामी रोख. श. १६८३ आश्वीन.

५० रु. धर्मादायखातें मिति वाा ८ शुक्रवार (श. १७१३ ज्येष्ठ) देणें कोल्हापूरकर स्वामी यांस दर्शनास जातां.

५०० रु. धर्मादाय खातें देणें श्रीशंकराचार्य स्वामी संस्थान मठ शृंगेरी यांस हस्तें खुद तात्या मिाा वाा १ (ज्येष्ठ १७१५).

२ रु. धर्मादाय शंकराचार्य अद्वैत स्वामी यांस हस्तें खुद मिति ३ (१७२० वैशाख).

व्यवहार करणाऱ्या स्वामींत त्रिलोचनानंद स्वामी होते.

उदाहरणार्थ

३४० रु. जमा त्रिलोचनानंद स्वामी देणें स्वामीचे कर्जदार (श. १६८३ पौष)

२०० रु. नारो बाबाजी जमा धर्मादायखातें त्रिलोचनानंद स्वामीस द्यावयाविसी पत्र पा त्याजबा.

वेदांती, नैय्यायिक, मीमासक, ज्योतिषी, वैदिक वगैरे सर्व प्रकारचे विद्वान पुण्यास येत व त्यांची यथाशक्ति लोकांकडून संभावना होई. ह्यांत काशीच्या व मद्रास, म्हैसूरकडील विद्वानांचा भरणा विशेष असे. श. १७१० च्या श्रावण-मासांत ज्यांच्या नांवानें दक्षणा खर्ची पडली आहे त्यांचीं नांवें (१) राघवा-चार्य तर्कभूषण वेदांती, (२) कृष्णमाचार्य सुरापुरकर, (३) श्रीनिवासाचार्य (४) वेंकटनरसिंहाचार्य नैय्यायिक; (५) वेंकटरामशास्त्री मीमांसक : तसेच श. १७०८ व ०९ सालीं पट्टारामाचार्य कुंभकोजकर, आणि बरेलीचे तात्याचार्य नैय्यायिक, मया शंकरभट काशिकर इत्यादिकांच्या नांवें धर्मादायखातीं रकमा पडल्या आहेत. श. १७०६ सालीं काशीचे मथुराभट व उग्रदेव नागर ब्राह्मण ह्यास दक्षणा मिळाली आहे. श. १७०४ सालीं अय्याशास्त्री कुंभकोजकर यांस २५ रु. दक्षणा मिळाली आहे, तर पुढच्या सालीं विनायकभट कुंटे काशीकर जटापाठी यांची ४० रु. देऊन संभावना झाली आहे. ह्याशिवाय इछाराम मिश्र, वरदाचार्य कांचीकर मांत्रिक, प्रयागभट प्रभास्करभट द्वारका, नागो बल्लाळ चंदी-चदावरकर, धरणीधरभट काशीकर, नारायण दीक्षित श्रीरंगपट्टणकर इत्यादि पर-स्थाचीं नांवेंहि दक्षणादानांत आढळतात.

खुद्द पेशव्यांची श्रावणमासाची दक्षणा असे. ह्या महिन्यांत ठिकठिकाणचे ब्राह्मण पुण्यांत जमत. त्यांच्या बंदोबस्ताकरतां पुण्याबाहेरील सरकारी लोक मुद्दाम आणीत असत असें पुढें दिलेल्या रकमांच्या तपशिलावरून दिसून येईल.

३०० रु. — शुा ३ किले पुरंधर श्रावणमासचे दक्षणेच्या बंदोबस्तास लोक आले आहेत त्यांस खर्चास.

१०० रु. किल्ले पुरंदर गडकरी लोक रमण्यांतील ब्राह्मणांचे रखवाली-करतां आणविले त्यांस खर्चास (१७१० श्रावण शुा ४).

दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दीत हे दक्षणेचे रुपये लोकांकडून वसूल करीत असावेत. कारण :

२ रु. शुा ९ ( आषाढ श. १७२० ) प्यादे सरकार बापु लेले याजकडून श्रावणमासचे दक्षणेचे तगाद्यास आले त्यास देणे. बाळोजी गुणे व महादु पवार आा २ एकूण आठ रोजा पोटगीबाा.

परंतु हा प्रकार पूर्वी नव्हता.

१३००० रु. — नेवासे वगैरे महालचे रसदेचे ऐवजी सालमाारपो देणें हुजुर पोत्यास श्रावणमासच्या दक्षणेचा भरणा रु. २५००० पो ( श. १७०६ ).

·।।।·।। प्रात पुणें रमण्यांत कारकून गेले त्यांस फराळास पोहे केली ।· ( श. १७०९ श्रावण )

रमण्यांतून ब्राह्मण सुटले म्हणजे लोक त्यांस त्या दिवशीं भोजनास बोलावीत

·।· शुा ८ पोळयास बायको लाविली त्याबाा, ब्राह्मण सुटले त्या दिवशीं ( १७०९ श्रावण ).

एकंदरींत धर्मादाय फार होत असे. ब्राह्मणभोजनेंहि होत. उ. २६३३।-। रु. घरखर्च धर्मादाय संकल्पित पो भाद्रपद पोर्णिमे अलीकडील. १६८७.

५००० रु. श्रीपतराव बापूजी हुजूर पोत्यातून ब्राह्मणभोजनाबाा देवविले ते रोख जमा मिा शुा १३ ज्येष्ठ १६७४

६९८-।। ,, भोजनदक्षणा असामी ३५२६ ( १६९१ पौष ).

२०० रु. गणेश गोविंद राजवाडकर ब्राह्मणभोजनाकडील आचारी व खटपटे यांचे वाटणीस दिल्हे ते हल्लीं हस्ते अनाजी लक्ष्मण पुरंधरे नामे भिकारपट्टी सरकार पोत्यास दिल्हे. ( श. १७१५ वैशाख शु. ३ ).

४०० रु. जमा राघो बाबाजी पंढरपुरी सहस्रभोजन घालण्यास मारनीं कृष्णाजी नाईक दातार यांजकडून देवविले ते रोख आर्कटी मिा वाा १४ वैशाख १६७९.

१००० रु. धर्मादाय देणें नेवासें वैजापूर बाळकृष्णशास्त्री सरकारांतून पट्टीचे देविले. श. १६९०.

२०० रु. माधवराव निळकंठ जमा धर्मादाय. शेषाद्रीशास्त्री रु. २५०० पैकीं. श. १६९०.

३२०॥ रु. नारायणभट चितळे अग्निहोत्री श. १६८६.

१०० रु. कल्याणभट श्रीरंगपट्टणकर सरकारचे पट्टीबद्दल हस्ते निळकंठ महादेव.

शके १६८४ सालीं तर फाल्गुन महिन्यांत धर्मादाय खात्यांत ५९३९२॥≈॥ रु. बिनतपशील खर्च पडले आहेत. तुलादान करण्याचा प्रघातही होताच. श. १६९५ सालीं ११२४३८≈॥ तुलादानाबद्दल नांवे पडले आहेत. श्रीव्यंकटेशास ५००० रु. नवसाबद्दल अर्पण केले आहेत. (५००० रु. खर्च प्रांत पुणें नवस श्रीव्यंकटेशास देणें. श. १६९० ). भुतें, समंध वगैरेवर विश्वास असला तरी त्यांतहि व्यवहारदृष्टि जागृत होती. उ. ५० रुा त्रिंबक घोंडदेव इरदास यास, समधाचे बाधेच्या अनुष्ठानाबद्दल. समंध गेला तरी रुा मागूं नये. न गेला तरी सदरहु रुपये नागेशभट वांगीकर वस्ती पंढरपूर यांनीं द्यावें याप्राो वागीकर नीं कागद लिहून दिला आहे. पौष शुाा १२ श. १६८८ सालीं खालील रकमेंत पेशव्याच्या तुलादानाचा उल्लेख असावा.

१० रु. निळकंठ महादेव तुळापुरीं तुळादान झालें त्या वेळीं कर्णेकरी वाजविण्यास होते त्यास वाटेनें स्वारी पुण्यास येऊं लागली ते वेळीं कर्णेकरी यांस वाटेसच दिल्हे.

पर्जन्याकरतां अनुष्ठानाचे प्रसंग श. १६७७, -७९, १७०९ व -१४ ह्या सालीं आले होते.

२१० रु. पर्जन्यानिमित्य अनुष्ठानाबाा देणें जनार्दन देव (श. १६७७ कार्तिक ).

३५० रु. जनार्दन देव पर्जन्याचे अनुष्ठानाबाा (१६७९ आश्वीन ).

।· प्रजन्याबद्दल श्रीत्रिंबकेश्वरास अभिषेक (१७०९ आषाढ ).

३८– शुाा ५ श्रीत्रिंबकेश्वरास लघुरुद्र पर्जन्याकरतां करविला त्याजबाा श. १७१४ आश्वीन

४४ श्रीत्रिंबकेश्वरास अभिषेक अकरा रोज सतत धारा पर्जन्याकरतां करविला त्याची दक्षणा श. १७१४ कार्तिक.

पर्जन्येतर अनुष्ठानांतहि पैसे कमी खर्च होत नव्हते.

५०० रु. गोविंद भगवंत दिाा हरि बल्लाळ फडके सिद्धटेकचे अनुष्ठानाबाा शुाा ६ चैत्र १७०५.

२२९ रु. सदाशिव बल्लाळ खार्ते श्रीत्र्िंबकेश्वरास प्रदक्षिणेचें अनुष्ठान करविलें त्याचा हिसेब आलाहिदा १६७८ मार्गशीर्ष.

८८॥· महामारीचे अनुष्ठानाबद्दल देवास श. १७०७ आश्वीन.

क्षेत्रस्थ ब्राह्मण कावडी आणून आपआपल्या यजमानांकडून बरीच दक्षणा मिळवीत.

१५६५ रु. श्रीस कावडी रवाना केल्याबा. येसाजी गणेश पुरंधरे मा। सदाशिव व बयाजी गु॥ इछाराम भुयाव कावडी २४ ए॥

४८० कावडी २४ दर २० प्रो काशीहून पुणे.

९६० पुण्याहून रामेश्वरास २४ दर ४० प्रो.

७५ नेमणूक येसाजी गणेश कारकून रु. १५० प्रो निमे आबा मुजुमदार.

५० पुण्याच्या साहित्यास ४० शंकरभट शेंडे

१५६५ दक्षणा १०.

( श. १६७९ फाल्गुन )

१५ कावडगंगोदक १६८६ चैत्र

३५ वा। १४ ( फाल्गुन १७०१ ) इंद्रमण बीजेराम भट पुरोहित याणी हरिद्वाराहून गंगोदकाच्या कावडी पा। सु॥ ७

मुसलमान राजांपासून ब्राह्मणास उपद्रव पोंचला म्हणजे अर्थातच ते साहाय्याच्या अपेक्षेनें पुण्यास येत.

चैत्र वा। ३० शके १७०७

२५ रु. ब्राह्मण तुळजेन्द्रपूरनजीक क्षेत्र कुंभकोन आ।

१ अनंतभट दीक्षित

१ सुभाभट ,,

१ सुभाशास्त्री

१ वेंकटराभ

१ शेषावधानी

१ रामावधानी

३९०७।≈ गोप्रदाने ३९

३१८– गोप्रदानें ४ धर्मादाय

९३९॥≈ गोशताकडे गोदानें ३

८५॥– वृषभमूर्ति सुवर्णाची व अलंकार वस्त्रें

१७०॥≈ वृषभप्रत्यक्ष अलंकार वस्त्रेंदक्षणासहित देणें आचार्य वगैरे-

ह्याप्रमाणें गोशतदानासाठीं जवळजवळ दहा हजार रुपये खर्ची पडले आहेत.

ग्रहणांत प्रत्यक्ष गोदान, श्राद्ध व इतर धर्म, शंकरावर आंब्याच्या रसाचे अभिषेक, स्मार्ताग्निसेवा, सूर्यनारायणादि व्रतें वगैरे धर्मकृत्यें सतत चालू असत. स्वतः करण्यासारखें नसल्यास ब्राह्मणांकडूनही उपवासादि कर्मे करीत. उ.

५ रु. मोरभट बोडस श्रीरामचन्द्रजीस प्रदक्षणा १०००० एा श. १७०९ श्रावण.

१ रु. मोरभट बोडस याणी अशौच्यांत यजमानाचा प्रदोष केला सबब दक्षणा : श. १७१० श्रावण.

१२ रु. जमा सुदामा शिंपी पौर्णिमेस गाय दानास घेऊन सरकारांत दिल्ही सौ. गोपिकाबाईकडे. श. १६७३ कार्तिक.

श. १७०९ सालीं श्रावण महिन्यांत ४॥।= रु. हस्तें तात्या, " पळी-पतनाबद्दल होम केला त्यास " ह्या तपशीलानें खर्च पडले आहेत. पळी पतन म्हणजे. पल्लीपतन-पाल अंगावर पडली तर शांत करावी लागते. त्याच्या आदल्या वर्षी भाद्रपद शुा १२ स देवाजवळ केदारसहस्रनाम वाचण्याची दक्षणा म्हणून १ रु. नांवें पडला आहे. क्लेशपरिहारार्थ म्हशीदानाची वहिवाट फार होती. तसेंच ज्योतिषावर विश्वास असल्यामुळें, राशीला, सप्तग्रही, पंचग्रही अगर एखादा अनिष्ट ग्रह आल्यास दानें केल्यावांचून लोक राहात नसत.

पत्रिकापूजन, पत्रिकाश्रवण वगैरे यथासांग होई. उ.

५० रु. मि. वाा ९ (ज्येष्ठ श. १७१९) रविवार देणे भगवंत जोशी तासगांवकर जन्मपात्रिकेबद्दल.

४८–॥रु. धर्मादाय वाा ३ चिरंजीव नानाची पत्रिका जन्माची नवी केली तिचे पूजनसमयीं दक्षणा होन नाणें १.

२५ रु. कापडखात्यापो देणें भगवंत जोशी तिसगांवकर चिरंजीव नानाची जन्मपत्रिका श्रवण समास साा सनगें.

सर्वांत मोठा खर्च म्हणजे उत्तर कार्याचा होय. शके १६९६ च्या फाल्गुनात ३१५२१। रु. धर्मादायखातीं पडले आहेत. त्यांत २०८५६।।।- उत्तरकार्याकरतां आहेत. ह्या उत्तरकार्यानिमित्त २५०० रुपयांचा हत्ती दानाकरतां सरकारांतून बक्षिस मिळाला होता.

२५०० रु. घरखर्चाकडील जमा उत्तरकार्यास हत्ती सरकारांतून दानाबद्दल बक्षीस दिल्हा त्याची किंमत.

पुढें श. १७०९ सालीं २४३१।।।≶ रु. "मातुश्रीबाई यांचा काळ भाद्रपद वा। ७ मंगळवारीं झाला त्यास उत्तरकार्याबद्दल वगैरे" ह्या सदराखालीं खर्ची पडले आहेत. ह्याच्यापूर्वी श. १६९९ मध्यें "उत्तरकार्य तीर्थरूप बाबा मु।। पंढरपूर" म्हणून २३६१।- रुपये घरखर्चांत आढळतात.

घोडीची पांचवी, कुमारीपूजन, केळीव्रत दक्षिणाभिमुख केळ व्यायल्यास शांति इत्यादिकांत खर्च करीत. त्याप्रमाणें गुणी जनांना उत्तेजन देण्यांतहि लोक पैसा खर्च करीत असत. स्त्रीहरदास व बालहरदास त्या कालींही होते ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. उ. ५ रु. देणें बच्याबाई गोसावीण चापळकर यानी कीर्तन केलें त्याची बिदागी १७०२ भाद्रपद. तसेंच ५ रु. जिऊबाई कथेकरीण १६८८ श्रावण. ४।।। रु. मार्गशीर्ष वा। १४ श. १७११ गंगाधर गोसावी शेवगांवकर उमर वर्षे १४ यानें वा। ११ स कीर्तन केलें त्याचे बिदागी पुतळी बा। रोख.

कीर्तनाला कधीं कधीं श्रीमंतांची स्वारीही हजर असे.

४ रु. वा। १४ ( फाल्गुन १७१८ ) देणें गिरधर गोसावी विज्यापुरकर कीर्तन फाल्गुन वा। ११ बिदागीबद्दल देणें ते हस्तें खुद्द गोसावी मा।र खेरीज श्रीमंत स्वारी आली तेव्हां कीर्तनसमयीं श्रीमंतांनीं देविले रुपये ५.

पुराणवाचन नित्यशः घरीं असेच पण मुलांना रामायण वगैरे वाचून दाखविण्याचीहि व्यवस्था करीत.

६ रु. घरखर्च धर्मादाय सदाशिवभट पुराणिक सांप्रत तात्यापाशीं रामायण सांगतात त्याजकडे जळाऊ लांकडें खंडी १. श. १७११.

२२० रु. सदाशिव बल्लाळ देणें शंकरभट पटवर्धन पुराणीक भागवतसमाप्तीस दक्षणा मार्गशीर्ष वा। १२ श. १६७४.

१८-। रु. धर्मादाय कपिलाषष्ठीस औषधी अंगास लावावयास

| | | |
|---|---|---|
| ८– | देवदार | ८८८२ |
| ८॥· | ज्येष्ठमध | ८८८१ |
| ८– | मनीसीळ | ८८८१ |
| ८॥· | पत्री | ८८८१ |
| ८–।॥ | वेलदोडे | ८८८१ |
| ८॥· | वाळा | ८८८२ |
| ·।॥· | केशर | ८८८१ |
| १८–। | | |

पालाशविधि हल्लीं लोकांच्या स्मरणांतूनहि गेला असेल.

२ रु. देणें वेणुबाई वाळिंबे हल्लीं वस्ती बोरखळ, भ्रताराचा ठिकाण लागला नाहीं सा पालाशविधि करणें याजकरतां.

·।· धर्मादाय हस्ते मातुश्रीबाई अष्टमासिद्धीस, श्रावण १७०३.

·।– शुा १४ श्रावण अष्टमानिधीनवमानिधीस सालगुा प्रो धर्मादायखातें ( १७०४ ).

·।· शुा ८ अष्टमानिधिनवमानिधीस दक्षणा दर ८३ प्रो. ( १७०२ श्रावण ).

श. १६९७ सालीं २००० रु. हत्तीदानाचे व्यंकटभटाच्या नांवानें जमा आहेत.

ब्राह्मणांस शीतनिवारणार्थ आंगरखे, स्नानसंध्येकरतां आसनें, रुद्राक्षमाळा, कोहळे इत्यादि पदार्थांच्या दानांचा उल्लेख जमाखर्चांत आहे. तेव्हां गोशतदान नसणें संभवनीयच नाहीं.

तुळशीबागवाले } { श. १६८५ / स. १७६३

शक १६८५

| | |
|---|---|
| २०७८= | गोशतदानें पैकीं गोप्रदानें २ एा |
| २९९।॥≡ | गोशताकडील गोप्रदानें ३ एा |
| ३५९८।– | गोप्रदानें ३५ |
| ८५०८– | गोप्रदानें गोशतांतर्गत गोदानें |

कल्याणसुभेदार } { श. १६९४ इ. १७७२

ह्यांनीं ठिकठिकाणीं देवळें बांधलीं. मठ येथील गणपतीचें देवालय त्यांनींच बांधिलें. देवाची स्थापना श. १६९४ चैत्र शुा ५ मध्यें झाली. स्थापनेस १५८ रु. १५ आणे खर्च आला. तुपगांवचे धान्येश्वरचें देऊळ, कल्याणचे रामेश्वराचें वोंकारेश्वराचें वगैरे आणखी देवळें बांधलीं. रामेश्वराच्या देवालयाचा मुहूर्तखांब चैत्र श. १६९२ शुा १ मध्यें उभा केला. ह्यांनीं गोशतें दिलीं, लक्ष भोजनें घातलीं. गुळसुंद्याच्या सिद्धेश्वरावर ह्यांचा दरमहा महारुद्र होत असे.

खाजगीवाले } { श. १६९४ ते ९६

लक्षभोजनानिमित्त श. १६९४–९५ आणि श. १६९५–९६ ह्या दोन सालीं अनुक्रमें ११५३६।≤। रु. व २५४६॥–॥ रु. खर्च पडले आहेत.

कल्याणसुभेदार } { श. १६९५-१७०६ इ. १७७३ १७८४

रु. २ धर्मादाव मिा शु ७ सुभेदार मुहुर्ते आवेडकराचे घरीं जाते-समयीं ब्राह्मणास दिले.

२५ हनुमंत-प्रदक्षणा एक लक्ष आबा भट दर ·|· प्राो.

८॥≤ धर्मादाव मातुश्रीबाईस समाधान वाटत नाहीं साा बैल दान दिल्हा.

२॥ रावजी रात्रीस प्रस्थानीं आवडेकराचे घरीं गेले ते समयीं ब्राह्म-णांस नवमीस मध्यरात्रीस दक्षिणा दिली पुण्यास जातांना ( श. १६९५ भाद्रपद ).

·||· निाा मैनाबाई बुधाष्टमीचे उद्यापनास.

२५ खाशांचे राशीस ग्रह वाईट आले सबब नवग्रहजप केला सुाा १००००० एक लक्ष.

·||· बापू जोशी दिपवाळीचें पंचाग श्रवण केलें साा

८॥। बाजेखर्च खाशांची स्वारी पुणियासी जाऊं लागली साा सेंदूर जरीमरीस व हणमंतास ( श. १७०६ ज्येष्ठ ).

४२॥। खासगत पत्रिका करून श्रवण केली ते समयीं देणें भीकं जोसी पनवेलकर.

२॥ तिसरे खणी मोहळाच्या माशा बसल्या त्याची शांत केली त्यास.

तुळशीबागवाले } { श. १७०२ इ. १७८०

३०० रु. धर्मादायखातें दुष्टग्रहशांत्यर्थ जपाचे श. १७०२ पौष.

तुळशीबागवाले } जेजुरी येथील श्रीमार्तंडाची मूर्ति. { श. १७०५ इ. १७८३

७०० प्रांत पुणे दुल्लभसेट गोविंदजी श्रीमार्तंड जेजुरी येथील मूर्तीबा. जमा किल्ले पुरंधर वगैरे ( १७०५ ).

कल्याणसुभेदार } { श. १७०५ इ. १७८३

आनंदरावाची मुंज श. १६८७ मध्यें ठाण्यास झाली. खर्च ५७४।-॥ झाला. लग्न १६८९ च्या मार्गशीर्षांत पुणें मुक्कामीं झालें. सोयरे गंगाधरपंत गोळे- आनंदराव श. १७०५ च्या मार्गशीर्ष महिन्यात मरण पावला (शुा ६ सोमवार). तेरा दिवसपर्यंत रु. १४२९।=। खर्च केला. मार्गशीर्षांत ह्याच्या आजारीपणांत धार्मिक उपचार अनेक केले त्यांपैकीं विशेष म्हणजे १२ रु. खासे यास समा- धान नाहीं. सा नमस्कार घालविले १२००० एकूण. २९॥≈॥ म्हैसदान.

कल्याण सुभेदार } { श. १७०६ इ. १७८४

ह्याच्या वर्षश्राद्धास फक्त रु. ५६६८=॥ खर्च पडले आहेत.

१। नवीन खासे ( रामराव आनंद कल्याण सुभेदार ) चैत्र शुा १३ च्या दिवशीं " नव घटका रात्रीं सुमुहूर्ते वाड्यांत आले तेव्हां ब्राह्मणांस दक्षिणा ( रु. १। ) वाटली. "

तुळशीबागवाले } { श. १७१० इ. १७८८

धर्मादाय जानकीबाईप्रीत्यर्थ

२८॥ शुा १३ सौ. जानकीस आरोग्यप्रीत्यर्थ अनुष्ठानाचे ब्राह्मणास दक्षणा ह्या ज्येष्ठ शुा १३ ता। आषाढ शुा १३ पावेतों.

३० वा १० देणे जानकीस आरोग्यप्रीत्यर्थ भावबंडयास हनुमंतास प्रदक्षणेस ब्राह्मण लाविले त्यांस दक्षणा एकमाही

श्रावणमास

३०। शुा सौ. जानकीचे आरोग्य प्रीत्यर्थ श्रीसिद्धेश्वरास महारुद्र केला त्याची दक्षणा देणे गुा मोरभट दर ।· प्रो.

४४८≡ शुा ६ सौ. जानकीचे आरोग्यप्रीत्यर्थ गोप्रदान व क्लेशदानें

९९॥≡॥ सौ. जानकीचे प्रीत्यर्थ महिशीदान देणे.

भाद्रपदमास

मिती शुा ११

८३॥ सौ. जानकीचे आरोग्य प्रीतेर्थ भांबवड्यास अनुष्ठानास ब्राह्मण लाविले त्यास दक्षणा.

७ सौ. जानकीबाईचे आरोग्यतेबा अपामार्जन अनुष्ठान माहे १ त्याची दक्षणा. १७०९ कार्तिक

२७८≡ राहुनिमित्य होम केला त्या बा हस्ते तात्या. पुढें ही बाई मेली

श्रावणमास

१३३१॥≡॥ उत्तर कार्य सौ. जानकीचेबा याद एकंदर बा हिसेब आलाहिदा

२९४।·॥ श्रावण शुा ८ शनवारी काल जाला ते दिवसी

३॥। सेला आंगावर

२६२८– दहन समइ आंगावर दागिने होते त्याची किंमत

वैशाख मास

नावे

४९॥ वा १३ हस्ते सौ. जानकी आरोग्य प्रीतेर्थ

२५ आश्वथास प्रदक्षणा संख्या १००००० दर हजारी ।· प्रों

१२॥ रामभट रानडे ५००००

१२॥ वासुदेवभट जोसी ५००००

२५

११ हनुमतास प्रदक्षणा ११००० दर १ प्रों देणे

५ गुरूचा जप संख्या २०००० दर ।· प्रो देणे चिंतामण जोसी

·।।· श्रीमंतांच्या भेटीस जातांना घरच्या देवापुढें (पुणें श. १७११) ( खा ) श. १७११

·।· दसराखर्च गाडीपूजन श. १७११

वैद्य } { श. १७१३ इ. १७९१

१०० रु. सदाशिवभट पुराणिक. खासगताजवळ पुराण सांगतात त्यास श्रावण १७१३.

शके १७२० आषाढ

१।।।·।।· दशाफलव्रत आकाबाईनें व लक्ष्मीबाईनें केलें.

वैद्य } { श. १७२० इ. १७९८

·।।· रुपें व्रतास जोडवी व बिरवल्या गुा बाळंभट माटे.

·।।।· कलश तबकडी तांब्याची ८८। शेरी प्रो.

·।= काशाची वाटी १

·।।· कापड व्रतास व ( फाटलेलें आहे )

·।= खण नागपुरी १

८= वस्त्र व्रतास पंचा

२।।= एकूण

बाईचे रा. वैद्य याचे ताळेबंद शके १७२० ते २३

( गेल्याच्या गेल्या पिढींतील स्त्रीपुरुषांना पुराणश्रवणाचा नाद असे ही गोष्ट स्पष्टपणें कळण्यासारखी आहे व या गोष्टीचा पुरावा या ताळेबंदांतहि दिसून येतो. )

धर्मादाय —

रु. २६ मोक्षधर्म पुराणसमाप्तीबद्दल. श. १७२० आषाढ.

रु. ३ बृहन्नारदी समाप्ती समयीं. ।।·।।।· भूयसी श. १७२३ माघ.

५० पुराणीक जनार्दन भट गाडगीळ सालमजकूर सरसाल तेवज रुपये २०० पो ज्येष्ठमासीं पावती रुपये १५० बाकी हल्लीं देणें. शके १७७२

१।।।=।।· भोजनदक्षिणा पुराणसमाप्तीबा। भोजन केलें सबब.

१५० पुराण भागवत समाप्त दशमस्कंध जाहले ते समयीं व्यासपूजेस दक्षिणा.

या शिक्षणात्मक धर्मादायाव्यतिरिक्त शास्त्रकारांनीं विहित मानलेला नित्य-नैमित्तिक धर्मादाय पूर्वींची मंडळी नियमानें करीत असत. उ.

१ खरेदी वाटाणे ब्राह्मणास द्यावयास

८≋॥· अर्घ्यप्रदान रोज १२ ८८३ प्रमाणें.

२० खरेदी सोनें व्यतीपाताबा व मोडतोडीबा ब्राह्मणास द्यावयास.

·।≋ कांबळे पटे १. सौ. येथाबाईकरिता क्लेशदानें केलीं त्यास घेतलें होतें.

३ बक्षीस खर्च. देणें म्हालोजी काकड तिगस्ता गाय मेली तिच्या गळ्यास दावें होतें सबब प्रायश्चितास ३ रुपये दिले होते ते बा मुा खर्च लिहिले होते. ते हल्लीं बक्षीस देवविले सबब खर्च परवानगी आकाबाई रुपये चांदवड.

केशवपनाचा विधि कसा असे हें खालील उदाहरणावरून दिसून येईल.

१३॥≋॥· धर्मदाय राधाबाईचे केशवपनाबा.

३।·।· होमाचे ब्राह्मणास.
१॥· प्रायश्चितें.
६ गाईस दक्षिणा.
३८≋॥· श्राद्धाकडे दक्षिणा.
१३॥≋॥·

२।· राधाबाईचे केशवपनाकडे व्रतास.

·।= पंचा १
१॥· पातळ १
८= खण १
२।·

१ मणीमंगलसूत्र वजन ५ गुंजा दर १९॥ प्रो.

·॥· रुपें जोडवी विरुद्या

२ न्हावी राधाबाईचे केशवपनाबा.

३॥≡॥। खरेदी जिनस राधाबाईचें केशवपन केलें सा। गु॥ लक्ष्मण जासूद तपशील

| | |
|---|---|
| ०= | नारळ सुमार १ |
| ०= | फणी करंडे लाकडी. |
| ०– | ... ... ... |
| ०– | त्रिपुराकरितां. |
| ०–।· | बुरूडकाम. |
| ०=॥· | तीळ मराठे होमास कैली ००२ |
| १ | सुवर्ण व्रतास बाळंभट माटे मणीमंगळसूत्र प्रतिमा मिळोन. वजन पांच गुंजा दर माशास १॥=प्रो. |
| ·॥· | रुपें व्रतास जोडवी व विरवल्या गु॥ बाळंभट माटे. |
| ·।॥· | कलश तबकडी तांब्याची ००।९। शेरी प्रों. |
| ·।= | काशाची वाटी १ |
| ·॥· | कापड व्रतास व ( फाटलेलें आहे ) |
| | ·।= खण नागपुरी. |
| | ०= वस्त्र व्रतास पंचा. |
| | ·॥· |

३।≡॥·

१४॥=॥· धर्मादाय ब्राह्मणास राधाबाईचें केशवपन केलें सा.

धर्मभोळेपणाचीं आणखीं, पण निराळीं, उदाहरणें—

| | |
|---|---|
| ०= | मजुरी सोनार शिशाचें यंत्र बयाबाईचे मुलास करविलें. |
| ०≡ | शिसें बयाबाईचे दुखण्याबा॥ यंत्र करावयास. |
| ·।॥·॥ | मांस बकऱ्याचें सौ. बयाबाईचे दुखण्यांत ओवाळून टाकावयास. |
| ·॥· | दारूपाणी सौ. बयाबाईचे वरून ओवाळून टाकावयास |

वैद्य } } श. १७३४-३५ इ. १८१२-१३

जलसमाधि, सती जाणें, इत्यादि गोष्टी अपवादात्मक रीतीनें अगर वारंवार घडून येत असत हें समजण्यास खालील रकमांचा उपयोग होईल.

रु. १० परशरामपंत चक्रदेव यांची स्त्री सहगमन गेली त्यास मार्गशीर्ष शुा ११ श. १७३४।३५

।· धर्मादाय स्वामी जलसमाध घेणार ते दिवशीं प्रसाद वांटावयास मिठाई
गुा गोपाळभट ८= पेढे ८= बत्तासे (श. १७४३).

चिपळोणकर } { श. १७४५-४६
इ. १८२१-२३

(२) श्रीविष्णुमंदीर रामेश्वर देवालयाचे दक्षिणेकडील जाग्यांत नवी इमारत बांधून देवाची स्थापना केली त्याबद्दल खर्च कारखानेवार पौष शुा १३ श. १७४३ ते १७४५ माघ अखेर. ह्या कामाला एकंदर २४९६।=। रु. खर्च आला. बऱ्याच ठिकाणीं फाटल्यामुळें सबंध मजकूर कळण्यासारखा नाहीं.

खाजगीवाले } { श. १७४५
इ. १८२३

रु. ४५० अनुष्ठानास खर्च विा रामभट घायाळ

३०० खुद रामभट
७५ रामचंद्रभट देवधर
७५ रामचंद्रभट प्रक्षणे
———
४५०

चिपळोणकर } { श. १७५६
इ. १८३५

शके १७५६ सालीं पौष शुा ८ ला बुधअष्टमीव्रत केल्याचा खर्च पडला आहे.

घातचंद्रावर मुंबईस प्रयाण केल्यामुळें तांदूळ दान व वर ८४ दक्षणा खर्च पडली आहे. तसेंच प्रयाणसमयीं रोगपंचक असल्यामुळें रौप्यदान केलें आहे.

किरता } { श. १७६९
इ. १८४७

खर्च कणीक ८।।= रात्रौ अतिशूद्र यास जेवण घातलें त्यास (चिपळोणकराची मुलगी सिन्नर येथें दिली तिचे लग्नांत)

धोंडो अनंत पटवर्धन यास काळ्या पाण्याची सजा झाली. तेव्हां पुण्यांतील सर्व ब्राह्मणानी सरकारांत अर्ज केला की ब्राह्मण काळ्या पाण्यावर गेला असतां चांडालादिकांचा निषिद्ध संसर्ग झाला असतां पुन्हा ब्राह्मणांत येण्याचा उपाय नाहीं याप्रमाणें पराशरादिकांच्या अनेक स्मृती आहेत— त्यापेक्षां राजाचे धर्म राजास आम्ही सांगावे ते न सांगितल्यास आमच्याही धर्माची हानी आहे. अपराध्यास शासन करणें ते तो आपल्या जातीतून नष्ट न होय असे पाहून करणें ते करावे ( सुा तीसा अस्रीन मया अलफ तैन असावें ). श. १७५०

वेदोक्त

कल्याण व पेण व पनवेल वगैरे प्रातात बाळशास्त्री टकले याणी परभु कायस्थ यांजकडे वेदोक्त कर्म करावयाचा पाठ घातला त्याजवरून बाळशास्त्री इकडे प्रांतांत अपंक्त ठेवले आहेत असें असता मोहोपाडचे राजश्री गोविंदपंत पलनीटकर व राजश्री नारोपंत भिडे त्यास मतांत मिळोन बखेडे करीतात. येविशीचा मजकूर सविस्तर राजश्री बाळाजीपंत दादा नातू मुंबईस आले होते ते समयी पनवेलीस राजश्री हरी पुरुषोत्तम बापट व राजश्री बाबाजीपंत बर्वे याणी दादांस कळविला आहे. त्याजवरून त्याचेही मनात ब्रह्मकर्माचा अभिमान येऊन येथे दादा याणी सांगितलें की आम्ही पुणियास गेल्यानंतर पलनीटकर तेथे आहेत व रामराव भिडे मोहोपाडकर तेथे आहेत त्यास तेथेच समक्ष सांगून बखेडे न करीत असा बंदोबस्त करीतों.

नित्सुरे यांचें चिपळोणकरांस पत्र. श्रावण शुा ९.

एका बाईनें द्वारकेची यात्रा केली त्याबद्दल ५१६२॥।· रु. खर्च पडले आहेत. त्यापैकीं कांहीं तपशील येणें प्रो.

३८≈ प्रभास क्षेत्रीं कर स्नानाचा

७०॥· कर स्नानाचा ब्राम्हण आा.

२२॥ श्री द्वार्केंत गोमतीचे स्नानाचा दर ११।

२८॥। बेटांतील राज्याचा दर माणसास १४।

तुळशीबागवाले. } श. १६७२ स. १७५०

३ पुस्तक पंचरत्नाचें १ गुा गुजराथी ब्राह्मण

२॥। खरेदी गीतेचें पुस्तक १ ( १६७२ )

५।। रु. बाळंभट पाले सिन्नरकर पुस्तक लिहिणार हस्तें खुद्द, किरकोळ खर्चास. एकाच वेळीं, पाले, कृष्ण जोशी, गिरभट, भवानी शंकरभट, वगैरे लेखक लिहिण्याचें काम करीत होते.

१६।।।= पुस्तकें लिहविलीं त्याबाा.

५।।= मध्यसिद्धांतकौमुदी ३८०० दर १।।।=

२६।. विज्ञानेश्वर ग्रंथ १०५०० दर २।।

३१।।।= पो पेशजी पावले रु. १५ बाकी रोख (श. १६७७)

तुळशीबागवाले } { श. १६८२ इ. १७६०

पुस्तक लेखन

जमा

५४ केशंभट लातुरकर नामे पुस्तके ग्रंधसंख्या १८००० एकूण (कार्तीक मास)

---

नावें

२०।· पुस्तकांकडे ( वैशाख मास )

७५ केशंभट लेखक कल्याणकर यांस ग्रंथ ल्याह्यावचे ऐवजी. (कार्तीकमास)

७५ भवानी शंकर भट गुजराथी लेखक यास मोघम गुजारत कृष्ण जोसी.

५ गिरभट लेखक वाईस जाताना खर्चास. (पौष मास)

तुळशीबागवाले } { श. १६८४ इ. १७६२

२० पुस्तकाकडे ऋग्वेदाचें पुस्तक संहितेचें लिहावयास देणें. चिमणाजी ( सोनदेव पाटणकर. )

तुळशीबागवाले } { श. १६८७ इ. १७६५

२६८= चिमणाजी सोनदेव वेदाच्या पुस्तकाबद्दल गुा केशवभट गोरे

३ भिमाण्णा लेखक ज्ञानेश्वरी ( कार्तीक १६८७ )

५ भिमाण्णा लेखक ज्ञानेश्वरी लिहितो.

८८ आप्पाण्णा बिन तमाण्णा लेखक वस्ती पंढरी, सालीना रु. १०० ग्रंथ ५५०० लिहून द्यावा बा। कागद.

तुळशीबागवाले } { श. १६८९ इ. १७६७

१००८॥· पुस्तकाकडे, शारीरभाष्य समग्र.

पुस्तक रामानंदी सहवर्तमान गु॥ गंगाधरभट गोडबोले. शिवपुराण ग्रंथ घेतला

तुळशीबागवाले } { श. १६९१ इ. १७६९

२५ गंगाधरभट गोडबोले भारथाचे पुस्तक लिहविले त्याबा। देणे भवानी शंकरभट ( १६९१ )

तुळशीबागवाले } { श. १६९२ इ. १७७०

६ रु. मोरभट विप्रदास त्रिंबककर देणे मल्हारपंत लेखक, संहितेचे पुस्तक ल्याहावयाबा।

४७·।· पुस्तक रामायण कांडें २ ( १६९२ )

५१५|||≈ पुस्तकांकडे लेखक कृष्ण जोशी ( १६९४ )

तुळशीबागवाले } { श. १७०४ इ. १७८२

१४ गु॥ शंकर गुजराथी यानें भारथ पो पर्वे लिहिली ते श्लोक

२२०० गदापर्व श्लोक पत्रें ८२

५८०० सभापर्व पत्रें २६८

८००० दरहजारीं रु. ३ प्रो रु. २४ पो आदा १० बाकी.

खाजगीवाले } वाङ्मयविषयक { श. १७०५ इ. १७८३

४८|||· पुस्तकाकडे ( खर्च )

४२ प्रपंचसार १४००० दर ३ प्रो.

६।।।॰ रुद्रपधत १७००० दर ४ प्रमाणें.

२५ खरेदी प्रपंचसार पुस्तक गुा बाळकृष्ण केशव

तुळशीबागवाले } { श. १७२१ इ. १७७९

तुळशीबागकराकडे पुस्तकाचा संग्रह बराच असावा.

॰।।॰ पुस्तकाकडे धनुर्मासाचें पुस्तक सदाशिवभट पुराणिक यांचे विद्य-मानें लिहविलें त्याजवा लेखकास. १७२१ कार्तिक.

॰।।।॰ शुा ८ चैत्र १७१३ साठ संवत्सरांचें पुस्तक लिहविलें संख्या २०० गुा जयशंकर गुजराथी.

३० रु. पुस्तक नवें लेहविलें. लेखक गोविंदभट गुजराथी ग्रंथसंख्या ६७९९ योगवासिष्ठ पत्रें १८४।।; सुतसंहिता खंडे ४ पो गोविंद भटाकडून लेहविलीं २ एकुण ग्रंथसंख्या ५४२९; (४२९२।। ब्रह्मगीता पत्रें १४७।।; ११३६।। उर्त्की खंडपत्रें ३२) एकुण १२२२८ वजा २२८ बाकी १२००० दर हजारी रु. २।। प्रो.

११८= पुस्तकाकडे

१८= गुा गोविंदभट गुजराथी ज्ञानयोगखंड ग्रंथ १५८० पो बऱ्याजीपंत याजकडून लेह्विला ११११ बाकी ४६१ दर २।। प्रो.

२० गुा बऱ्याजीपंत ग्रंथ

२०७१ सवा महात्मखंड (!)

११११ ज्ञानयोग

दरहजारी रुा १ प्रो.

तुळशीबागवाले } { श. १७१६ इ. १८१३

१० खरेदी पुस्तकें नवीं घेतलीं सुा ३ विा बाळशास्त्री चंदावरकर १ भारतचंपुग्रंथ १ मुद्राराक्षसाची छाया ग्रंथ १ शकुंतला नाटक ग्रंथ

चिपळोणकर } { श. १७५०
{ इ. १८२८

सालोत्राची पोथी प्रत करून मागाहून पाठवून देऊं.

१ देणे गापू नीलजीकर मिरजेचे मुकामीं अभंग वाचविले त्याबद्दल.

४ पोथ्याकडे खर्च

२।। बापु नीलजीकडून मीरजेचे मुकामीं गीतेच्या आर्या लिहिविल्या त्यास उक्ते

१।। पंढरपुरी प्रबोध सुदाकर प्राकृत लिहिविला त्यास ग्रंथ ७५० दर हजारी २

---
४

चिपळूणकर } { श. १७५४ पौष
{ इ. १८३३ जाने.

वाा १४ देणें खाा पोथी भागवताची रु. ३६

क. सुभेदार } { श. १७२१
{ इ. १७९९

३६१ खरिदी पुस्तक श्रीभारत गुाा बापूजी शंकर चिटणीस

वैद्य } {

एका लेखकाकडून पुस्तकें हरवलीं त्याला १० रु. मजूरी म्हणून नांवें पडली आहे.

वैद्य } तोडगे व सामाजिक चाली {

तोडगे ( अनिष्टहारक तांत्रिक उपाय )

८= मजुरी सोनार, शिशाचें यंत्र गयाबाईचे मुलास करविलें.

८≡ शिसें गयाबाईचे दुखण्याबद्दल यंत्र करावयास.

।।।।।। मास बकऱ्याचें, सौ. बयाबाईचे दुखण्यांत ओवाळून टाकण्यास.

।।। दारूपाणी सौ. गयाबाईचे वरुन ओवाळून टाकावयास

किस्ता } { श. १७३४-३५
{ इ. १८१२-१३

लोकांच्या धार्मिक कल्पना, ज्योतिषावर विश्वास वगैरे गोष्टी खालील रकमांवरून दिसून येतील.

रु.

१ देणें जनार्दन गाडगीळ यास घागर उदकुंभ खाशानीं ग्रह पालटला सबब दिला तो.

१८८ राहूचीं दानें ५ अष्टमस्थानीं आला सबब

२ मजुरी रंगारी दुपेटा खाशाकडील आसवली काठी पिवळा रंगविला गुरु पालटला ते दिवशीं शुा हवालदार

।· देणें ( धर्मादाय ) गोविंदपंतकाका केळकर निंबाचे मुंजीबद्दल

२ धर्मादाय घरचे देवापुढें आले ते दिवशीं ( पुण्याहून वाईस गेल्यावर )

चिपळोणकर } { श. १७५१ इ. १८२९

रु. २५ दासी निष्क्रय — शय्यादान

रु. २५ ,, ,, — सिबीकादान

दाजिबा चिपळोणकर मेले तेव्हां १२५० रु. उत्तरकार्यानिमित्त खर्चले त्यांत तरवारदान अश्वदानाच्या बरोबर होतें. (हे श. १७५१ वैशाख शुा ७ रविवारीं वारले.)

८८।· वज्रावळ. मुलाच्या गळ्यात बांधावयास ( मण्यांची माळ दृष्ट लागूं नये म्हणून )

८८।।।· पानें मोहाचीं श्राद्धाकरता

।· धर्मादाय देणें दाजीशास्त्री. गुरु पालटला सबब साखर दान केली त्यास

।।।· खरेदी तेल साजूक वजन ८८२।४।। पक्के दर ८८३।। प्रो शनी पालटला सबब वडे तळावयास

।।· घोंडवाण दिलें त्याजबद्दल आवा ३०

।· दहीं घोड्या धुवावयास

८९ ( रुके ) कुणब्यांच्या सवाशणी सौ सखूबाईचे लग्नाबद्दल.

चिपळोणकर } श्री { श. १७७५ इ. १८५३

श्रीमहाराज व्यंकटेश स्वामी संस्थान गिरी महाराजांचे सेवेसी

चरणरज रघुनाथ हरी चिपलोनकर कृतानेक शिरसाष्टांग नमस्कार विज्ञा-

पना वि. वेशाख शु. १ शके १७७५ प्रमादीनाम संवत्सरे पावेतों स्वामी महा-राजांचे कृपेकरून सर्व मंडळी पुणें मुक्कामी सुखरूप असो विशेष श्रीकडे कानगी-बद्दल आमचेकडून पावावयाचे त्यास शके १७७४ सालाबद्दल रु. १ एक तुलसीराम कानगीवाले यांजबरोबर पाठविला आहे. जमेस घेऊन पावती यावी. कळावे सेवसी श्रुत होय हें विज्ञापना.

## वाहन

२ रु. उंटें पनवेलीस दाणा भरून पाठविलीं. ( कल्याण सुभेदार )

४५ रु. भोई रा नागपूर डोली गुरुजीस जावयास खंडित बोली रु. ८५ पो. ( श. १७३५ पौष )

२५ रु. देवजी नाईक भोई डोलकर कुंभकोणास डोली पाठविली होती त्यापैकीं जमा आश्वीनमासीं केले ते हल्लीं देविले असत ता रामशास्त्री यांस पोचवून भोई यांनीं पावती आणली ते देणे भोई भिा वा ७ पौष श. १७३४

२० जमा आहेत.

५ जाजती बक्षीस

२५ ( वैद्य )

चिपळूणकर } घाटाचें हासील { श. १७५३ इ. १८३१

१२॥-॥ ती. सौ चिमाबाई नीदसुरी ईस आणिली ( गुळसुंद्याहून ) त्याजबा। वाटखर्च वगैरे भाडे मिलोन

११॥॥≥ भाडें

११। डोली व घोडी मिलोन

॥≥ घाटाचे हासिला बा।

११॥॥≥

॥=॥ किरकोळ भाजी सरपण वगैरे

१२॥-॥

( मार्गशीर्ष )

२।।।-।।। सरकारचे उंटापो नफर १ न्हावीचे घाटांत पडून पायांत दुखवला त्यास लेपास वगैरे औषधे

२ चंदी सरकारचा उंट घाटांत राहिला सबब नव रोज दर ८८१ प्रो.

४५।= सरकार पो

२।= चंदीबदल चिंतो नारायण यांणीं मंगळवेढे येथून पाठविले ते नवे हुकेरी

३।। सरकारचा उंट नफर १ न्हावीचे घाटांत दुखवला होता त्याचे लागवडीबा

१९।। उंटाचे सामानास देविले ते

२० निसबतीचे माणसाचे रोजमरे पो.

४५।=

खाजगीवाले } चाल { श. १७०५ इ. १७८३

६ इनाम खास बारदार आा २ सातारियाहून एके दिवशी पुणियास आले दुसरे दिवशी माघारी पोचले सबब दिल्हे (नाना पुरंधरे याजला वैद्य आणावयास)

१ इनाम बयाजी पारधी सातारियास जाऊन दोहों दिवसांत आला सबब

तुळशीबागवाले } { श. १७११ इ. १७८९

१।।- प्यादे जासूद नेवाशाहून जलद आले सा इनाम -।।- रायभान; १ कृष्णाजी झोडगा दो दिवसांत आले सा

५ रु. धर्मादाय शुा ११ भाद्रपद शुा पर्वतीचे तळ्यांतून दक्षिणेकडे उडी घालून उत्तरेकडे निघाला त्यास. १७२१

खाजगीवाले } कुणबीण {

१ कुणबिणीकडे खर्च जानकी चर्मी जोडे २; -।।- कार्तिकमास; -।।- सवाल.

कुणबिणीकडे खर्च. कृष्णीस ८०=॥ पैकीं २०= शुद्ध केली त्यास; ।- विड्याचीं पानें ७००; १॥ ग्रामजोशी;. ।- किरकोळ

क. सुभेदार } कुणबिणींची खरेदी { श. १६९५ इ. १७७३

१८५ रु. साष्टी खातें खासगी ता। सदाशिव राम दामले खरीदी कुणबिणी २ ( मार्गशीर्ष )

१५० रु. ऐशी कुणबिणीस सूट दिली त्याची नजर. ( ही १२५ रुपयास फरोक्त घेतली असावी.)

१॥ तहवेली खर्च ऐशी कुणबीण गोरट पो। कमाविसी आली तीस छीट दिलें १

९० रु. पांडुरग भट पुराणिक ता। खुद कुणबीण घेतली त्यास द्यावयास

श्रावणमास

६० वा। ३० खरिदी तुळसी कुणबिण उमर वर्षे १८ बापु बाबरापासून विकत घेतली किंमत रुपये ७५ घेऊन सौ. जानकीबाईचे उत्तर-कार्यांत दानास बाबाभट सातारकर यास दिल्ही त्यास सदरहु कुण-बीण भटजींनी विकली ती खरिदी साट रुपये रोख भटजीस देउन घेतली असे. (ह्यावरून व पुढील नोंदीवरून कुणबीणींची प्रत्यक्ष खरेदी विक्री होत असे असें होतें.)

१०० रु. कृष्णाजी गोसावी हरीनारायण सांप्रदायी उसणे कुणबीण घ्यावयास मार्गशीर्ष मासीं द्यावे. ( १६८७ आश्वीन )

कुणबिणीची खरेदी

५० बापूजी गंगाधर चिपळोणकर यांस. नरसु सिंदा घोडीचा निा। सरकार आपली कुणबीण एक वर्ण सांवळा उमरवर्षे २० तिचे रु. ५० घेऊन तुम्हास विकत दिली.

गंगाधरभट चिपळोणकर मेल्यावर त्यांच्या उत्तरकार्याकरितां ही कुणबीण विकत घेतली असावी. ( शके १७१५ सालचें खरेदी खत मार्गशीर्ष वा। ५ )

चिपळोणकर } { श. १७४४ इ. १८२२

## कुणबीण गहाण

२० रु. राघोजी बीन घातजी गाडेकर निा बाळाजीपंत नातु रोख इस्ते खुा बा खत यासी गहाण गंगा कुणबीण

कुणबिणींची वांटणी धोंडी–कुणबीण एकच आहे तिचे मोबदला दुसरी कुणबीण नाही त्यास धोंडीची किंमत रुपये पन्नास धरिली. धोंडी ज्यानी घ्यावी त्यानी २५ रुपये दुसरी कुणबीण घ्यावयास द्यावे. ( चिपळूणकरांची फारकत )

## गुलामविक्री

९० रु. सरजेखान बुबेर अधिकारी ता तळोजे देणें फरोक्त सिदी मुंबरखा साहेबु मिटखाज्यान बा कर्जात घेतला होता तो विकत दिला मा गणेशपंत तात्या पाटणकर करार किमत जकात सरजेखान याजकडे ऐसा करार.

५० रोख द्यावयाचा करार.

४० बा चिठ्ठी भाद्रपद शुा १ द्यावे.

९०

२० रु. सिद्दी व पोरगी साष्टीची सरकार पैकीं घेतली त्यापो पोरीची किंमत.

एकट्या सुभेदाराच्या खासगीकडील अशा कल्याणास १४ कुणबिणी होत्या आणि ठाण्यास १५ होत्या. ह्या कुणबिणींत मुसलमानीण ही असे उ. ८॥ पोस्त खर्च देणें मुसलमानी कुणबिणीस इदीस.

२० रु. देहेनगी खर्च हैदराबादकर कलवंतीण यास बयाजी बडवे याजकडून दुपटा खरेदी करून देविला त्याजबद्दल.

वैद्य } **करमणूक** { श. १७३५ स. १८१३

८।· खैरातखर्च वाघ्यास वाघ घेऊन आला त्यास गुा भिकंभट.

१० देणे दशावतारी श्रीरामजीच्या देवलांत खेल करविला त्याबा

१८॥· दशावतारी तमाशा देवळांत केला त्यास हरताळ, राळ वगैरे

तुळशीबागवाले } पर्वतीवर वाघ { श. १७२४

८।।।· चिरंजीव नाना पर्वतीस देवदर्शनास गेले तेथे वाघ खेळवले.

क. सुभेदार } शाहिरांचा नाच {

५ रु. सरकार करनाळा शाहिरांचा नाच केला त्यास दिल्हे.

## हिंदु नाटकाची यादी

यादी हिंदु नाटकास सरंजाम देणार लिहून देतो कीं जे खालीं लिहिलेले सामान खेलाचे दिवशीं देईन दर एका खेलास वीस रुा घेईन.

१ बारा कोच
१ बारा हंड्या
१ सतरंजी एक
१ चादर एक
१ छत एक
१ गलास सिवाय चाळीस
१ चार डझन खुर्च्या
१ बारा झुंबरे दर एकास आठ गलासाप्रा
१ तक्ते वीस सहा फूट लांबीचे
१ सतरंज्या दोन सोंगें सजविण्याचे खोलींत

येणेप्रो सामान मक्तेदार याणे देऊन वीस रुा मक्त्याबद्दल घेणे असे करार.

## (एका अप्रसिद्ध नाटक मंडळीची व त्यांतील कांहीं नटांची माहिती).

रघुनाथ हरि ऊर्फ तात्यासाहेब चिपळूणकर याच्या प्रोत्साहनानें व आश्रयाने एक पौराणिक नाटकें करणारी मंडळी शके १७७७ च्या पूर्वी स्थापन झाली. कदाचित् ही मंडळी 'पुणेकर मंडळी' म्हणून ओळखली जात असेल. चिपळूणकर यांच्या दप्तरीं जीं पत्रें संग्रहित आहेत त्यांवरून ही मंडळी लौकरच फाटाफूट होऊन मोडली असावी असें वाटतें.

बभ्रुवाहन, कूर्मावतार, सीताहरण, विराटपर्व, पारिजातक, रासक्रीडा, वालीवध, आगदशिष्टाई, नरसिंहाख्यान, द्रौपदीस्वयंवर व सीतास्वयंवर इतके पौराणिक खेळ या मंडळीनें केल्याचें पत्रव्यवहारावरून दिसतें. त्या वेळच्या इतर पौराणिक नाटक मंडळ्या अशाच प्रकारचे खेळ करीत असले तरी प्रत्येक मंडळीचे खेळ निरनिराळे असावेत असें आम्हांस वाटतें. त्या वेळेस नाटकें

तयार करण्याचा एक मोठा कारखानाच महाराष्ट्रांत होता असा भास होतो. त्या वेळीं छापण्याची कला नव्हती व निरनिराळ्या मंडळींत वैमनस्य असे. त्यामुळें एकानें रचलेलें नाटक सर्व कंपन्या करीत असें मानणें चुकीचें होईल. प्रत्येक मंडळींत नाटक रचणारा कोणीतरी असेच. ह्या पुणेकर मंडळीला " चिपळूणकर मंडळी " असें सुखबोधार्थ नाव आपण देऊं. ह्या चिपळूणकर मंडळींत नारो रामचंद्र सोहोनी या नांवाचा एक हुशार माणूस होता. तोच नाटकें रची. " हल्ली उत्तररामचरित्राच्या कविता चालल्या आहेत ", " मी दहा बारा नाटकें तयार करून ठेवितों ", " आपल्या आज्ञेप्रमाणे श्रियाळ आख्यान करावें तर मजजवळ ग्रंथ नाही, आपण पाठविलेल्या हॅन्डबिलावरून होणें अशक्य ", " आमच्या कवितांची वही चोरीस गेली " " येथे रा. त्रिंबकपन्त व बाळकृष्ण सांगलीकर यांनी आमचीं आख्यानें चोरून नेलीं, त्याजमुळे बारसी मुक्कामी त्यास घालवून दिलें " हल्ली आता आमचीं सात नाटकें तयार आहेत म आणखी कांही जास्त करण्याची तजवीज चालविली आहे ". अशा प्रकारची माहिती नाना सोहोनी याने पत्रद्वारें चिपळूणकर यांस दिली आहे. ह्यावरून या मंडळीचीं सर्व नाटकें सोहोन्याने बनविलीं असावींत असें वाटतें.

तात्यासाहेब चिपळूणकर यांना लिहिलेल्या एका पत्रांत त्याने केलेली एक आर्या आढळली, तिच्यावरून नानाची काव्यशक्ति कळून येईल. ती आर्या अशी —

" मजपासून शतशा जरि घडले अपराध चित्तिं नाणावे ।
विनयें प्रार्थित तुम्हां बालक तुमचाच चित्तिं आणावें ॥

नाना हा सांगलीजवळ गणेशवाडी येथील राहणारा होता. तो खानदेशचे असिस्टंट कलेक्टर गँडसाहेब यांचा पंचवीस रुपयांवर खाजगी कारकून होता. बहुधा त्यांना हा मराठी शिकवीत असावा. याला बुद्धिबळें चांगली खेळतां येत होतीं. परंतु पुढे हा व्यसनाधीन झाल्यामुळे मंडळीला याला काढून टाकणें भाग पडलें. " नानासाहेब सोहनी[१] यांनीं नाशीक येथे जो प्रकार कटीशूलाचा केला तो पत्रीं लिहितां येत नाही " अशी तक्रार चिपळूणकर यांजकडे मंडळींतील लोकांनी केलेली आढळते.

---

१. नाना सोहनी यांची माहिती अण्णासाहेब किर्लोस्कर यांच्या चरित्रांत पृष्ठ १७-१९ मध्यें आहे.

या नाटक मंडळींतील मुख्य स्त्रीनट गोविंदा काळे हा असावा असें "त्याच्या अंगची चोळी करणें आहे तरी त्याला खण पाठवावा" या वाक्यावरून वाटतें. या मडळींतील दुसरे नट (१) बाळशास्त्री आडकर, (२) बापूजी बाजी खरे (३) वासूनाना ऊर्फ वासुदेव जनार्दन ताम्हनकर, (४) बाळकृष्णपन्त ओक, (५) कृष्णाजी हरि रहाळकर, (६) सोनोपंत दाते, (७) अण्णा सोहनी, (८) विठू सोहोनी, (९) मोरभट गोडबोले, (१०) बाबाजी शिवराम अभ्यंकर व (११) वे. शा. सं. रा. रा. परशरामशास्त्री पाटणकर असे होते. लक्ष्मण गोपाळ दाते याचें दुसरें नाव सोनोपंत असावें. याशिवाय १ गणपतराव, २ व्यंकाप्पा, ३ केशवराव भोवळकर हेहि या मंडळींत समाविष्ट असल्याचा संशय येतो.[1] शास्त्री व भिक्षुक हेहि नाटकात जाऊन सोंगें घेत ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे. या मंडळींत प्रथम विनायक गोपाळ फाटक या नावाचा मनुष्य सूत्रधार असावा. नंतर सागलीकर मंडळींतील वासुदेव म्हणून कोणी एक मनुष्य हेंच काम करण्यास आला असावा असे खालील वाक्यावरून वाटतें. "सागलीकरापैकी वासुदेव येथे येऊन सूत्रधाराचें काम चालवितो. त्यास सर्व आख्यानें येतात. आता सोहोनीची मुळीच गरज नाही."

या मंडळीचा दरमहा भोजनखर्च ७५।८० रुपये असे; नाटकाला शंभर रुपये मिळाले म्हणजे नाटक फार यशस्वी झालें अशी समजूत होती. रुपया, आट आणे, चार आणे असे नाटकाचे दर असत. तिकिटे लावून नाटक होई व हीं तिकिटे छापलेली असत. एका नाटकाच्या तिकिटाचा हिशेब एका कागदावर आढळला तो येणेप्रमाणे —

जमा

२१२ एकंदर छापून आलीं
तिकिटे ५९८

| | | |
|---|---|---|
| ५० | १ रुपयाप्रमाणे | ५० |
| ५० | ॥ प्रमाणे | १०० |
| ११२ | । प्रमाणे | ४४८ |
| २१२ | | ५९८ |

१. हे बुधवार वाड्यांतील शाळेंत हेड मास्तर होते. यांच्या हाताखालीं सोहनी मास्तर होते.

वरील नाटक ता. १० मार्च १८५५ रोजीं झालें. नाटकाचें उत्पन्न किती होई हें खालील उताऱ्यावरून दिसून येईल.

जमाखर्च गु. नाना मोहोनी फा. ब. ८ श. १७७६

नाटकांची जमा

३११.। रु.

| | |
|---|---|
| ९८ | पहिले नाटकाबद्दल |
| १०७८= | दुसरे नाटकाबद्दल |
| ११०८= | तिसरे नाटकाबद्दल |
| ४ | तिकिटें उधारी |
| ३११। | |

एका खर्चाच्या टिपणावरून माहिती मिळते ती—

| | |
|---|---|
| २० | मांडवाचे मक्त्याबद्दल |
| ३ | रावणाचे मुखवट्यास |
| ४॥· | खुर्च्यांबद्दल |
| ६।॥· | छापणावळीबद्दल |

पुण्यास सांगलीकरांचे वाड्यांत नाटकाचे खेळ होत असत. तेथे लोकांना बसण्याकरिता नवीन 'वोटे' घातले त्याला २१ रु. ४।॥ आणे खर्च आल्याचें नमूद आहे.

सांगलीकरांवर मात करावी हा पुणेकरचा उद्देश होता.

श्री

राजमान्य राजश्री नानासाहेब यांसी—

विनंती विशेष. तुम्ही हणमंता याजबरोबर पत्र पाठविले ते पाहून लिहिला मजकूर कळला. हल्ली येथे सांगलीकर नाटकवाले येऊन त्यांनी दोन नाटकें केलीं. एक सीताहरण व दुसरें उत्तररामचरित. येते शनिवारीं रामाचा राजवियोग नाटक करणार व पुढे सुमारें दहा नाटकें करावयाचा बेत आहे. कारण की, त्यास येथे कोणी स्पर्धी राहिला नाही व दुसऱ्या लोकांनी आमच्यापुढें नाटकें काय करावयाचीं आहेत असें त्यांचें म्हणणें. त्याप्रमाणे तुम्हांकडून जो गडी आला त्यानें येथ वर्तमान सांगितलें की, तुमचे नाटकांतील मंडळींचा बेबनाव आहे व तंटेबखेडे

होऊन नाटक मोडले असे ऐकल्यावरून तर आता ते निरवैर होऊन लोकाजवळ पाहिजे तशा गप्पा मारतात व आमचेकडेही कार्याकारण येतात जातात. तुम्ही येथे थिएटरांत नाटक करून वाहवा मिळविली व बाहेरहि बराच लौकिक होऊन तुमचे गुणाची चीज झाली. परंतु त्याचे अन्तःकरणांत जो मोठेपणा आहे की, आमच्यापुढे उभे राहून वाहवा मिळविण्याची मुष्कील. त्यास बाहेर कोठें तरी जाऊन पैसाच मिळवावयाचा त्यापेक्षां पुण्यांत येऊन महिनाभर मुक्काम करून पांच चार नाटकें जीं चागलीं असतील तीं करून त्याची खात्री झाली म्हणजे पुढे जशी मर्जी असेल तिकडे जाण्यास कांही हरकत नाही. तुम्ही नाटक तयार करण्याचे कारण केवळ पैसाच मिळविण्याचे होतें असें नाही. फक्त इर्षेचे कारणाने वाहवा मिळावी व गुणाची चीज व्हावी व पृथ्वीचे पाठीवर त्यापेक्षां चाजती करणारे आहेत असे लोकांस वाटावे त्याप्रमाणे झाले. आता इतके दिवस श्रम करून जितका गुण दाखविला तो येथें त्या समक्ष आल्यानें म्हणजे कमी होईल असें नाही. श्रीदत्तात्रय कसा तरी आश्रय देईलच व कित्येक मंडळीचे मत आपलेकडेहि आहे. तुम्ही आमच्याजवळ इतके दिवस ज्याप्रमाणें वागणूक ठेविली त्याचे श्रेय घेऊन पुण्यांत विशेषपणा मिळवाल अशी आमची खातरजमा आहे. त्यास आम्हास जें कळलें तें तुम्हास लिहिलें आहे. यापुढे तुमची मर्जी. सारांश ज्याच्याशीं इर्षा करून तुम्ही नाटक केले ते म्हणजे, तुमच्या गुणापेक्षां फारच उत्कृष्ट आहेत असें आमचे मत नाही, व जे आमचे नाटकांत आहे तें त्याच्यात नाही असे आमचे अन्तःकरणांत पूर्ण वाटते. त्यास सर्व मंडळी एक दील होऊन रात्रीचा दिवस करून पुढील शनिवारचे आंत येथे येऊन दाखल होऊन त्याचे नाटकाचे दिवशींच नाटकाची तयारी करावी व लिहिले याजवर तुमचा भरवसा असेल असे जाणून लिहिलें आहे.

श्री

**राजमान्य राजश्री नाना सोहनी—बापू मोरभट व निळकंठ[१] कृष्णराव बळवंतराव व गणपतराव भट व अनंत व मार्तंड व भिकोबा व्यंकापा बावाजी शिवराम गोविंदा हुडेकर व गोविंदा काणे उभयतां रामभाऊ गणु करंदीकर व खेडकर व**

---

१. नीळकंठशास्त्री घारपुरे मराठी शाळा नंबर ४चे हेडमास्तर मोरोपत घारपुरे यांचे बंधु. सदर मोरोपंत घारपुरे यांचे चि. हयात आहेत.

नेरासकर वगैरे मंडळीस कळावे की, जो बापूस मजकूर लिहिला आहे त्या-प्रमाणे इकडे येण्याचे करावे. कारण तुमचे नाटक पोट भरण्याकरिता नाही. सर्वमंडळीस घरची प्रपंचाची काळजी नाही. ज्या हेतूनें नाटक केले तो हेतु पूर्ण होण्याचा समय हल्ली आला आहे. तरी या समयीं हजर होऊन केले कामाची चीज करून येथे वाहवा मिळवून नंतर जावे, असा आमचा इरादा आहे. तर जी जलदी होईल ती करून फार लवकर इकडे यावे. श्रीदत्तात्रय-कृपेनें मदत होणे ती होईल व निश्चय पार पाडणें त्याजकडेसच आहे. या उप्पर जर सर्वांनी पोटावरच नजर देऊन मुलुकात जाणेचे असेल तर करणें असेल तें करावें. जर तुम्ही न आला तर इतके दिवस जे काय तुमचे बोलणें होते ते अन्तःकरणांतीलच होते असें आम्हास वाटणार नाही. फक्त वरचेवरच होते. मजकूर विशेष लिहून कळवावा असा नाही. सर्वांस माहीत आहेच.

ह्या पत्रावरून नांवलौकिकाच्या ईर्षेने ही मंडळी स्थापन झाली होती असें दिसतें.

भालदाराची काठी, सोन्याचा वर्ख, टोप व गंगावनें, ब्रह्मदेवाचा मुख-वटा व मोतीं असे जिन्नस मुंबईपुण्याहून नाटकवाले मागवीत असत. " मोत्यांची जोडी जी पुण्यास एक रुपयास मिळते ती येथें ( मुंबईस ) तीन चार आण्यास मिळते. " वगैरे.

नाटकवाल्यांना वर्तमानपत्राचे वर्गणीदार होणें हें भूषण वाटूं लागलें होतें. " आजपासून पुण्यांतील ज्ञानप्रकाश पत्र घेण्याकरिता तिकडे लिहून पाठविलें आहे. आमच्या कृत्यास वर्तमानपत्रें हें भूषण आहे. यामुळे पत्रें घेण्यास प्रारंभ केला आहे. ( नाना सोहनी यांचें पत्र )

शके १७७७

विष्णुकर हे या नाटक मंडळीचे उत्पादक होते असें मानण्यास बाबा आडकर यांच्या पत्रांत आधार मिळतो. " जसी श्रीमंत राजश्री चिंतामणराव आपासाहेब सांगलीकर यांनी गोष्ट आरंभून तो प्रकार सिद्धीस नेला, त्याप्रमाणेच आपली कीर्ति जगांत झाली. "

या नाटकाला लोकाश्रय ठिकठिकाणीं चांगला मिळत होता हें खालील उताऱ्यांवरून दिसून येईल.

" नगर येथें आमचीं नाटकें रासा सुद्धा चार झाली. येथील मुन्सफ सदाशिवपंत भाऊ यांचा लोभही आम्हांवर फार आहे. " " येथील (नगर) लोकांनी राहण्याचा फारच आग्रह केला. बडे लोकांकरितां घरगुती एक नाटक केलें. वांबूरीचे लोक येथें आम्हांस बोलविण्यास आले आहेत याजकरितां तेथें जाणार. येथील लोक आमच्या नादीं फारच लागले आहेत. "

" दिपोटी कलेक्टर, दादोबा पाण्डुरंग आणि प्रिन्सिपॉल सदर अमिन, सदाशिवपन्त गोडबोले वगैरे बडे बडे कामदार लोकांची मुलाखत झाली. या लोकांच्या मनांतून नाटक पहाण्याचा हेतू फारच आहे. आणि हे लोक आम्हास बहुत प्रकारें करून सहाय्य करतील हे खास. " " श्रीदत्तात्रेय-कृपेकरून चांगली वाहवा झाली. येथील ( घोडनदी ) लोकास नाटक चांगलें वाटून हे लोक आम्हास फारच वळले आहेत. येथील सहाय्यकारी मंडळी आम्हास मेजवानी करणार आहेत. " " येथें सरकारने ( विंचूरकर ) आमचा चांगला बदोबस्त ठेवला आहे. विंचूरकर सरकारनी मला रासक्रीडा नाटक सरकारांत केले त्या वेळेस एक पागोटें आणि चांगला दुपेटा आणि ४० रुपये दिले आणि बापूस पागोटें, व कृष्णास पागोटें, मोरभटास पागोटें आणि कांही रुपये दिले. शिवाय कांही मंडळीस रुपये वाटिले. खेरीज नाटकाचा पैसा दिला. विंचूरकर यांनी एक पटेवाला दिला आहे. तो आमचेबरोबर येणार. " " नाशकास हिंगण्यांच्या वाड्यात खेळ झाला. "

" नासीक मुक्कामीं बाबासाहेब हिंगणे यांचा आधार चांगला आहे. आम्ही त्यांच्याच वाड्यांत उतरलो आहो. "

" पुणें सोडल्यापासून दोन हजार रुपये मिळाले "

" जळगांवीं नाटकाचे मक्तेच होत आहेत. "

" येथील ( अहमदनगर ) कामदार दादोबा पांडुरंग व भाऊसाहेब मुनसब वगैरे लोकांची आम्हावर मोटी कृपा आहे. येथें इंदूर सरकारचा दिवाण बाबासाहेब पारनेरकर आले आहेत. त्यांणी आमचें नाटक पाहून फार संतोषीत झाले आणि आम्हास इंदूरास येण्याविषयी आश्वासन दिलें. "

" येवले मुक्कामीं तीन नाटकें केली. मामलेदार गुरुरावजी कानडे याणी आमची बरदारत चांगल्या प्रकारची टेवून येथें खेळास जागा न मिळाल्या-

कारणानें त्यांणी आपल्या घरीं जागा नीट करून मांडव वगैरे घालून तयार केली. त्याला खर्च एकंदर २५।३० रुपये लागला असेल परंतु तो खर्च आमच्यावर अगदीं पडला नसून आमची सर्वप्रकारें चांगली बरदास्त ठेवली आहे."

"आम्ही सोलापुरास येऊन आठ दहा दिवस झाले. येथे जागा लष्करांत थेटर करून खेळ चालू जाहले. सरकारची मदत येथे व लष्करांत चांगली आहे. खेळ एक मंदवारीं जाहला व आजचा खेळ आहे. येथे एका दिवसाआड खेळ होत आहे. मिळकत बरीच आहे."

"सीता-स्वयंवर तिकिटे लावून घोडनदीस केले. त्याची रीज येथील लोकांस बरीच पटली."

यावरून नाटकाची हौस लोकांत किती उत्पन्न झाली होती हें दिसून येईल. इतर नाटक कंपन्यांचा उल्लेखहि या पत्रांतून केलेला आढळतो.

"मुंबईकर नाटकवाले हे धुळें मुक्कामीं आले होते. "सुलोचनाख्यान" नाटक पाहिलें. फारच वाईट होऊन त्याचा फजिता झाला. सदहू नाटक फारच अभिमान करून येथे आलें होतें. पण त्याची थट्टा उत्कृष्ट झाली."

"सांगलीकर रामा अवतारी येथें (मुंबई) येऊन दोन खेळ थेटरमध्ये केलें (१) विराटपर्व (२) गोपीचंद." "नाटक झालें तेथे मंडळी बहुत समाजही मिळाला होता. त्यापैकी कित्येक मंडळी इकडील (शेडाणीची) होती ती आली. त्यांणी सांगितले की, पूर्वी सांगलीकर याचेही नाटक पाहिलें. व हेंही (ब्रभ्रूवाहन) पाहिलें. नाटक अप्रतीम झाले. असो. जी गोष्ट स्वीकारली तिची वाहवा झाली म्हणजे आनंदच आहे."

चिन्तोपन्त रोजेकर यांचे चिपळूणकर यांस पत्र —

"सांगलीकर बडोद्यासच आहेत. ते तेथून परभारे इंदुरास जाणार असे ऐकिवांत आहे."

"येथें दीक्षित यांनी वाईकर गोविंदभट गोखले वगैरे मंडळी आणवून नवीन नाटकाची तयारी चालविली आहे. त्यांत वेदमूर्ति रा. भिकंभट लेले यांचे चिरंजीव आले."

नाटक मंडळ्या स्थापन झाल्यामुळे नाटकांतील वागणुकीचे नियम बनत चालले होते. एखाद्या नटास कोणी बक्षिस दिलें तर त्याच्यावर सत्ता कोणाची यासंबंधी जो निर्णय झाला तो खालील उताऱ्यावरून दिसून येईल.

"तुम्हास अगर नाटकांतील दुसरें कोणास बक्षिस दिलें असेल तर तो पैसा तुमचा आहे असे आम्ही समजत नाही. कारण मुख्य नाटकास आरंभ करणार रा. विष्णुपन्त भावे येथे आले आणि त्याचें नाटकांतील बहिवाटी आहेत त्यांत असा नियम आहे कीं, नाटकांत कोणास जरी काही मिळाले तरी तो पैसा सर्वांनी घ्यावा. तो कोणता म्हटला तरी जे केवळ त्यात भिक्षुक असतील आणि श्राद्धास, भोजनास जरी कोठे गेले तत्रापि तो पैसा सर्वांचा आणि जे कोणी नाटकास बक्षिस देणारे आहेत ते म्हणजे सर्वांस बक्षिस देतात असे नाहीं. त्याचेपैकी त्याजवर कोणाची मर्जी असते त्यास पैसा देतात त्याच नाटकांतील कोणी एक मनुष्य जरी असेल तरी चिन्ता नाही परन्तु जें नाटक जेथें जातें आणि घर सोडून मंडळी बाहेर निघाली म्हणजे घरीं येई पावेतो जी काय मिळकत होईल तो जितके नाटकांतील हीसे (!) जात दरमहा खेरीज करून असतील ती त्यांची असें आह्मास सांगितलें." चिपळूणकर यांचें नाटकवाल्यांस पत्र—

अशा रीतीनें नाटकवाल्यांचे खेळ सुव्यवस्थितपणानें चालू होते. तथापि हा उत्कर्ष ज्याना पाहवेना असे काही लोक त्यांच्या मार्गांत विघ्न आणीत होते. रघुनाथ हरि नाना सोहन्यास लिहितो, "द्वेषी याणीं तुमचा नाश करावा इतक्या विषयीं बहुत खटपट चालविली आहे. व जे तुमचा वाईट मजकूर छापविणार होते त्याणी त्यास आम्हास मिळोन तुमची दुंमत घ्यावी म्हणून तजवीज चालविली, परंतु आम्ही ती गोष्ट नाकबूल केल्यामुळे जास्ती द्वेष जाहला आहे. तुम्ही येथे नाही पाहून सांगलीकर मंडळीस आणविण्याची तजवीज करणारांनी केली आहे."

नटांमधेहि आपसांत भांडणें सुरु झालीं.

"रा. बळवंतराव अभ्यंकर यास नाटकाचे कारभारी म्हणोन गर्व येऊन माझा कंटाळा करितात. असो निभावलें तोंपर्यन्त राहीत." असें नगराहून कृष्णा रहाळकर चिपळूणकरांस कळवितो. नाना सोहन्यास काढून टाकावा लागला व त्याच्या ठिकाणी फाटक सूत्रधार हा आला. परंतु तोही शके १७७८ सालीं नाटकांतून निघाला. नाना सोहन्याला काढल्यावर त्याने एका पत्रांत मंडळीच्या अंतस्थितीबद्दल चिपळोणकर यांस खालील मजकूर लिहिला आहे. "नाटक मंडळी शेंदुर्णीस आहे. खर्चवेंच जाऊन २७५ रुपये त्याजपाशी शिल्लक आहेत.

पैसा भिकोबाचे स्वाधीन आहे. बाळा अभ्यंकर वही लिहितो. कारभार नाना करतो, मुकत्यार बापू आहे. या सर्वत्राचें चांगलें वैमनस्य आहे. मला त्यांतील मंडळी असें म्हणत होती कीं, तुम्ही धुळ्यास दुसरें नाटक करा. आम्ही येतो." पुढें इंदुरास या मंडळीची फुटाफूट झाली असे ऐकल्याचें नाना एका पत्रांत लिहितो.

ज्याचीं मुलें नाटकांत येत ते कधीकधी कलेक्टरपर्यन्त तक्रारी करून कुणाच्या तरी सागीवरून फौजदाराच्या मार्फत नाटक मंडळ्यांना धाक दपटशा दाखवीत. ता. १३ नाव्हेंबर १८५४ रोजीं हिंदु नाटकवाले शहर पुणें यांनीं याबद्दल कलेक्टरकडे अर्ज केला. त्यांत ते म्हणतात कीं, "आम्हीं हिंदुधर्माप्रमाणे आजपर्यन्त जे देवाचे अवतार झाले त्यांची स्तुतीवर्णने करून ज्या ज्या अवतारी ईश्वरी व पराक्रमी खेळ झाले ते नाटकात लोकांस दाखवितो व यांत दोन पैसे उत्पन्न होतात. सबब ज्याचें मनास आलें तो स्वसंतोषें खेळास येतो." जयरामपन्त हातवळणे याचा मुलगा शिवराम हा आपण होऊन नाटकात आला. शिवराम याला बापाने अतिशय मारहाण केल्यावरून फौजदार येऊन त्याने शिवराम यास बापाच्या स्वाधीन केलें व कोणाचें मुलास फितवून नाटकात येऊं दिल्यास तुम्हांस भारी शिक्षा मिळेल अशी नाटकवाल्यास धमकी दिली. यावर नाटकवाल्याचें म्हणणें—

"या हुकुमाचे आधारास कोणाचा अर्ज आहे असे ऐकिवांत नाही. त्याजवर जुलूम जबरी झाली. त्याणे सरकरांत अर्ज केला. त्याचें निराकरण, त्याचे अर्जीप्रमाणे व्हावे ते न झाले हे सरकारमर्जीची गोष्ट आहे. परंतु सदरहू लिहिलेले हुकुमाने आम्हावर सक्ती झाली. त्याचा हा हुकूम रद्द व्हावा. निर्वाह चालेल असे फायद्यावर नजर देऊन कोणी मनुष्य या नाटकांत येतो. आम्ही त्याला फितावून आणलें असी तो स्वतः फिर्याद करून पुरावा करील तर हा हुकूम त्यास लागू असावा."

आपलीं मुलें नाटकांत जाऊन बिघडतील ही भीति लोकांस कशी वाटत होती ह्याचें आणखी एक प्रत्यंतर पहा.

श्री

पौ अधिक आषाढ वा। ८
शके १७७७ राक्षसनाम संवत्सरे.

श्रीमंत रा. तात्यासाहेब चिपळोणकर यांसी—

आश्रित भिकंभट लेले वेदो० आशीवाद येथील कुशल अधिक वा। १ पार वाई येथे क्षेम असो विशेष. येथें गोविंदभट गोखले कोणी आहेत. त्यांनी कांही पोरे जमा करून दशावतारी खेळ तयार केला आहे. त्यांत आमचे चिरंजीव जात असून हल्ली पुण्यास आले आहेत. ही गोष्ट न कर्ता व्यवस्थेने घरांत असावे म्हणोन बहुत यत्न केला. परंतु ते न ऐकतां बेहोष होऊन गोखले मजकूर हे बहुत बदचालीचे असोन त्यांचे छंदास अशी तजवीज झाली आहे. यावरून आपल्यास लिहिले आहे. तर या खेळास वे. रा. नारायण दिक्षित वसेकर यांची मदत आहे असें ऐकल्यावरून मुद्दाम लिहिले आहे. तर आपण वसेकर यास बोलावून आणून सदरहू मजकूर कळवून त्यांत इतकेच व्हावे की आमचे चिरंजिवास त्यांनी खेळांतून काढून टाकावे. नंतर काय ती मदत करीन असे वसेकर याना सांगून त्यातून त्यास काढून आपण दोन गोष्टी सांगून कांही शुद्धीवर आहेत असे वाटल्यास इकडे पाठविण्यास चिंता नाही. तेथे राहतो म्हणत असल्यास ठेवून घेऊन मला लिहावे म्हणजे तेथे राहण्याचीहि तजवीज होईल. त्यांचे बिऱ्हाड शुक्रवारांत खाजगीवाले यांचे विष्णुचे देवळात आहे. सदरी लिहिले आहे याचा उपयोग करण्यास आलस होऊं नये. कोणतेहि तऱ्हेने कांही स्थितीवर येईल असे करावें. नाहीपेक्षा या खेळांत घेऊं नये इतके तरी झालेच पाहिजे. इकडून काडल्यानंतर मोरभट गोडबोले याजकडे जातील. तर तेथेही तजवीज ठेविली पाहिजे. येविषयी यत्न होउन मला डाकमार्गे अथवा कोणी मुद्दाम येणारे आढळल्यास पत्र जलद पाठविण्यात यावे. अनमान होऊं नये. कळावे बहुत काय लिहिणे हे जाहले म्हणजे मला पुण्यास येण्यास ठीक पडेल. लोभ असावा हे विनंति.

स्ने. रा. नारायण दि. यास आशीर्वाद. सदरी लिहिल्याप्रमाणे रा. तात्यासाहेब आपणास कळवितील त्याप्रमाणे आपण अगत्यपूर्वक आमचे चिरंजीवास त्यांतून काढून नंतर काय मदत करणें असेल ती करावी. यांत आपल्यास श्रय जाणून लिहिले आहे. कळावे, हे आशीर्वाद.

---

मुलें नाटकांत फितवून नेली जातात याबद्दल १८६५ च्या ज्ञानप्रकाशांत एक पत्रव्यवहार प्रसिद्ध झाला होता. चिळोणकरांचें चरित्र, पृष्ठ ५३ पाहणे.

## राशींच्या गंजीफा

श्री

यादी रासीचा गंजीफा करून पाठविणेची सन सलासील माहे रौवल

| रासी | चित्रें | रंग | वाहनें |
|---|---|---|---|
| १ मेष | १ बकरेवर राजा | १ तांबडा | १ वजीर मेंडा |
| १ वृषभ | १ बैलावर राजा असावा | १ पांढरा | १ वजीर बैलावर |
| १ मिथुन | १ स्त्रीपुरुष उभयतां | १ हिरवा | १ वजीर घोडेवर |
| १ कर्क | १ कुरलेवर राजा | १ प्याजी गुलाबी | १ वजीर माणुस कुरले पुडे |
| १ सिंव्ह | १ सिव्हावर राजा | १ अस्मानी रंग | १ वजीर सिंव्हावर माणुस |
| १ कन्या | १ बायको राजा असावा | १ पंचरंगी | १ वजीर बायको घोडेवर |
| १ तुल | १ तागडी धरलेला राजा | १ काळा रंग | १ वजीर घोडावर तागडी धरलेला |
| १ वृश्चिक | १ विंचू राजा | १ पीरूराई (!) विंचवाचा रंग | १ वजीर घोडेवर पुडे विंचू |
| १ धन | १ राजा घोडेवर तोंड माणसाचे कृष्णासारखी बिंदुकली पानावर | १ घोडेचा रग | १ वजीर घोडेवर त्यास तोंड माणसाचे वजीर तोंड हरणाचे |
| १ मकर | १ तोंड हरणाचे खाली सुस्वर | १ तबकीर रग | १ खाली सुस्वरीवर माणुस |
| १ कुंभ | १ राजा पुरुष घागर असावी. | १ पिवळा रंग | १ वजीर घोडेवर पुढे घागर |
| १ मीन | १ मच्छासारिखा राजा | १ केसरी रंग | १ वजीर मच्छासारिखा |
| १२ | १२ | | १२ |

येणेप्रमाणे दर रंगास १२ पाने एकूण पानें १४४ रंग लिहिलेप्रमाणे तरतरेचे चित्रे चांगली जसी असावी तसी असावी याप्रमाणें करून पाठविणे. गंजिफा पुणेस पाठविण्याचा.

तुळशीबागवाले } कपडेलत्ते पोषाख { श १६६७ / इ. १७४५

( छिटी पेहेराव लोकांना विषेश आवडत असें दिसतें. )

६।– छिटी तिवटाबा २॥ रु. पासोडी छिटी सासवडी
१॥ रेजा छिटी; ११॥ छीट नेसाऊ बऱ्हाणपुरी
८≡ देणें हरीराम शिंपी सिलाई आंगरखे छिटी.
२। छीट नागपुरी
२६ छिटें अंगरख्याची २
७ झगा छिटाचा १
८= पांडुरंग जोशी यांस टोपी छिटाची रुदार,
९॥ आंगरख्यास तात्याकडे मुलतानी छीट हातघा
११। चिरंजीव नानाकडे
टोपी, आंगरखा, व कुंची, घोंगता, छिटाचा
आंगरखा, पासोडी वगैरे.
७।।।= खासगीकडे
३।।।≡ आंगरखा रात्रीचा
३।।।≡।। दिवसाचा
———
७।।।=

बायकांचे कपडे

१॥= पातळ हिरवें १;
११ पातळें रेशीमकांठी २;
११॥ छीट नेसाऊ बऱ्हाणपुरी
३ झुणा बऱ्हाणपुरी ( परकर )
९ दुपटा सौा जानकीस
२॥ मातुःश्रीबाईकडे छिटें नेसाऊ

२।:। पलंगपोसास शेला हात २२

१८ पलंगपोस २

४ उशांस अभरा

———

२२

मुलींचा पोषाख

४॥·। चि. नानास व यमुनाबाईस आंगरखे व पायजमे स्वारीकरतां केले त्यास

३८= छीट

|||= राबेरी

·॥·। ताफता

———

४·॥·।

७|||= फेटा छिटी १

८ झगा छिटी १

८≡ छीट हातरुमालास

निरनिराळ्या कपडयांचीं नांवें व ते कोठे होत असत हें खालील रमकां-वरून दिसून येईल.

१५ रु. राजमाझली; १४॥ रु. ताडपत्री पासोडी; दोरवा शेला; ६ रु. जाफरखानी शेला १; साष्टीचा पितांबर-१० रु. बाळु गडबोले हस्तें खुद रोख पितांबराबा। साष्टीस पा.

७ आवरंगजेबी यात्रा आळंदी पो.

९॥ औरंगजेबी १ राजश्री नानास पाठविली लेपाकरतां.

२६। रु. खर्च कापडखातें तपासिले ५

१॥ ताफतागज १॥; ·॥· अंगवस्त्रें जोडा १

॥– जोट चनपटणी आंगरख्यास अस्तरास.

४८– शेला धुवट झग्यास; २॥ शेला अंगरख्यास

१२ खसखसी १; ४० पासोड्या ताडपत्री २

५॥ धोत्रजोडा १ सासवडी; ६॥ धोत्रजोडा सुप्याचा

१॥ शेला अंगवस्त्रास; ३|||= धोतरजोडा टाकळीचा

४।।। शेला येदगिरीचा; ५।।। शेला रात्रीं पांघरावयास

१११ आंगरखे रुईदार वगैरे.

१०८।।। आंगरखे ६० एकुण.

२।· खादी पा २

१११

( बांधीव पगड्या असाम्यात )

८।।।≋। आहेर मेजवानी सदाशिवराव यास

३८= पगडी १

४।।।= दुपेटा १

४८–। जामेवार आंगरख्यास गज ४।।

फौजपुरी तिवटें; फौजपुरी दुपटे; तिवटें कळमपाकी; तिवटें नांदेडची; तिवटें कोटगिरी.

१।।।· धोतरजोडा आगवस्त्रास.

{ श. १६७६
स. १७५४

८।।।≋ खेंडे शेले ७; ९८।।।– दोरवे शेले ६४;

७।।।= सखलात गज ३।। दर २। प्रो. आळंदीचे यात्रेंत

२।।।– सुलतानी सखलाद गज ·।।· येणेप्रमाणें

१७८।।।– तीवटें उबरड ७५; १९।। तिवटें जुनरी ७

१।= अंगवस्त्रास शेला; ·।।· अस्तरास शेला

३६८= चिरा १ ( मंदील ).

अमदाबादेहून कापड पुण्यास येई तें

५२१।। श्रीपतराव बापुजी अमदाबादेकडून कापड पाठविले तें वाटेनें भिजालें जाया झालें सा। देणें ६०० मसरु ४; १९० किनखापे ६; २०५ इलाचे ( खे ! ) जरीचें; ६६ हमरु ६ ( १६७६ भाद्रपद ).

१९।।। धोंडो केशव लष्करात सनगे सरकार—१३ महमुदी १ आख २६; ६।।। जोड आख १३।।

८≋ घरखर्च खाते खारवा छत्तीस हात १।। श. १७०४

आजगीवाले } { श. १७०५ / इ. १७८३

## मेहमान खर्च

रु. २॥। श्रीमंतांचे झग्यास आरगजा लिहिविला गुा गोविंदराम

२।≠ सोने वर्ख ८१॥ दर तोळा १९॥ प्रो

।· केशर तोळा ।·

।· शेळी तोळा ।॥·

२॥।≢ पैकीं वजा कारकुनी ८≢

॥= श्रीमंताकडे तुंब्याच्या नाड्या २

श्रीमंताना जरूर तेव्हा त्यांच्या योग्य अशा जिनसा नजर करतां याव्या म्हणून त्यांचा संग्रह मोठया लोकांकडे केलेला असे असें वाटतें. उ.

शिलकी दागिने ( श. १७०५ )

रु. ३०० पदक हिरे ९

२७० हिरे श्रीमंताचे सीरपेचाकडे पा

३० कंठीकडे हिरा १

३००

कल्याण सुभेदार ) स्त्रियांचा पोषाख

।= जोडा चर्मी गुणाबाईस

५८=॥ सौ. उमास सरंजाम यात्रेस जावयासि पुणेयास घेतला

।॥· अंगरखा ।॥· विजार ८=॥। टोपी व नाडी मातुःश्री (विधवा)कडे

५८≢ छिटे नेसावयासि

२॥। सतरंजी बिछाना

२॥।= सेला पलंगपोस

९॥ धोतजोडा अंगवस्त्रास

१॥।= बाईस छीट गंगासागरी

१।· टोप्या सौ. सुभेदारीणबाई व मनाबाई यासी करविल्या त्यास कोरे रेशमी गज ११॥।

८= रेशीम टोप्यास तोळा ।॥·

{ स. १७१०
{ स. १७८८

ह्या एवढ्या जमाखर्चांत मला हातांत धरायची काठी, छत्री, सुई, दाभण हे जिन्नस कोठेच आढळले नाहींत. नाही म्हणायला उत्तर क्रियेकरतां श. १७४७ सालीं १० छत्र्यांचे ४॥ रु. खर्च पडले आहेत.

सखलात सर्व रंगांची मिळत असे; कसें तें पहा—

खर्च

६१॥।= रु. सकलादी गज २३।१॥
२॥ असमानी गज १
१० नारंगी गज ३
१३॥।= सुलतानी गज २॥।
॥।- जंबुर्दी गज ०।१॥
१४॥ लाखी गज ७। दर २ प्रो
१५॥। हिरवी गज ७
४।≡ काळी गज २

६१॥।=

वैद्य }
{ श. १७२०
{ इ. १७९८

बागलकोटास काळें छीट तयार होत असावें. कारण
२॥॰ छीट काळें बागलकोटी
१॥।. रावेरी १ अस्तरास
०॥॰ खरेदी जोडा चरमी १ आकाबाईस हरवला सा घेतला
१।॰ जोडा चरमी १ बयाबाईस
०॥= जोडा चरमी १ आकास. (श. १७२३ ज्येष्ठ स. १८०१)

चिपळूणकर }
{ श. १७४७
{

मेहमान खर्चखात्यांत तुंब्याच्या नाड्यांचा खर्च वारंवार पडलेला आहे.
०॥= श्रीमंतांकडे तुंब्याच्या नाड्या २

१।।= नाना फडणीस यांचे तुंब्यास नाडी १

वैद्य } { श. १७४८ { इ. १८२६

## पोशाक

यादी परटाकडे सनगे धुवावयास दिल्ही

१ हातरुमाल

॥· मजुरी अंगरख्याकडे खाशांच्या बुटीदार छीटाचा केला त्याजकडे

८।।। रुई वजन ८८८९।≈। पिंजाई व भरणावळ

२० धोत्रजोडा १ नेसावयास गुा दाजिबा रास्ते

५।। अगवस्त्रास जोडा १

२।। पंचे अंग पुसावयासी वगैरे ४

॥· खरेदी रेशीम खाशांचे अंगरखे किनखापी शिवावयास दिले

१०।= लुगडें वीस हातो रमाबाई यांस नेसावयास

।= खरेदी छीट हिरवें हात ३ (श. १६९४)

१।। छीट अंगरखे कुणबिणीच्या पोरगेयास

१८= लक्ष्मणराव शेडगे रुमाल कर्नाटकी डोकीस बाधावयासी नव्हता तो दिल्हा.

चिपळूणकर } श्री { श. १७५३ ज्ये. व. ६ { इ. १८३१ जून

यादी नारो दिनकर चिपलोनकर याचे दागिने सोने, रुपे व जवाहिर वगैरे राजश्री भास्कर गणेश करंदीकर याच्याशी होते ते आणिले मिा ज्येष्ठ वा ६ शके १७५३ खर नामसंवत्सरे.

| २१ सोन्याचे | ११ जवाहिराचे |
|---|---|
| १ वांकी जोड चटईदार. वजन तोळे १३।० | १ चौकडा |
| १ कंठा सबंध पदर. वजन तोळे १३।१ | १ भाकेराचा जोड |
| १ माळ गव्हाची साहा पदरी १४।।।. | १ गोट मिन्याचे |
| १ वांकी जोड थोरला व. तो. २३ | १ गलसरी ३ पदरी मण्याची |
| १ मणी हरपडरेवड्याचे १।२ | १ भिकबाली सबंध लोलकसुा |
| १ तुकडे कडयांचे ६ व. ३।१ | १ कंठ्या गणपतीच्या |

१ बिंदली जोड हिऱ्याचे खड्यासुद्धां व.तो.१। १ आगठी हरजिनसी
१ कारले फुल १८= १ प्रा हिर्वी खडयाची संबंध
१ वेणीचीं फुलें सुा ६ १ प्रा निळाची खड्याची संबंध
१ कापाच्या गुंडया २ व गोंड्याची टोपणें १ प्रा मोडकी खड्याची संबंध

२ व मणी २ २॥१ ३
१ पानबल्याचा घाट जोड १ व मणी २- १ किता भोकर
व. ॥१॥. १ पोली ३ लाकडी १ व यमुना
१ राखी मोत्यासुद्धां १ माधकाची चुणी १ व हिऱ्याचा
२ राखड्या सबंध १ खडा व लोलक १ मोतीदाणे
१ पुतल्या फाशाच्या ३ व जोडवी १ बारीक मोठे
१ तोडयाचा तुकडा रुप्याचा व लाकीचे तुकडे १ घोंस
१ व पाटल्याचे तुकडे २ १ जुगणी लोलकसुा

१ जोड ताईत २ व मणी १ व मुख १ ११
गंगावना सुा व वेणीचे नग ५
१ कंबरपटा
१ वांक १
१ किरकोळ मणी १ व चौकडयाचे मोडके
व सुताचे रज व कोंदणाचे

२१.

यादी कापड शिलकी नारो दिनकर चिपळोणकर यांचे कृष्णाजी हरी चिपळोणकर याजपाशी ठेविले. जेष्ठ वाा १ श. १७५३.

१ मुरकी काली घोडीची
१ रुमाल तांबडे मखमलीचा
१ किनखापी रेजे
१ प्रा कबज तांबडा
१ प्रा काळा गज २
२
१ अगरखा काला किनखापी

१ पागोटे ताडपत्री कोरे पांढरे
१ शेले कोरे सावद्याचे
१ छीट अमदाबाजी अंगरख्याचे
१ रुमाल दोरव्याचा कोरा जरीकाठी
१ पायजमा तांबडा किनखापी
१ पायजमा तांबडे गजनीचा
१ दुपटा, पागोटे दोरव्याचे धुवट
१ पामरी काशीची जांबली
१ कच्चे बुटीचा पोशाख पिवळा
१ पागोटे कोरे पांढरे
१ रुमाल साधा कोरा
१ कलिंद्र पिवळे
१ फडकींत भामी मोगलाई जुनी
१ रुमाल कोरा जरीकाठी
१ खण जरीकाठी दोरव्याचा कोरा
१ चिर्डी बादली जुनी
१ चोळणा मोंगलाई कापडाचा
१ पायजमा जुना गजनीचा
१ पागोटे हिर्वे
१ तवा जुना दुपटाचा
१ मलमल पांढरी

वैद्य } इंग्रजी शिक्षण { श. १७२२ इ. १८००

४।- कार्तिकमास शके १७२२ इंग्रजी पुस्तकास दस्ते ४ गुा फलटण-कर विा आबासाहेब पुण्याकडे खर्च.

ह्या रकमेवरून ह्या वैद्यांपैकीं कोणी आबासाहेब इंग्रेजी शिकले होते असें उघड दिसतें.

तुळशीबागवाले } { श. १६८३ इ. १७६१

५० कीरकोळ गीतेचे पुस्तकाची दक्षणा व कार्याकारण समजून द्यावे यास्तव.

चिपळूणकर } शाळाखातें { श. १७५३ / इ. १८३१

एक पत्र साहेबाकडून महादाजी वासुदेव बेडेकर व आबाजी बल्लाळ पेंडसे यांचे नांवें आलें त्यात तालुक्याचे अंमलदार यांचें लिहून गेलें त्यावरून गांवांत दोन हजार मनुष्यें नाहींत सबब शाळा होणार नाहीं असें आहे.

( सु. शके १७५३ चें पत्र चिपळोणकर )

} { श. १७३५ / इ. १८१३

५ रु मौजे लावगन येथें विद्यार्थी पढावयास ठेवले त्यास खर्चास.

कल्याण सुभेदार } नाजूक काम { श. १६९३ / इ. १७७२

२६७॥ संभूराम दिवाण भडोजकर मिा भाद्रपद शुा १ शक १६९३ नाजूक कामाबद्दल पुणियासी श्रीमंतास भेटावयासी गेले ते समयीं घेतले ते नावें खर्च लिा

३०० नाजूक काम फाल्गुन शुा १४ शके १६९३ देर्णे मीरझा अह्ली खंबाइतीचे कामाचे ऐवजीं

१००० रु. जमा पेशजी विठ्ठल भास्कर यासी सुवर्णदुर्गचे मुकामीं नाजूक कामाकरतां दिल्हे तें काम जालें नाहीं साा मारानिल्हेपासून घेतले ( श. १६८७ )

७५ वलभराम व नारो विश्वनाथ व अस्कर बेग छ २९ रोज फाल्गुन वाा ३० ( १६९३ ) नाजूक काम गुजराथ प्रांते राा केले त्यास देवविले बाा पत्र सुभेदार परभारे वनमाळी घोबनदास पो देवविले रुा ३०० पो अमांनत मारानिलेचे पेढीवर होते ते रुा २२५ बाकी खासगी पो देवविले सबब खर्च.

} { श. १६९७ / इ. १७७५

२४४॥ नाजूक काम

४ अर्जुन्या भंडारी

५ रामजी
७॥ खंडोजी सालोखे
३ शरीफ अली
१२५ महागिरी २ मा। धाकू ताडेल कोळी
१०० रफरी ५

२४४॥

मुळशीबागवाले } जवारी मांजर {

१८≡ जवारी मांजराचें पिंजऱ्यास चुका.

कल्याण सुभेदार } घोक {

८≡ बाजे खर्च कुतरे कुलंगे यास गळयांत बांधावयास घागऱ्या सु॥ १५
-॥· बाजे खर्च हरण काळवीट कल्याणाहून आणला त्यास झूल छिटी केली.

चिपळूणकर } { श. १७५३ इ. १८३१

५ रु. बंगाली मैना
५ रु. राघू

खाजगीवाले } { श. १७०५ स. १७८३

शके १७०५ मध्यें श्री. खाजगीवाले यांच्या घरच्या रुप्याच्या जिनसांची केलेली मोजदाद एका यादींत सांपडली त्यांतील जिनसांचीं नांवें खालीं दिलीं आहेत व संख्याही दिली आहे.

( १ ) ताटें २४
( २ ) गुलाबदाण्या ६
( ३ ) अतरदान पली झाकणसुधा १
( ४ ) मेणबत्यांचीं घरें ६
( ५ ) आगरबत्यांचीं घरें मिन्याची २
( ६ ) समया जोडी १ इग्रजी मेणबत्याची
( ७ ) पातेलीं ७

( ८ ) वेळणी १
( ९ ) पळी १
( १० ) फुकणी १
( ११ ) तवल्या ५
( १२ ) चंबु २
( १३ ) पंचपात्रे ३
( १४ ) वोगराळे १
( १५ ) आपखुरे २ ( १ ) तोटीचा ( २ ) बीनतोटी
( १६ ) कइत्वेदाणी १ रुजु च्याशदाणी
( १७ ) अभिषेकपात्र १
( १८ ) तिवई अभिषेकाची १ ( पाय, वरील कडें साखळीसुद्धां )
( १९ ) डबा जाळीदार १
( २० ) भोवरा १
( २१ ) चुनाळ १
( २२ ) प्याला झाकणाचा
( २३ ) डब्या ५ (१) आठपैलु (२) बदामी, (३) चपटी (४) कर्डी (५) सोने मुलमा व मीना
( २४ ) देवाचा संपुष्ट झाकणसुद्धां
( २५ ) तबकड्या १३
( २६ ) चौमाई तबकडी १ हल्ली आख २५
( २७ ) चौफुला
( २८ ) प्याले ८
( २९ ) घटका १
( ३० ) कारंज्याचें सामान ( बुल, तोटी सुद्धां )
( ३१ ) हुक्याची तोटी १
( ३२ ) पंच्यायतनाची बैठक बदामी १
( ३३ ) चमचा १
( ३४ ) ताम्हनें ४

( ३५ ) नाग ३ ( ३६ ) वाट्या ७५ ( ३७ ) चौफुले ३ ( ३८ ) बुधीबळे सुा ३२ सोनेरी मुलम्याची पटसुधा ( ३९ ) तबक १साहापाई ( ४० ) साखळी गंधाची ( १ ) चौपदरी ( २ ) तीपदरी ( ४१ ) तबकें ४ ( ४२ ) लोट्या २ ( ४३ ) कहवेदाणी १ (!) ( ४४ ) तबकडी चौपाई १ ( ४५ ) तबकडी तीपाई १ इंग्रजी ( ४६ ) चगेरी (!) बैठकसुधा ( ४७ ) पानदान देवाचें ( ४८ ) पळी संधेची ( ४९ ) चमचा बिनाखी १ ( ५० ) सांडसी ( ५१ ) तीपाई चूल १ ( ५२ ) प्याला थोर १ ( ५३ ) चिमटा माणसाचा (!) विनाखी १ ( ५४ ) पळी देवाची १ ( ५५ ) प्याले पंचामृताचे ५ ( ५६ ) हलकर्त्या ३ ( ५७ ) वाट्या देवाकडील २ ( ५८ ) गव्याचे सिंगास रुपें ( ५९ ) देव्हारा देवाचा ( ६० ) नंदी व बैठक व कमळ ( ६१ ) देवीची बसक ( ६२ ) शेषशाईची बैठक १ ( ६३ ) गणपतीची बैठक १ ( ६४ ) शाल-ग्रामाचे फुल १ ( ६५ ) पंचायतनाची बैठक चौपाई ( ६६ ) येंत्राची बैठक देव्हारा ( खालील वरील बसक प्रभावळ झाकण सुद्धां ) ( ६७ ) पाट रुप्याचा ( ६८ ) शंखाची आडणी १ ( ६९ ) वेढी देवाकडील ५ ( ७० ) तपेलीं ६ ( ७१ ) परात १ ( ७२ ) झाऱ्या १ ( ७३ ) पलंगाचे ठोकळे २ ( ७४ ) डवी मीन्याची वरती कृष्णाची मूर्त आहे. ( ७५ ) आबा जाळीदार ( ७६ ) डबा १ झाकणसुद्धा ( ७७ ) कळस असागिराचा ( ७८ ) पाटास फुल्या ( ७९ ) पंख्यास सेब्या २ ( ८० ) टाकाची बैठक ( ८१ ) समया जोडी १ ( ८२ ) चौरंग सोने मुलमा राघोचे पाय ( ८३ ) घाट १ ( ८४ ) करांज्याचा फवारा ( ८५ ) सुरई पाणी प्यावयाची झांकणसुधा; ( ८६ ) तांब्या १ ( ८७ ) डबा पंचपाळेंवजा.

[ वरील यादींत चाहादाणी आहे; ह्यावरून चाहा घेण्याचा प्रघात सुरू झाला होता असें दिसतें. तसेंच इंग्रेजी मेणबत्त्यांकरतां समया आहेत व शिवाय मेण व त्याचीं घरें आहेत. ह्यावरून देशी मेणबत्त्या व इंग्रजी मेणबत्त्या लोकांच्या वापरण्यांत असाव्या. ]

खाजगीवाले } गृहवस्तु { श. १७११ / इ. १७८९

·।।।· राघु व कुत्री व बदक मुलांचीं खेळण्याचीं

२० खो तसबीरा सुा ८ दर १।। प्रो

६ . तावदानाची भिंग सुा ६

शिलकी जिनसांच्या यादींत चाकुकातऱ्यांची नोंद आहे.

रु. २॥ कातरी सुा १० } श. १७१५
,, ।· चाकु
,, ।॥≽ कातरी ३ } इ. १७९३

तुळशीबागवाले } { श. १७१५ { इ. १७९३

५ रु. खासगताकडे घड्याळें वाळुका येंत्र लाकडी कठडा व आंत चिणीचें ते घेतले गुा रामचंद्र पाडया निा सरकार याजपासी घेतले त्याजबद्दल देणे.

चिपळूणकर } { श. १७५९ का. शु. १२ { इ. १८३७ आक्टो. ९

३५ खरीदी घड्याळ गुा भिवा

१५ मजुरी देणे भिवा घड्याळजी घड्याळें नीट करण्याबद्दल.

१४०≽॥ मुंजीकरतां चित्रें काढविलीं त्यांस ( खाजगीवाले )

७॥ धनाजी चितारी चाकरी रोज ०२८ दरमहा रु. ८ प्रो

६॥≽॥ रंगास जिन्नस गुा बापु चितारी

१ नीळ वाा ०००१६; ०≽ लाख वाा ०००९

०≽। चुना कैली ००३॥; २॥= पेवडी वाा पक्के ००।४

।≽। मुलतानी माती ( ।= उत्ती; ०–। वाा ००॥.)

०= डींक वाा कच्चे ००१।; ।= हरताळ वजन ००।·

।= हुरमुज वाा ००३॥।

।≽॥ बाणाचे मोत्याचे मुगटांत मोती गुंडाळली त्यास सोनें वजन तोळे गुा बहीरशेट सोनार ०००।१ दर तोळे १५

## सतरंज्या

१ रु. मजुरी खर्च नवी सतरंजी करावयास सूत कातले सबब

२ रु. देणे रोख सतरंजी नवी करावयासी ( कल्याणसुभेदार)

वैद्य

## मेहमान जमा दागिने

रु. ३२१२ चौकडा सरकारपैकी श्रीमंतानी दिला १ एकूण

३२०० रु. मोती दाणे ४

१२ सोने वजन ।।।

३२१२ ए। (वैद्य)

चिपळूणकर } नजराणा { श. १६८२ आश्वीन<br>इ. १७६० आक्टो.

नांवे

२२२६८= निलकंठ महादेव.

३०।। नजर श्रीमंत २ मोहरा

तुळशीबागवाले }

१ रु. भेट महमद रमजान काशीचे सवदागर यानें ठेविली श. १७०२ चैत्र ( १७८० एप्रील )

खाजगीवाले } { श. १७११<br>इ. १७८९

२०।।= नजर श्रीमंतास प्रथम भेटीस

१५।।= खाशांस मोहोर १

५ आप्पासाहेबांस पुतळी ताट १

२०।।=

४२७।। श्रीमंतांस मेजवानी

१७१।= खाशांस

१६२। पोषाख कुसुंबी तिवट व दुपेटा

९८= घोडी सामानासुद्धां

० सींगी लक्ष्मीची नर्मदा रास १ घरची सबब

९८= सामान ( गादी वगैरे )

१७१।=

१५६।= अप्पासाहेबांस

१४७। पोशाख हिरवा तिवट दुपटा

९८= घोडा सामानसुद्धा

० घोडा रास १ किंमत घरचा सबब

१५६।= सामान

१०० व्यंकट नरसी मेजवानीचे वेळेस नाचास बोलाविली सबब.

वैद्य } नजर { श. १७३५ कार्तीक शुा<br>इ. १८१३ आक्टो. नवे.

१३।= मिा शुा १ श्रीमंत पंतप्रधान बाबासो दिपवाळीबाा विा खासे शेटशाई मोहोर गुा बाळाजी महादेव काळे

१३॥ मिा शुा ११ श्रीमंत बाबासाहेब यांस संक्रातीबाा मोहोर १ शेटशाई

५ नजरखर्च ज्येष्ठ वाा १४ पंतसचिव यांस आनंदरावआबानी भेट घेतली तेव्हां केली ते पुतळी ताट १

१३॥ नजरखर्च श्रीमंतांची स्वारी नासिकाहून हवेलीस आली ते समयीं मोहोर १ शेटशाई हस्ते खासे मि. वाा ३० भाद्रपद.

८३।- मोरोबादादा फडणीस यांस मेजवानी

खाजगीवाले }

७५ पोशाख

८।- घोडा सामानासुा घोडा घरचा

इमारतखर्च पुण्यांत बिऱ्हाडास वाडा घेतला होता तो नीट केला त्यास·

१।-। श्रीमंतांस मेजवानी केली त्यास

·।·॥ वेळु असमानगिरी बांधावयास

८≡॥। चुका लोखंडी

।=। पेवडी

८≡॥। चुना टीपगारीस

८≡ बढई यास मेहेनत

१।-।

चिपळोणकर } सातारचे छत्रपती

२०। रु. छत्रपती यांस नजर

१५। मोहोर १

५ पुतळी १

२०।

तुळशीबागवाले } { श. १६८५ / इ. १७६३

आळंदीच्या वाटेवरची झाडें सरकारकडून लावण्यांत आली

६६।≥ खातें निळकंठ महादेव झाडें वाट आळंदी

१३।। खातें निळकंठ महादेव झाडें वाट आळंदी पखाली

१७०१ च्या श्रावण महिन्यांत पेशव्यांची स्वारी देवदर्शनास गेली होती कारण

७ रु. वा। १२ देणें चोपदार सरकाराचे यांस श्रीमंत रावसाहेब तुळशी-बागेंत देवदर्शनास आले ते समयीं मिठाई बा।

।।≥।। श्रीमंतांस हारतुरे आणले त्याबा।

८५। श्रीमंत रावसो देवदर्शनास आले ते समयीं २०। तीवट १; २४ दुपटा १; २० महमुदी; २१ इलासा

{ श. १७०६ भाद्रपद / इ. १७८४ आगष्ट सप्टं.

पेशवे व इतर सरदार देवदर्शनास जात तेव्हां त्यांस प्रसादाची वस्त्रें देण्यांत येत. उदाहरणार्थ

१४९।। रु. श्रीमंत रावसाहेब तुळशीबागांत देवदर्शनास आले त्यांस पोषाख

३३ तीवट लाल कुसुंबी आंख ११००

३७।। दुपटा ,, ,, ,, १२५०

३७।। आंगडीयास तीसा १ ,, १२५०

४१।। किनखाप विजारेस ॰।।॰

१४९।।

तुळशीबागवाले } { श. १७२१ / इ. १७९९

२० रु. देहेनगी खर्च हैदराबादकर कलवंतीण यास बयाजी बडवे याज-कडून दुपटा खरेदी करून देविला त्याजबद्दल.

{ श. १७०९ श्रावण / इ. १७८७ आगष्ट सप्टं.

॰।।॰ खासगताकडील खोलींतील दिव्याची काजळी जावयास नळ बांधला त्याबा। ( तुळशीबागेंत ).

[.खालील रकमेवरून लोकांचा हिशेबी स्वभाव सिद्ध होतो.]

२ रु. घरखर्चाकडील जमा. लछी कुणबीण चुकारीची कोठडीकडे होती तिचा धणी सठवाजी बीन विरोजी थोरात मौजे खुटबावी ता पाटस याचे हवाली केली सा खाणावळीबा वगैरे थोरातापासून घेतले ते

१।≡ जोरी ८।=।। दर ८।१

८≡ डाळ मूग ८८।।।

।। लांकडे जळाऊ

१।।।= वजा ।।। बाकी १।=

।।= पांघरुणाबा

२

तुळशीबागवाले } सामाजिक ( हुंडा ) { श. १७०७ इ. १७८५

८०० यशवंत कृष्णाच्या नातीच्या लग्नाबाबत हुंडा देणें सदाशिव केशव देशपांडे वाईकर हस्ते नारोपंत चवंडे. सदाशिव केशव यांचे भाचे.

तुळशीबागवाले } { श. १७०९ इ. १७८७

१७०९ च्या चत्रांत श्रीमंतास ६७।। रुपयांचीं प्रसादाचीं वस्त्रें समर्पण करण्यांत आलीं. तसेंच १७२० च्या उत्सवांत श्रीमंत बाबासो व अप्पासो यांस १००।। रु.चीं सनगें प्रसादादाखल बहाल केलीं.

[कुटुंबांतील माणसांसह मठांत राहण्याची शंकराचार्यांची वहिवाट अगदींच अर्वाचीन नाहीं असें दिसतें.]

१ देणें शंकराचार्यांच्या मठांत पंचवटिकेमध्यें स्वामींच्या लेकीस खण पैठणी १ श. १७०१ इ. १७७९

{ श. १७१० फा. व. ७ इ. १७८९ मार्च १८

१५० लग्नखर्च देणे आवसरीकर कुलकर्णी याची कुलवधु होती ती कडुसाहून आणविली ती उपयोगी नाहीं माघारी नेली त्यास त्याची नातवानी सबब त्यास खर्चास दिल्हे गुा रामाजी बापुजी व महिपतराव बापुजी

३०० रु. हुंडा दाभोळकर याजकडून आला तो विा शास्त्रीबुवा श. १७४८

२० रु. मिा वा ४ मार्ग. १७१५ श्रीमंत नाना ( फडणीस ) आले ते दिवशी गुलाबी कलावंतीण आणली सा बिदागी.

( १७९४ जानेवारी २१ )

६॥ रा. नाना फडणीस मेजवानी

५ रु. गुलाबी अत्तर

१॥ रु. अगरबत्त्या

६॥

वैद्य }

२१७ भोजनखर्च वाईचे मुक्कामी दहा पात्राची नेमणूक असतां खाशांची स्वारी आली तेव्हां २० पात्रें होत होतीं सा दहा पात्रांचा भोजनखर्च लिहून नेमणूकीत जमा केली असत पौष वा १ ते वैा वा १ पावेतों मुदत माहे ४.

६० रु. तांदूळ केली ।।।। दर ८। प्रो.

२४ जोरी केली ३ दर ८।१ प्रो.

६ गहूं केली ८१ दर ८८२ प्रो.

७॥ डाळ तुरीची केली ८१। दर ८८२ प्रो.

४ डाळ हरभऱ्याची

१ मीठ

१५ तुप ( पुढें फाटलें आहे )

।। नाईकिणीची ओटी गर्भाधानसमयीं भरावयास गुा बाळंभट.

२ मौजे वाळूत येथील महीपती पाडळा यानें दुसरें गांवची सोयरीक आणून पाट लावला सा गुा मारुती पाटील शके १७२२ आषाढ (इ. १८०० जुलै)

रु. १० परशरामपंत चक्रदेव यांची स्त्री सहगमन गेली त्यास मार्गशीर्ष शुा ११ (इ. १८०० डिसेंबर १४)

चिपळूणकर } —हुंडा { श. १७४९ इ. १८२७

१२५० रु. हुंड्याबद्दल—खाजगीवाल्यांचा मुलगा. मथुराबाईचें लग्न ( रघुनाथ सदाशिव यत्ते यांची मुलगी ! )

कल्याणसुभेदार } चाली { श. १७३८ / इ. १८१६

९ मि. शुा (१६९५) मेजवानी खर्च राजश्री त्रिंबक विनायक सर-सुभेदार व ग्रामस्त मंडळी यास मेजवानी केली त्यास

वैद्य } { श. १७४४ / इ. १८२२

२३ रु. रास्ते

९।।। मल्हारनिल्हे यास धोत्रजोडा प्रथम भेटीसमयीं

१३। स्त्रीस प्रथमभेटीस गेले तेव्हां लुगडे १२।-. खण ·।।·

·।≥ भोजनास घरी आली तेव्हां खण १

चिपळूणकर } { श. १७५३ / इ. १८३१

१ रु. बुंदीची कढई ठेविली त्याची पुजा केली त्याचेपुढें दक्षणा ठेविली हस्ते काकूबाई

चिपळूणकर } { श. १७५४ ज्येष्ठ / इ. १८३२ जून

·।= शुा १५ खाो कोंबडी सुा २ सौ ज्यानकीबाईचे मुलीचा वाला जाहाला सबब ओवाळून काढावयास

चिपळूणकर } हुंडा { श. १७५९ / इ. १८३७

" वैद्यांस हुंडा थत्ते याणी दीढ हजार रुा दील्हे. स्थळ उभयपक्षी चांगलें मिळालें " रा. मराठे यांचें पत्र. (बहुधा श. १७५९ चें)

चिपळूणकर } { श. १७५९ श्रावण शु. १ / इ. १८३७ आगष्ट २

डोलकऱ्यांची नायकीण

"त्यास डोलकर यांची नायकीण पारवती आहे तिजपासून रुपये आपण दिल्हे आहेत ते माघारी घ्यावे" (श्रा. शु. १ श. १७५९. आनंदराव बापूजी मराठे यांचे रघुनाथतात्या चिपळोणकर यांस पत्र.)

गांवसई

गावसई आज ता करावी परंतु कुळांच्या मळण्यांचा गुंता होता व सिवेचा

तंटा पडला आहे. गावसईचे उद्योगांतच आहे.

( नारो बल्लाळ केळकर ह्यांचें राघोपंत भावे यांस पत्र. चिपळोणकर दप्तर. महाड तालुका. )

## भोळसरपणा

" ग्रहणाची कर जाहल्यावर सातारियास जावयाचे परंतु राजदर्शनास दोन तीन दिवस मुहूर्तच नाहीं याजकरता वाई मुकामी राहणें जाहले उदईक सोमवारीं प्रातःकाळीं निघोन जाऊन च्यार घटका रात्रीनंतर दिवस चांगला आहे ते वेळेस जाऊन भेट घेऊन होईल मा। तो माघाहून लेहून पाठवूं. "

( वासुदेव बापूजी चिपळोणकरांचें रघुनाथ हरि चीपळोणकर ह्यास पत्र श. १७५९ चैत्र वा। ६ इ. १८३७ एप्रिल २६ )

## चाकरी

{ श. १७५९
{ इ. १८३७

" श्रीसांब कृपेने आबरुमाफक चाकरी मिलाली पगार खर्चापुरता आहे. कारकून पंच्यवीस व पटेवाले शंभर याप्रो। नेमणुकी खर्चवेच सुा। आहेत. परंतु हेत मिलोन तुमचेजवळ असावे ते नाही. आता चाकरीत मिळालो आता थोडके दिवसांत बदलून तुम्हाजवळ येऊ. "

( तात्यासाो चिपळोणकर यांस बाळकृष्ण रंगनाथ ऊर्फ दाजिबा चापेकर यांचे उरणाहून पत्र. श. १७५९ )

श्री { श. १७६५ आश्वीन व. ३०
{ इ. १८४३ आक्टो. २३

मेहेरबान तात्यासाहेब चिपळोणकर. सलाम दिगर. उदईक रात्रौ दहा वाजता दिपवाली निमित्य नाचाचा बेत केला आहे. त्यास मेहेरबानगी करून लष्करात आमचे खासगी बंगल्यात आले पाहिजे. ता. २३।१०।१८४३

सही इंग्रजी.

चिपळूणकर } श्री { श. १७७७ भा. व. २
{ इ. १८५५ सप्टे. २७

संमतपत्र समस्त ब्राह्मण के।। चाकण प्रो खेड सुरु सन १२६५ फसली कसबे मजकूर येथील आताजी ज्यनार्दन जोशी याची कन्या सीलु ईची यवनासी संपर्ग जाल्याबद्दल पुणे येथील ग्रामस्ताचें पत्र आल्यावरून आताजी ज्यनार्दन यानी आपली मुलगी घरातून बाहेर काढून दिली आणी ती मुलगी दोषीत

आसून त्याचे घरात आल्यामुळे स्नानसंध्या मोकली करण्याकरिता श्री विष्णूचे देवालयात पंचगव्य ब्रह्मसभा होऊन घेतले आणी पुन्हा मुलीचा संपर्ग आम्ही करणार नाहीं म्हणो ( न ) पत्र आशाढ शुा १२ शके १७७७ रोजी लेहून देउन ब्रह्मदंडाबद्दल ब्राह्मणभोज्य(न)करावयाचे ठरवून नेम केला असून त्याने याप्रो ब्राह्मणभोज्यन केले नाही. याजकरिता सर्वांचे समते ठरले की आताजी ज्यनार्दन जोसी व त्याचे कुटुंबातील माणसे याजला पंतीबाहेर ठेविले आहे त्यास त्याचे घरी कोणी अनवेव्हार करू नये व त्यासही कोणी आपले घरी बोलाउ नये याप्रो सर्वास हा मजकूर कळऊन सर्वांनी सह्या केल्या असत मिती भाद्रपद वद्य २ शके १७७७ दस्तुर कृष्णाजी भास्कर जोसी को मजकूर

१ सही भिकंभट बिन आबाभट ब्रम्हे काा मजकुर दस्तुर खुद

१ सही दामोदर लक्ष्मणभट ब्रम्हे दस्तुर खुद

१ सही आबाजी येशेश्वर जोसी द. खु.

१ गोविंदभट बिन लक्ष्मणभट ब्रम्हे उपाधे काा माार दस्तुर खुा

१ बापु त्रिंबक जोसी दस्तुर खुद

१ सही कृष्णाजी भास्कर जोसी— काा मजकूर दस्तुर खुद

## मिस्री नायकीण

श्री

राजश्री तात्यासाहेब स्वो

विनंति करितो जे, नबाब अमीर नवाजंग याचे चिरंजीव हल्ली गादीवर बसले आहेत. नबाब रफीक जंगबहादूर याणी येथून हासु गाणार म्हणजे पाहिल्याने येथें सरोद वाजविणार आला होता त्याचा भाऊ याजला तिनसे रु. याची हुंडी देऊन हैबती चपरासी त्याचे खाजगीचा नोकर यास पो त्याणे त्याजला मुंबईहून तीनसे रु. हुंडीचे देऊन येथें आणला पुढें बिडास जावें तो त्याचा बाप येथें मयत जाहाला. सबब वाटखर्च जो त्याजपाशी होता तो त्याणे बापाचे मयतीस लाविला हल्ली त्याजला जाणे बीडास तरी खर्च जवल नाहीं तेव्हां चपरासी मार आमचे वोलखीचा सबब पचीस रुपये मागत आहे त्यास याचा विचार केला की थोर मनुशाचा चपरासी आणि आढला आहे त्याचे म्हणणे की मी बिडास-जातांच पुण्यांत कादर मीर्धे याचे दुकानी हुंडी करून पचीस रु. आपले पो देतो. परंतु माझे येथें कोणी वोलखीचे नाहीं यास्तव नबाबसो याचें मनुश जात

आहे तरी आपण रवाना करून दिल्हे पाहिजे. त्याजवरून मनात आले की थोराचे मनुश आहे आणि आपलीही यांत त्याजवर वरगोष्ट गोष्ट आणि नबाबही आपले मनांत बहुत खुष होतील कीं आमचा चपरासी आडला असतां त्याजला मिश्री नायकिणीनी रवाना करून दिल्हे असें समजून विनंती लिहितों जे चपरासी चिटी लिहून घेऊन पचवीस रु. दिल्हे असतां मजवर येहेसान होईल वरकड रु. येतील यांत कांहीं आंदेशा नाहीं तरी कृपा करून हें काम केलें असतां माझा नकशा राहील. माझे वारस आपण आहांत. शेवेसी श्रुत होय ही विनंती.

प्रकरण ८ वें

# औषधें

तुळशीबागवाले } [ हजामत झाल्यावर डोक्याला पदार्थ लावीत ]

ℴ−। दादाकडे हजामतीस अफु व जायफळ व वुर्डी व पान पूड

तुळशीबागवाले } { श. १६६७ / इ. १७४५

३।· धोंडो मल्हार गु॥ इरशेट तांबट पेसजी रसायणा बा॥ बाबा वैद्याकडे
तांब्याचे पत्रे वजन पक्के

ℴℴ१ कीत्ता
ℴℴ ।।।९ ,,
ℴℴ१।।।९

वैद्य } { श. १६८२ आश्वीन / इ. १७६० आक्टो. नोवें

५।। धोंडभट वैद्य पर्वतीवैद्यखान्याकडे

क. भेदार } { श. १६९२ / इ. १७७०

·।।।· घोडा पाय दुखवला. मोडोन दोन तुकडे झाले सा.
·।।· मैदा लकडी वजन पक्के ℴℴ।।
ℴ= आंबे हळद ℴℴ।।·
ℴ= खजूर ℴℴ१।।·
·।।।·

तुळशीबागवाले } { श. १६९४ फाल्गुन / इ. १७७३ मार्च

३६४। श्रीनिवास वैद्य रसायनास साहित्य
३।।। पोवली तोळे ३

६४ पुतळ्या तोळे ४
२८॥ मोते बारीक तोळे ६
२६४ हिरा रती १६॥
४ माणके
३६४।

खरजेचें औषध

१ रु. गंधक ๙๙२; १ चोख ๙๙१; ๙– भिलावे ๙๙॥·; ๙๙= आंबेहळद; ।– साबण ๙๙१; ·॥· सजीखार ๙๙२

॥–॥ औषधें घोडीची छाती भरली सबब
।=॥ अंडी
๙॥। काव
๙=। तिळाचें तेल
·॥–॥

๙≡। मीठ उंट माती खाऊं लागला त्यास.
६॥=॥। बैरागी घोडीस तेल चारावयास उडीद ๙१๙२।–
·॥· सैंध्येलोण घोडी यास चाटविण्यास वजन ๙๙२॥।
·।= लक्ष्मीचें सिंगीस लोणचें केलें त्यास सामान
·॥· मेभ्या ! सरकारचे घोडीस औषधास ๙๙॥·
๙– साबण घोडीचे चोपटण्यास
๙–॥। गाईचा पाय मोडला सबब औषध ๙– कापूर; ๙॥।· डीक व नीळ

कर्जजमा होन नाणें

गुजराथी वैद्य धंद्याकरतां पुण्यास वास्तव्य करून होते.
४। देणे गुजराथी वैद्य श. १६७१
५॥ धोंडोभट वैद्य पर्वतीवैद्यखान्याकडे श. १६८२
२॥·। खरेदी औषधें. ·॥।= लष्करांत; १॥≡। तासगांवचे मुक्कामीं दुखणाईत आहे सबब. श. १७२१

{ श. १७५०
{ इ. १८२८

घोड्याच्या भुरीस औषध

सुंठ व पिंपळी व रक्तचंदन मधामध्ये समभाग उगाळून दिवसांत तीन वेळ घालीत जावे.

घोड्याच्या उपयोगी

वाघे दाढीच्घा मुळ्या वजन पक्का आदसेर पावेतो मिळवून द्याव्या ह्या इकडे कोकणांत मिळत नाहीत चाकणेकडे रानांत आहेत...घोड्याचे उपयोगी फार पडतात.

{ श. १७५४
{ इ. १८५२

घोड्यास औषध—

" घोड्यास सरदीनें अंगावर गांठी येऊन फुटतात त्याजबद्दल औषधाच्या गोळ्या वीस पंचवीस पाठविल्या आहेत. ह्या प्रातःकाळीं एक गोळी व सायंकाळीं एक गोळी याप्रो १०।१२ रोज चारून पाहावें. गोळी बारीक खलबत्त्यांत कुटून बाजरीचे पिठांत चारावी. " बाबाजी खंडेराव भाटे यांचे पत्र श. १७७४ घोडयास सरदी झाली तर औषध

८८८९ पिंपळमूळ ।६
८८८९ चवक ।०
८८८९ चित्रक ।०
८८८९ हळद
८८८९ अजमोदा
८८८९ सुंठ
८८८९ नागकेशर ८९
८८८९ वेखंड ८९
८८८९ अतिवीष
८८८९ मह्रुन्या
८८८९ सैंधव
८७८९ शगीचे मूळ
८८८९ बोरीची साल

औषध ( इसाबास )

पर्जन्यकाळीं म्हशीच्या शिंगास जमिनींतून कोम फुटतात ते खापरांत घालून त्याची राख करावी आणि ती गाईच्या तुपांत लावावी. उपद्रव फार नसल्यास गाईच्या दुधाचा फेंस चोळावा.

## प्रकरण ९ वें

# भाषिक

### आरमारी शब्दांबद्दल माहिती

पृथ्वीचे पृष्ठभागापैकीं फक्त $\frac{1}{4}$ भाग जमीन असून $\frac{3}{4}$ भाग पाण्यानें व्यापलेला आहे. जमीन सर्व एका ठिकाणींच नसून तुटक तुटक आहे व दरम्यान पाणी आहे. अशा जलाशयांस त्यांच्या लहान मोठ्या प्रमाणानें समुद्र, महासागर अशीं नांवें दिलेलीं आहेत ज्याप्रमाणें जमिनीवर एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्याकरिता गाड्या, रथ, मोटारी, आगगाड्या अगर हवेमधून जाण्याकरितां विमानें केलेलीं आहेत त्याप्रमाणेंच पाण्यावरून इकडून तिकडे जाण्याकरितां व सामान ने-आणण्याकरिता पात्रे तयार केलीं आहेत. पाश्चात्य देशांत पदार्थविज्ञानशास्त्राचे प्रगतीबरोबर निरनिराळ्या बाबतींत जी सुधारणा झाली त्यांत नौकानयन शास्त्रांतही झाली. ज्याप्रमाणें साध्या गाड्यांचें पर्यवसान सायकल गाडी, आगगाडी, मोटारगाडी यांत झालें त्याप्रमाणेंच साध्या गलबताचें पर्यवसान आगबोट, मोटारलांच, सबमरीन यांत झालें. सुधारलेलें नौकानयन हें एक फार मोठें शास्त्र बनलें आहे व देशादेशाचें संरक्षण आरमारावरच बरेंचसें अवलंबून असल्याकारणानें सदर शास्त्राची जोपासना पाश्चात्य देशांत फारच झाली असोन त्यावर निरनिराळे मोठाले ग्रंथही झाले आहेत. त्याची परिभाषाही मोठी आहे.

हिंदुस्थान देशांत आरमारी विद्येची प्रगति मुळींच झालेली नाहीं. जीं कांहीं वाफेचीं गलबतें येथें चालत आहेत तीं माल ने-आणीकरितां व उतारू नेआणण्याकरितां विलायती कंपन्यांनीं चालविलेलीं आहेत. साधीं गलबतें बांधण्याचा व तीं चालविण्याचा धंदा मात्र समुद्रकिनाऱ्यावरचे भागांत फार चालतो. हिंदुस्थानचे पश्चिम किनाऱ्यावर मराठी भाषा बोलणारे जे प्रांत आहेत त्यांत कोळी, भंडारी व मुसलमान या जातींचे लोक दर्यावर्दीपणा करितात. आगरी व मराठी जातीचे लोकही क्वचित् हा धंदा करितात; परंतु ते खाडीकांठांना करितांना आढळतात. हे लोक जीं गलबतें वापरतात तीं लांकडाचींच केलेलीं असतात.

लांकूड हें पाण्यापेक्षां हलकें असतें व तें त्यावर तरंगतें. सबब तरून जाण्याकरितां त्याचा उपयोग करण्याची कल्पना पहिल्यानें निघाली असावी. दोन चार लांकडें एकास एक बांधून त्यांची सांगड तयार करून त्यावरून जातांना अजूनही कांहीं लोक दिसतात. गलबत ही कारागिरीची बरीच पुढची पायरी आहे. **गलबत** हें मागील बाजूनें पसरट व वाटोळें आणि पुढील बाजूस निमुळत्या आकाराचें असें एक लाकडी पात्र असतें. अशा अगदीं लहान पात्रास **नाव** अगर **होडी** अशी संज्ञा आहे. उतारूंची व मालाची ने-आणीकरितां जीं मध्यम आकाराचीं गलबतें असतात त्यांस **मचवे** म्हणतात. मोठ्या गलबतांस **फत्तेमारी, महागिरी** असें म्हणण्याची वहिवाट आहे. फक्त उतारूंकरितांच लहान जलाशयांत वापरण्याकरितां रुंद आकाराचें व उथळ बुडाचें गलबत असतें त्यास **तराफा** म्हणतात. लहान खाड्यांतून थोड्या पाण्यांत जातां यावें अशा सोयीचीं उथळ बुडांचीं जीं मालाचीं गलबतें असतात त्यास **बतेले** अशी संज्ञा आहे. गलबतास दुसरा अन्वर्थक साधारण शब्द **बारकस** असा आहे.

इमारत बांधण्याइतकें किंबहुना जास्त कठीण व खर्चाचें असें हें गलबत बांधण्याचें काम आहे. त्याची कारागिरीहि तज्ज्ञ सुतारामच साधते. गलबताची उभारणी एका आडव्या लांकडावर केलेली असते. मुहूर्ताचे पहिलें आडवें बुंधाचे लांकूड असतें त्यास **मांदी** असें म्हणतात; मांदीच्या मागचें व पुढचें गलबताचें कण्याचें जें लांकूड त्यास **पठाण** म्हणतात. या पठाणास दोन्ही बाजूंस गलबतांत आकार तयार करण्यास ज्या फासळ्या बसविलेल्या असतात त्यांस **वांकें** अशी संज्ञा आहे. वाक एकसंध नसतात. पठाणास जोडलेल्या वांकांस आणखी पुढें जे जोड असतात त्याचें नांव **झाऱ्या**. वाकाच्या वरील तक्त्यास **दुर्मित** म्हणतात. गलबताचें मुख्य बांधकाम पुरें झाल्यानंतर माल साठविण्याची सोय व्हावी म्हणून जे एकदोन आणखी तक्ते अगर मोठ्या फळ्या लावण्याची वहिवाट आहे त्यांस **अडावण** म्हणतात. अडावणीच्या खालच्या फळ्यांस **पेडचें** अशी संज्ञा आहे. तक्ते हे लांबीच्या आकारानें गलबतास वाकावर बसविलेले असतात. पाणी आत शिरूं नये म्हणून ते सुसंध करतात. अडावण ज्या खुंट्यावर बसविलेली असते त्यास **उभे** अशी संज्ञा आहे.

गलबताच्या पुढचे भागास **नाळ** व पश्चात् भागास **बरम** अशी संज्ञा आहे. वळलांकडाचे नाळीकडील टोकास **बुड्ढा** अगर **नाळीचा कळस** असें म्हणतात.

पठाणाचे मागील टोकांस **सुकाणूं** अडकविलेलें असतें. गलबत चालत असतां नाळ ही पाणी तोडीत पुढें जाते. गलबताची दिशा व चालण्याचा कोन आपल्या मर्जीप्रमाणें फिरविण्याचें साधन म्हणजे **सुकाणूं** होय. पाणी ही प्रतिरोधक वस्तु व त्यांत फिरणारें गलबत असल्यामुळें सुकाणूचा उपयोग "लीव्हर" ( टेकू ) सारखा होतो. सुकाणूंची उभी फळी बिजागरीनें गलबताच्या मागच्या बाजूस कण्याच्या लांकडास मध्यभागीं अडकवलेली असते व ती आपल्या मर्जीप्रमाणें फिरवितां यावी म्हणून तिजला वरचे बाजूस दांडा बसविलेला असतो.

समुद्रावर झाडें अगर पर्वत यांची अडचण नसल्यामुळें वारा बराच असतो. त्याचा उपयोग गलबतास वेग देण्याकरितां केला जातो. वाऱ्याचा दाब गलबतावर पडावा म्हणून गलबतास कापडाचीं **शिडें** लाविलेलीं असतात. शिडें जाड कापडाचीं असोन तीं आकारानें तिकोनी अगर लंबचौकोनी असतात. तीं एकाच कपडयाचीं न करतां कापडाचे वीतभर रुंदीचे लांब चिरे जोडून तयार करतात. प्रत्येक दोन चिऱ्यांमध्यें सुंभाची दोरी शिवून शीड तयार केलेले असतें. शिडाच्या अखेरच्या कडांस दोरखंडें शिवलेलीं असतात. गर्भांतील व कडेच्या दोऱ्यांमुळें शीड मजबूत होतें. त्रिकोणी शिडाची जी मोठी बाजू ती एका लांब वाशास बांधलेली असते. त्या वाशास **पडबांध** म्हणतात. पडबांध हवेंत राहावें व त्यामुळें शीड उघडल्याबरोबर त्यास वाऱ्याचा दाब मिळावा म्हणून पडबांध दोरखंडाचे साहाय्यानें **डोलकाठी**वर लटकवितात. डोलकाठी म्हणजे गलबतास उभा केलेला शिडाचा खांब होय. डोलकाठी व पडबांध यांचें लांबीचें प्रमाण ३:४ असें असतें. मध्यम गलबतास एक डोलकाठी व मोठ्यास दोन अगर तीन असतात. मागील काठीस **कलबीची काठी** असे नाव आहे. नाळीच्या टोकाजवळहि एक बारकें शीड काढघालत्या डोलकाठीवर लटकविण्याची पद्धति आहे. या लहान काठीस **बोंब** असें नांव आहे व या शिडास **जीभ** म्हणतात. बोंबेच्या वरील टोकास **व्हांजा** म्हणतात. **पडबांध** डोलकाठी वर खाली करण्याकरिता कप्प्याचें साहाय्य घ्यावें लागतें. ज्या दोरखंडानें पडबांध खालीं आणलें जातें त्यास **कांड** म्हणतात व कप्प्यास **सार** म्हणतात. काठीचे वरील टोकाच्या पोटांत दोर फिरण्याकरितां जी चक्रें असतात त्यांस **लब्राणें** असें नाव आहे. त्रिकोणी शिडाच्या खालचे बाजूने दोन टोकांस दोन दोर असतात. शीड कपडयाचें असल्यामुळें वाऱ्याचा दाब पडल्याबरोबर त्यास पोंक येतें व त्या दाबाबरोबर गलबत पुढें चालूं लागतें. वारा हा

बहुतकरून एका वेळीं एका दिशेनें वाहतो. परंतु वारा गलबताचे पाठचा **नस** **विरुद्ध** अगर तिरकस दिशेनें वाहात असेल तर शिडाच्या उभारणीचा **कोन** त **प्रमाणें** बदलावा लागतो. कोन वर सांगितलेल्या टोकाच्या दोन दोरांच्या साह्यानें ब लतां येतो. पडबांधाच्या बुंधाच्या दोरास **घोस** व दुसऱ्या दोरास **दमन** असें म्हणतात व "घोस घे" म्हणजे पडबांधाचा दोर नाळीवर बांध व त्याचे उलट "दमन घे अशा शब्दानें शीड फिरविण्यास खलाश्यास सांगण्यात येतें. गलबतांत वेळेवेळ उपयोग व्हावा म्हणून वापरतां २ व ठेवणीचें १ अशी **खुरामें,** अगर दोरखंडें असतात

गलबत तयार झाल्यानंतर समुद्रात तें सुमुहूर्तावर लोटलें जातें. गलबत प्रव सास निघालें म्हणजे लांबच्या प्रवासास **सफर** व जवळच्या प्रवासास **फेरी** अ म्हणतात. गलबत ज्या ठिकाणीं आसऱ्याकरितां थांबतें त्यास **वरवा** म्हणतात गलबत थाबविण्याच्या वेळी शिडें बांधतात व **नांगर** टाकतात; नांगरां **पावडा** व **लोयली** असे दोन प्रकार आहेत. एका लांब दांडयाचे टोकास सर रेषेंत दोन फाळ केलेले असतात. ते लांब दांडयास काटकोनांत असतात त्या **पावडी** म्हणतात. लोयलीचे फाळ २ पेक्षां जास्त असून ते वक्र असतात. लोयल व नांगर हे समानार्थी शब्द आहेत. प्रत्येक प्रवासी गलबतास साधारणपणें ३ पाव एक ठेवणुकीचा व दोन वापरते, असे असतात. नांगराचें टोंक एका लांब दो खंडास बांधलेलें असतें व सदर दोरखंडाचें एक टोंक गलबतास बांधलेलें असतें थाबण्याच्या वेळीं टाकलेला नांगर खालीं पाण्याखालील वाळूंत रुतून बसते त्यामुळें गलबत थांबून राहतें. ज्यावेळीं तुफानाचा जोर फार असतो त्यावेळीं नांग राचे दोरखंडहि तुटतात. अशा वेळीं ठेवणुकीचे दोर व नांगर यांचा उपयो करावा लागतो.

लहान होडयांस शिडें नसतात व सुकाणूंहि नसतें. मोठया गलबतां वारा नसल्यास शिडांचा उपयोग होत नाहीं; अशा वेळीं वल्ह्यांचा व काठयांच उपयोग करावा लागतो. लांकडाच्या लांब वाश्यास एक वाटोळें पात लावले म्हणजे **वल्हें** बनतें, तें कालथ्याच्या आकाराचें असतें. पसरट पात्याचा भाग पाण्यां घालून पाणी मागें लोटण्याचा प्रयत्न केल्याबरोबर गलबत पुढें चालूं लागतें उथळ पाण्यांत ज्या ठिकाणीं काठी तळास पोंचूं शकते तेथें टेकण्याकरित काठ्यांचा उपयोग करतात. काठी तळांत रेटली म्हणजे गलबत प्रत्याघातानें पुं पुढें चालूं लागतें. वाऱ्याचे वेळीं किनाऱ्याजवळ काठयांचा उपयोग होतो. काठ्य

या बहुतकरून भरीव बांबूच्या असतात. त्यास **ताजी** अशी संज्ञा आहे. वल्ह्याचा टेकू नीट साधावा म्हणून ते गलबताच्या कडेस लहान लहान उंच खांबटांस अडकवितात व एक टोंक हातांत धरून पातांचें टोक पाण्यांत परजलें जातें.

लाकूड हें सछिद्र आहे. शिवाय बाधणीचें कामही मजबूत न झाल्यास बारीक बारीक चिरा राहतातच. शिवाय तेलपाणी वेळच्या वेळीं न झाल्यास समुद्रकीटक लांकडांस सूक्ष्म छिद्रें पाडतात. या सगळ्यांतून पाण्याचा रिघाव गलबताचे आंतले बाजूस होतो. सदर पाण्यास **गमत** म्हणतात व बुंधाशी ज्या ठिकाणीं पाण्याचा सांठा जमतो त्यास **गमताड** म्हणतात. हें पाणी वेळोवेळी कातडयाच्या बालद्यांनीं उपसले जातें. उपसण्याची जागा प्रत्येक डोलकाठीचे शेजारी असते.

दर्यावरील व्यापाराची जीं मुख्य गावे त्यास बंदरें म्हणतात. **बंदरें** हीं बहुतकरून खाडीच्या तोंडाशीं असतात. उघडया समुद्राच्या किनाऱ्यावर गलबतास वरव्याची जागा मिळत नाहीं. किनारा बहुतकरून उथळ असतो अगर खडकाळ असतो. त्यामुळें गलबतास किनाऱ्याजवळ येता येत नाहीं. नदी अगर पाण्याचा मोठा प्रवाह समुद्रास मिळतो त्या ठिकाणीं समुद्राचें पाणी भरतीबरोबर आंत शिरतें व ओहोटीच्या वेळीं पुन्हां परत समुद्रात येतें व त्यामुळें नदीचें पात्र रुंद होऊन खाडी बनते. समुद्रसपाटीपेक्षा भोवतालची जागा ज्या मानानें उंच सखल सापडते त्या मानानें खाडीची लाबी कमी जास्त होते. गलबतें समुद्रांतून खाडीत शिरल्यावर निवाऱ्याच्या ठिकाणीं थाबतात व अशाच सोईच्या ठिकाणीं व्यापाराचें ठिकाण अथवा बंदर तयार होतें. खाडींतून लहान मचवे, होडया प्रवास करतात. माल भरण्याकरिता मात्र मोठ्या भरतीचे वेळी मोठालीं बारकसें आंत शिरतात. फार मोठ्या भरतीस **उधान** असें म्हणतात. भरती व ओहोटी ह्या बारा तासांत एकदां म्हणजे दिवसांतून दोनदां होतात. भरती ओहोटी चंद्राचे आकर्षणावर अवलंबून असते. चंद्रोदय व चंद्रास्त होते वेळीं भरतीस आरंभ होतो. खाडींतून एका तीरावरून दुसऱ्या तीरावर खेपा घालण्याकरितां मचवे अगर होडया ठेविलेल्या असतात त्यांस **तरी** म्हणतात.

गलबतें चालविण्याकरितां त्यांजवर माणसांचा बराच भरणा लागतो. गलबतावरील मुख्य माणसास **तांडेल** म्हणतात. गलबताचे मालकास **नाखवा** म्हणतात. नाखवा व तांडेल हे एकच असतात असें नाहीं. तांडेलाच्या हाताखालीं काम करणाऱ्या लोकांस **खलाशी** अगर **सफरी** म्हणतात. गलबत चाललें असतां अगर प्रवासांत

थांबलें असतांहि त्यावर पहारा करावा लागतो. गलबत मोठें असल्यामुळें वऱ्याचे वेळीं तें कधींहि किनाऱ्यास लागत नाहीं; किनाऱ्यापासून अंतरावर नांगरावें लागतें. गलबतावरून किनाऱ्यावर येतां यावें म्हणून गलबतास एक लहान होडी असते. ती दोरीनें मागें बांधलेली असते. या दोरीस **पाग** अशी संज्ञा आहे. म्हणून होडीस पागेची होडी असें म्हणतात. गलबत उंच असल्यामुळें त्यांतून होडींत उतरण्याकरिता एक लहान शिडी असते. तिला **निसन** असेंहि म्हणतात. गलबतावरील माणसास शौचास जाण्याकरितां लाकडाची चौकट गलबताचे मागचे बाजूस पाण्याजवळ अडकविलेली असते तिला **घोडली** म्हणतात.

दर्यावर्दीपणा करणाऱ्या जातीची गणना वर दिलीच आहे. या जातींपैकीं कोळी जात ही फार भाविक व पापभीरू आहे. व्यवहाराच्या बाबतींत ही जात फार अज्ञ असते. या लोकांचा मुख्य देव खंडोबा आहे. बाण्या, काळकाई, बहिरी, भगवती, संशय वगैरे देवताहि आहेत. गलबत संकटांत सापडलें असतां या देवतांस कोळी लोक नवस करतात. खंडोबाची देवळें ठिकठिकाणीं आहेत. सदर देवांच्या भगतांस (पुजाऱ्यास) फार प्राप्ति असते. त्याच्या अंगांत खंडोबाचें वारें खेळतें व देव ज्याप्रमाणें कौल देतो त्याप्रमाणें हे कोळी लोक आपले व्यवहार करतात.

गलबतांचा उपयोग माल व उतारू नेआण करण्याकरितां ज्याप्रमाणें केला जातो त्याप्रमाणें मच्छीमारीकरीतां त्यांचा उपयोग विशेषेंकरून केला जातो. अशा गलबतांस **डोलकर मचवे** म्हणतात. समुद्रांत अगर खाडींत अंतःप्रवाह धरून लांकडाचे खुंटे पुरलेले असतात. अशा दोन खुंट्यांमधील जी जागा तिला **कवीचें दार** अशी संज्ञा आहे. लहान मासे पकडण्याकरितां लांबलचक पिशवीच्या आकाराचें तागाच्या सुताचें जाळें केलेलें असतें त्यास **डोल** म्हणतात. डोलीच्या पुढच्या तोंडास **मोर**, त्याचे मागील भागास **कातरा**, त्याचे मागें **माजवला**, त्याचे मागील बाजूस **मूद** व अखेरच्या टोंकास **खोला** म्हणतात. डोल कवीच्या दाराचे खांबास बांधतात. मोर खांबाशीं बांधलेला व खोल पाण्यांत प्रवाहाबरोबर सोडलेला असतो. खांबास मोर बांधण्यास ज्या दोऱ्या वापरतात त्यांस **ज्योती** म्हणतात. मोठाले मासे जाळ्यांत पकडतात. हीं पिशवीच्या आकाराचीं असतात. धोतरें अगर पातळें नुसतीं वाऱ्यावर वाळत जशीं घालतों, त्याप्रमाणें लांबचे लांब पाण्यांत हीं जाळीं सोडलेली असतात. ती पाण्याचे वरचे भागांत राहावी म्हणून हलक्या लांकडाच्या पट्ट्या त्यांचे वरचे अंगास लावलेल्या असतात. त्यामुळें तीं

पाण्यावर तरंगतात. मालाच्या ने-आणीइतकाच किंबहुना ज्यास्त किफायतीचा धंदा मासळी मारण्याचा आहे. मुंबईच्या सान्निध्यामुळें या व्यापारास उत्तेजन मिळत चाललें आहे. याप्रमाणें पूर्वापार चालत आलेल्या नौकानयनाची स्थिति आहे.

## नावाडी लोकांच्या जातींचीं नांवें

(१) अम्बी ( कानडी ); (२) कोळी; (३) खारवी (कच्छी नावाडी); (४) गाभित अथवा गावित; (५) दालदी ( मुसलमान ); (६) भंडारी.

## जहाजांचीं नांवें

१ आरमार, २ कोठ्या कावाडी=मालाची ने-आण करणारें गलबत, ३ खपाटा, ४ गलबत, ५ गंज, ६ घुराब, ७ जहाज, ८ छबीना, ९ डंगी, १० डाव, ११ डुबका, १२ तर, १३ तराफ, १४ तारूं, १५ तोणी अगर दोणी, १६ तिरकटी, १७ नाव, १८ पडाव, १९ पलव, २० पगार, २१ पानवाल, २२ फत्तेमारी, २३ फणी, २४ बगला, २५ बतेला, बळकिन, २६ बलाव अगर बल्याव, २७ बारकस, २८ बामबोट, २९ बातील, ३० मचवा, ३१ महागिरी, ३२ मंबद, ३३ मच्छीमार, ३४ मंद, ३५ मंजी, ३६ शिबाड अथवा सिबाड, ३७ शिपील, ३८ सुबाल, ३९ संबूक, ४० काफला—गलबतांचा जमाव, ४१ तराडे—तारू, ४२ होडी, ४३ होडगें, ४४ गुराब—ग्राब—एकतऱ्हेचें शिडाचें जहाज, ४५ पाल—लढाऊ गलबत.

## जहाजाचे भाग

१ अडे ( आडे )—गलबतातल्या दोन परेच्यामधल्या आडव्या फळ्या.

२ असमान—डोलकाठी जिच्यावर बसवितात ती फळी.

३ अडावण—गलबताचें सर्व बांधकाम झाल्यावर मालाचे सोयीसाठीं आणखी एक दोन फळ्या मारतात त्या अगर माट विणतात तो.

४ आकडा—सुकाणूं ज्यात अडकवितात तो.

५ उलंडी—होडी उलटूं नये म्हणून दोन उभीं लाकडें व एक आडवें लाकूड ह्यांची चौकट करून होडीच्या एका बाजूस बांधतात.

६ उभे—अडावणीचे खुंटे.

७ कुरवाक—डोलकाठीच्या अड्याला व परेच्याला बळकटीकरता कोनाच्या आकाराचें लाकूड बसवितात तें.

८ खादा—नाळीकडील व बराकडील खालचा भाग.

९ गमताड घमताड—घमत साठण्याची जागा.

१० चुलै–वल्ही अडकविण्याचे खुंटे.

११ जेरीप ( जेरीब ) आणि पठाण–खालच्या बाजूचें ( बाहेरून ) लांकूड ( कणा ).

१२ झारी-झाऱ्या–बाकाला लावलेली जोडफळी.

१३ डेरे–गलबताला मजबुती येण्याकरिता लावलेली फळी अगर फळ्या.

१४ दाटा अगर फुगाऊ–स्वयंपाक करण्यासाठीं तयार केलेली जागा.

१५ दुरमित–गलबताची बहालें.

१६ नाळ–गलबताचा पुढील भाग.

१७ परनाळ–वाऱ्याच्या खालच्या बाजूचें लाकूड ( खांद्याखालचें ).

१८ पळा अथवा फाळका–माल भरण्याकरतां केलेली जागा.

१९ पेरजा ( पेरचा ), पेडचें–बळकटीसाठीं बाजूंना अडावणीच्या खालीं फळ्या बसवितात त्या.

२० पिंजरी–बावटा उभा करण्यास केलेली चौकट.

२१ बरमवरे किंवा पयाळ किवा कठोडो किंवा छतेडी ( गुजराथी )–गलबताचा मागील भाग.

२२ बतेना ( पताना )–पठाणाच्यावरचें लांकूड. तुफानांत पठाण गेलें तरी बतेनामुळें गलबतात पाणी येत नाही.

२३ बुड्डा–नाळीचें टोंक.

२४ बावें अथवा आवाडी–सुकाणूं फिरविण्याची दाडी.

२५ भुरडा ( भुलडा )–नाळेचा गोल अग्रभाग.

२६ माडी ( मादी )–बुंधाचें आडवें लाकूड.

२७ मालक्या–पठाणावरच्या प्रत्येक बाजूच्या तीन फळ्या.

२८ वांकें–पठाणाच्या दोन्ही बाजूंस बसविलेल्या फळ्या.

२९ वावखड–उलंडीची उभी लाकडें.

३० शमई.

३१ सुकाणूं–गलबत वळविण्याचें साधन.

## नांगर

१ अंबार–दोरी, जिनें पावडा खालीं सोडतात ती.

२ कानपी–नांगराचे कांटे.

३ चारण्या—लोयल्या ज्या दोऱ्यांनीं सोडतात त्या दोऱ्या.
४ नांगर अगर पावडा—गलबत स्थिर करण्यासाठीं पाण्यांत टाकण्याचा आंकडा.
५ पागार—दोरी.
६ लोयली—लहान नागर.
७ बाप—दोरी.

## गलबतावरील अधिकारी

१ खलाशी—गलबतावरील कामें करणारे.
२ खाब्या—डोलकाठीवर चढणारा.
३ तांडेल—खलाश्यावरील मुख्य.
४ सरतांडेल—तांडेलावरील मुख्य.
५ नाखवा—गलबताचा मालक.
६ पहारेवाला—गलबतावर पहारा करणारा अधिकारी.
७ मालीम—गलबतावरचा एक अधिकारी.

## वारे

१ अवखंडा—समुद्राकडून येणारा वारा.
२ उपरचा वारा—उत्तर व पश्चिमचा वारा.
३ गावरन—पश्चिमेकडील वारा.
४ चिल्यातचा वारा—दक्षिण व पूर्वेचा वारा.
५ तड्या वारा—किनाऱ्याचा वारा.
६ तोंडचा वारा.
७ पाठचा वारा.
८ मतलय—पूर्वेचा वारा.
९ वादळ—तुफानी वारा.
१० सात्रस—उत्तरेचा वारा.
११ हेटचा वारा-दक्षिणचा वारा.

## समुद्रासंबंधीं

१ अवदान.
२ उधान—मोठी भरती ( पूर्णिमा—अमावास्येची ).

३ ओहोटी किंवा सुकती.

४ किनारा–समुद्रकांठ.

५ गयारी–ओहोटीच्या वेळेच्या लाटा.

६ घामट, घमत किंवा गमत–गलबतांत समुद्राचें सांचलेले पाणी.

७ दर्या–समुद्र.

८ बारजा–खाडीचा किनारा.

९ भरती.

१० भाग–मोटी ओहोटी.

११ मौजा–मोटी लाट.

१२ लाट.

१३ लाज–किनारा.

१४ समा–ओहोटी नाहीं व भरती नाहीं अशी स्थिति.

१५ हीसाड–मौजा धावून येतो त्यास हीसाड किंवा वसाड म्हणतात.

---

मासे धरण्याकरता समुद्रात खाब पुरतात व जागा करतात तत्संबंधी शब्द.

१ कवीचे दार.

२ कातरा.

३ खोला, ४ ज्योती, ५ डोल, ६ माजवला, ७ मुद, ८ मोर.

## इतर शब्द

१ कबीला–मोठा खिळा.

२ कबीशी–लहान खिळा.

३ खोल–निवाऱ्याची जागा.

४ गाबडी–कापडाचे ठिगळाप्रमाणे भोंक बुजविण्याकरतां घातलेला लांकडाचा तुकडा.

५ घोडली–शौच्यास बसण्यास केलेली (फळी) जागा.

६ ताण–उ. भरतीच्या ताणावर गलबत निघालें.

७ तुफान–वादळ.

८ दर्यावर्दी.

९ दकीका—नाविक मैल.

१० निसन—गलबतावरील शिडी.

११ मुसाद—अंतर.

१२ वारेवा अगर ओरवा अगर वरवा—गलबत बंदरांत नांगर टाकून राहतें त्यास म्हणतात.

१३ सफर—फेरी.

१४ होका.

## शिडें

१ अदरस ( इदरीस )—ज्या दोरीनें बोबशीड मावरून मोठ्या काठीस बाधतात ती.

२ असमान—दोरी.

३ कलबी—पाठीमागलें शीड.

४ कांडें—दोरी.

५ कऱ्या— ,,

६ घोम—जी दोरी शिडाच्या वाऱ्याकडील कोपऱ्याम बांधतात ती.

७ डोलकाठी—मधली मोठी काठी.

८ ताडणी—दोरी.

९ दमाण-गलबताचे मागील तक्तपोशीच्या बाजूला सुकाणूकडे बाधलेली दोरी.

१० निजाम बुरकस—काहीं गलबतांस मुख्य शिडापुढे हे शीड असतें.

११ परधान, पडबाध—मोठ्या शिडाचे लाकूड ( दोऱ्यांना शीड ज्या लाकडास बाधतात तें ).

१२ बरास—दोरी.

१३ बोंब किवा जीभ किंवा फोगी—अगदीं पुढचें म्हणजे नाळीवरचें शीड.

१४ बोंब—जिभेचें लाकूड.

१५ मातण अथवा माचण घेणें ( हेऱ्या करणें )—शीड वळवून फिरवणें.

१६ मतेली—वरची शेंड्याची यारी.

१७ यारी—यारीच्या दोऱ्या.

१८ लबरान—डोलकाठीच्या दोन बाजूंच्या दोऱ्या.

१९ शिकी–शिडाची घडी ज्या दोरीनें बांधतात ती.

२० शीड किंवा अवजार–मुख्य शीड.

२१ शीड अर्या करणें–शीड गुंडाळून उतरविणें.

२२ शीड चढविणें–हाकारणें, उभारणें.

२३ लताडणी–दोरी.

२४ ल्हाजा–डोंबेचें वरचें टोंक.

२५ सारे–दोरी.

२६ हेऱ्या अगर वाकसी–एका बाजूचें शीड दुसऱ्या बाजूस आणणें.

२७ होदार–दोरीनें ओढून धरणें.

## गलबत चालविण्याचीं साधनें

१ चुलै–वल्ही अडकविण्याचे खुंट.

२ ताज–काठी.

३ पताग–वल्हें.

४ पाग–गलबत धक्क्याकडे आणण्याकरिता दोरी फेकतात ती.

५ बाउरी–दोरी.

६ बार धर–जलद वल्हव.

७ वल्हें, ८ हलेसा–वल्हें.

## अवांतर शब्द

१ नोर–गलबताचें भाडें.

२ सतमी–बंदर–फी देऊन परवाना घेतात त्यास सतमी करणें म्हणतात.

३ कौल–परवाना.

४ बे-कौली–बिन परवान्याची.

५ काराणी–खलाशी.

६ खुटवा–गलबत बंदरांत येऊन नांगर टाकल्यावर जो कर घेतात तो.

७ जोरी करणें–गलबत भाड्यानें घेणें.

८ कौलावण–कौल घेण्याकरतां फी द्यावी लागते ती.

श्रीमन महादेव श्रीमहालक्ष्मी आंबिका मगंर ( गंगा ? ) आदि लक्ष्मी-पती श्रीमन नारायण अनंत कोटि ब्रह्मांड नायेक वेदवेदात वेदपुराण पुरुषोत्तम त्रैलोक्यनाथ देवाधिदेव अनंत निगमा अगम स्वंवेद उत्पत्तीकर्ता सृष्टिस्थितिजगत्तारक भूवैकुंठपति अनंत अवतार आमोघ पराक्रम राजे लोक श्रीव्यंकटनायेक मुद्राधिकारी राजेश्री रामराव आया अमलदार सरकार चंद्रगिरी फौजदार त्रिपती सेवक निजभक्त रघुनाथ हरी चिपळोणकर मुा पुणे यासी पुत्रपौत्र भाडार भरपूर त्रिकाल लक्ष्मी प्रा काया वाचा मने करून इछिले नवस केले असतील ते तृप्त करून देणे अंतर साक्ष असो. हल्ली तुळसीराम ब्रिण रघुनाथ भगत पराडकर यासी समागमे महाप्रसाद गंध मनोहर व शेष वस्ता करनाटकी रुमाल १ ( पुढला मजकूर फाटला आहे.) प्रसाद प ठविला आहे. तो घेऊन सिरसावंद्य करून घेणे तुम्ही श्रीस कानगी रु. १ एक पाठविले ते गिरीस येऊन सुवर्ण गंगाली प्रविष्ट होऊन खजीना दाखल जाले हल्ली सनद सादर केली आहे तर सालाबाद कानगी रु. १ एक प्रो एकूण दुसाला रु. २ दोन व मागील बाकी येणें आहे तो हिसोब करून रवाणा करून देणें तेणेंकरून श्री कृपावंत होऊन सकल मनोरथ परिपूर्ण करील कमावीत बरकत निरंतर होईल. श्रीकृपावलोकणे करून धन कनक वस्तु वावन संतान समोवृद्धि करणार श्रीव्यंकटेश प्रा. मिा आस्वीन शु. १० शके १७७६ स्वारी सुखरूप ते समयीं सनद रवाना केली असे हा असीरवाद.

( प्रो मिती वैशाख शु. १३ शके १७७७ राक्षस नाम संवत्छरे. )

वरील अस्सल पत्र मोडींत आहे. ह्यावरून मराठी व मोडी जाणणारीं माणसें तेव्हां गिरीवर होतीं हें उघड आहे; हेंच ह्या पत्राचें महत्त्व आहे.

---

**५८≋ लक्ष्मणभट बडवे बहुगुण्याबा ८८२८६|||. बहुगुणी = बोधणी.**

{ श. १६७९
{ इ. १७५७.

**१३||= नांवें सदाशिव बल्लाळ नासदाण्या रुप्याच्या दोन**

**२३ खरेदी यारदी : यारदी म्हणजे घोडा. हा शब्द सांप्रत वापरण्यांत दिसत नाहीं.**

वाहित्रे=वाहून नेणारे.

राजा ह्या शब्दापासून राज्या-अर्थ तलाठी.

{ श. १७०५

केवळ शब्दांकरतां खालील उतारा उपयुक्त वाटेल.

इमारत खर्च दिवाणखाना

२०५८।।।= खरीदी तुळया सायवान व गज्या

६३६।। आटक्या सुा ६७

३७३।। बारक्या सुा २६

९५ दसक्या सुा ८

३२।।।= चौदक्या ,, २

१४९।।= दिडक्या ,, २१

१९५ थोर तुळया ३ दर ६५

११४ सोळक्या सुा ६

४७।। वीसक्या २

२१।= आठरकी १

९।। चवल्या सुा २ दर ४।।।

३४४। गज्या सुा १६२ दर २८=

५ गोल सीनरपैकीं १०

..................

तुळशीबागवाले } { श. १७०२ चैत्र

८= बोकडाचे गाडीचा माचवा व नारळ एा तीन दागिने कातविले त्याबा.

विनोदी भाषेचा मासला.

राजश्री तात्यासाहेब स्वामी

विनंती करतो जे.

वर्षाने एक वेळ भिक्षा आम्हास मागावी लागते कारण रंगपंचमी म्हणोन काही व्रत बायकांस असते यास्तव सरकारास विनंती सेवेसी लिहून दिली आहे

कारण कीं मी भिक्षेकरी आपले घरचा आहे. याजकरतां सौभाग्यवति वहिनी-बाईस मजकडून सूचना असली म्हणजे रंगपंचमीचा बंदोबस्त माझे घरचा होईल. वऱ्या व मीठ व भाजीसाठी जे देण्यात येईल ते थोडेच आहे कारण उद्यांचा दिवस तसाच आटीचा आहे परंतु सूचनार्थ विज्ञाप्ति कळविली आहे कळावे सेवेशी श्रुत होय हे विनंती.

इंग्रज म्हणजे पोलाद

।। इंगरज कुऱ्हाडीस ००॥। दर ०=; सुंब्यास पाणी पाजलें व इंग्रज भरले.

॥। बाग पर्वतीकडे कुदळींत घालावयास

॥– लोखंड ००२ दर ००३॥

०≡ इंग्रज ००।९ दर ०= ( १७११ )

०= घरांतील विळी मोडली तीस इंग्रज ००।।

शब्द

नाबादानी–नुकसान–आबादानीच्या उलट. उ. कृष्णेस पूर येऊन नाबा-दानी झाली.

रुपीस चलणी–कंपनी सरकारचे रुपये.

चिपळोणकर } मराठी गद्य { श. १७६२ इ. १८४०

एका गृहस्थाने साहेबापासून असल विलायती सातशे रुपयास कोरी सरं-जाम चांगला नवा पसंत डौलास उत्कृष्ट रस्त्याने चालली असता लोकानी पाहात असावे रंग काळा रूप आत दिसते डरडियामुद्धा गवमण्या गाडीवर रंगीत बुरखा सहीत नवा कोरा माल आहे त्याणे घेतल्यास चार महिने झाले त्याजवर कांहीं पेच आला त्याजमुळें तो विकीत आहे वगैरे ... सदाशिव नारायण पुसाळकर यांचे चिपळोणकरास पत्र मुंबईहून.

क्रियाबाल=अज्ञान

टसे कागद=स्टाप कागद

भातेवाला=वेलीफ

गैरसंदी=अनुचित, अयोग्य

समोरवाला=सामनेवाला

दाहीजण=समस्त लोक

उ. रा. खंडेराव बाबासोचे सेवेशी अज्ञाधारक मोकदम व समस्त दाहीजण मौजे रावणगांव..................

बैठें वेतन=पेनशन

साधनसूत्र–पुरावा=दाजीबा चिपळोणकर व नाना दातार यांचे दरम्यानचे भितीचा लढा पडला आहे. त्यांचें साधनसूत्र उभयताजवळ काय असेल तें घेऊन गारपिरावर दप्तरांत यावें.

हाशा=कुशाबाचे लेपास हाशा लाविला. हाशा=किनार.

गलेफ=पोथीच्या वेष्टणास.

यज्ञोपवीत शुद्ध होण्यास निकृष्ट १०० रुपये पाहिजेत. वडिली यज्ञोपवीत शुद्ध करावे. यज्ञोपवीत मोकळें केलें पाहिजे.

हातपे मुलाचे, जोड एक

मुजामे चरमी

लेडी व गोरबंद यास लाहोकरीचे सूत

छाप-लोहोकरी

भीडणास लोहोकर

घमेटी चर्मी

पुस्तंग चर्मी

कोनी निघणें–तेथे कोनी निघाल्याचें वर्तमान ६ रोजीं समजलें. रविवारीं घरीं आलों कन्या झाली.

पटू=वस्त्र

फरद. उ. जडावाचे फरद १. याची किंमत १२५०० रु. झाली.

गेंदजोडी }
सरोसर } घोड्याचे दागिने

अगाबानी–चीट ?

उ. कापड चंदेरीचें गारदी पिरावरचे मलजी पारशी यांजकडे विक्रीकरतां पाठविले तें.

आगबान्या ८, दोरवे ६, मलमल्या २०, तिवट, धोतर जोडा १

हार कोठें–"हार कोठें सोय लागावी". हर कोठें = कोठेंहि, कोठेंतरी.

इतला–आमचे इतल्याशिवाय लग्न करूं नये. (वार्ता, संमति).

गोळेकरी–तांदूळ सडणारे ?

आडोशी पडोशी–खरेदीपत्रावर साक्षी आडोशी पडोशी घालून त्यांचीं नांवें लिहून पाठवावीं म्हणजे नकलेवर लिहून ठेवूं.

चिपळूणकर }

## कांहीं आडनांवें

आगाशे ह्यांचें मूळ नांव आकाशे असावें. एका पत्रांत गोपीनाथशास्त्री आकाशे अशी सही असलेली आढळली. पाताळे असें एक आडनांव आहे. त्याच्याच पंक्तीला आकाशे हें आडनांव बसण्यासारखे आहे.

कोकणस्थांत गावावरून आडनांवें आहेतच. "कर" ज्याच्या शेवटीं आहे तीं सर्व आडनावें बहुधा गावांवरून पडलीं आहेत. उ. दाडेकर, चापेकर, केळकर इ. कर्नाटकांत गांवाचें नांव कर प्रत्यय न लावता जसेंच्या तसेंच आडनांव म्हणून लावतात. उ. बेट्टिगिरी, जोरापूर, धारवाड इ. कोकणातहि कांहीं आडनांवें अशा नमुन्याची बनलेलीं असावी. उ. चक्रदेव ह्या गांवावरून चक्रदेव हें आडनांव प्रचारांत आले.

## इंग्रजी शब्द

।· गुा तात्या देणे मास्तर हस्ते विमो बजाबा जोशी. श. १७५३

दर रिकिबीस–वारंवार

" रखमाजी निा शेटे उरणास काल सडेच आले आहेत....त्यांनी तुम्हास राम राम सागितल्यावरून लिा आहेत. तुमचे स्मरण दर रिकिबीस करितात."

वाकबगारी=माहिती

" तुमचे वडील आम्हास कसे मानून चालवीत होते याची वाकबगारी काही काही तुम्हास असेल. "

ज्योरात–?

" राजेश्री तात्यासो चिपलोनकर गोसावी यासी

रामराम वीनंती वीशेष आज सो मेहरबान पार सो याची ज्योरात आहे. संगमनेराहून नवा ताफा आला त्याचा गाना आहे त्यास मेहरबानगी करून आठ वाजता रातरी यावे कळावे ता. ६ फेबरवारी सन १८४४.

(सही) मल्हारराव घोरपडे अमीरुल उमराव.

दाणा-?

" घोडा फार चांगला आहे......... रंग निळा व पाय काळे व डोळे काळे व आईल दांडी काळी व उंची घोडे आदमासे चवदा **दाणे** "

## प्रचारांतून गेलेले शब्द

सरफेवार=फायदेशीर. उ. पेट्या हिऱ्याच्या चांगल्या **सरफेवार** थोडक्या किमतींत अशा......... अगत्य पाठवून द्याव्या.

लब

३ रु. इनाम देणें पोलीस दरोग याजकडील सीपाई आा ३ शा मार्गसीर्ष शुा९ पासून मार्गसीर्ष वाा८ पावेतो राहाट्यास व ताफेचे लवेस वगैरे नेहमी नेमणुकीस होते सबब ( १७५३ )

हिमायत-पाठबळ.

.........परंतु वाो रा रामभट नगरकर हे सरकारचे आश्रीत. मुतालीक याचे आजे त्याजमुळे मुतालीक **हिमायत** करतात. याजकरता अमल अर्जी केली म्हणजे कायद्याप्राो ऐवज उलगडतील न उलगडल्यास पुण्यांतील साहेबाची आपली दोस्ती फार आहे. त्या साहेबाचे कानावर माार घालून येथील रसीदंड साहेब यांस माहाराज सरकारांतून मुतालीक यांजकडून व्याज सुाा ऐवज देवविण्याविसी चकती आली म्हणजे ऐवज उलगडून देण्यास अवकाश पडणार नाही." दातारांचे चिपळोणकर ह्यास पत्र (१७६४).

## कांहीं शब्द

कारणीक=ह्याचा अर्थ कारभारी अगर उपयोगी असा कोशांत दिला आहे. परंतु खालील वाक्यांत जरूर तितके, कारणापुरते, ह्या अर्थानें कारणीक शब्द वापरलेला आढळतो. " आपला घरगुती मजकूर अलीकडे कांही कळत नाही. त्यास कसें आहे तें **कारणीक** ल्याहावें. येथे भलतेंच ऐकतों.

( पिलंभट मराठे ह्यांचें चिपळोणकर ह्यांस पत्र )

रुकसत-पाठवणूक ?

राजश्री तात्यासाो स्वाा यास वीनंती वीशेष. च्यार याजता गुलाम जेजूल आबहीजखा खासाो यास गाण्यास बोलाउन रुकसत करणे ठरवीले आहे तरी खावंदास जाहीर व्हावें."

प्रकरण १० वें

# पुणें शहरासंबंधीं माहिती

तुळशीबागवाले } **ओंकारेश्वर** { श. १६७६ आषाढ
स. १७५४ जून

ओंकारेश्वराच्या भिंतीला प्रारंभ श. १६७५ त झाला. एकंदर खर्च ६७९२। रु. झाला असावा. एका वर्षांत काम संपलें असें दिसतें. कृष्णंभट चित्राव ह्यांनीं भिंत घालण्यास सुरवात केली.

३४६॥ खातें ओंकारेश्वर कृष्णंभट चित्राव याणीं परभारे ऐवज मुबदला करून खर्च केले रु. २०१७।=॥ पो पेसजी दिल्हे १००० बाकी १०१७।=॥ पैकीं वजा· ( १६७६ आषाढ )

वरील १००० रु. चा उल्लेख असलेली रक्कम येणेंप्रो

१००० खातें वोंकारेश्वर कृष्णंभट चित्राव यांनीं पहिले भिंतीचे कामास कर्ज काढून खर्च केला त्यापैकीं शिवरात्रीच्या खर्चाबा पाशाणास पाठविले.

४०० रोख शिलकेपो

६०० पोताहून आणून दिले

तुलादानांतून सरकारनें हा खर्च अंशतः भागविला असावा कारण:

३०००॥ रु. जमा खातें वोंकारेश्वर सरकारांतून तुलादानाबा होन देविले त्याचे रुपये पोत्याहून आर्कटचे दिल्हे ते जमा. नामे रामाजी ना दातार. मिा वा १० आषाढ १६७६

ह्यानंतर श. १६८० मध्यें ओंकारेश्वर दरवाज्याचे कामाबा ३२३। रु. व "इमारत वोंकार" ह्या खातीं जिल्काद महिनियाचे वाटणीबद्दल ६३० रु. खर्ची पडले आहेत.

१६८१ च्या मार्गशीर्षांत गौतमाश्रमावर ९२५ रु. खर्च झाला आहे. व पुढच्या सालीं वैशाख महिन्यांत २५२५। रु. ह्याच कामावर खर्च झाले.

किरकोळ वैशाखमास

नांवें

२५२५।· इा गौतमाश्रम गुा नारो भगवंत

१००० जमा नारो भगवंत

७७७॥· जमा निळकंठ महादेव बेलदारकडी

७४७।।।· रोख हस्ते महादजी केशव फडणीस

२५२५।·

ही इमारत कोठें बांधली हें स्पष्ट करणारी खालील रकम आहे.

१२४ रु. श्रीगौतमाश्रम गौतमखिंडींत केला तेथें देवालयाचें उद्यापन देवाची स्थापना केली त्यास खर्च बाा हिशेब १६८४ वैशाख. (चि.

१६८३ च्या चैत्रात खालील रकमा आढळतात.

७५१ रु. पुलाच्या लांकडांचें भाडें देणें राघो बाबाजी.

७१२॥ पुलाचे लांकडाबाा लकडवाल्याचें देणें ते त्यांनीं नाथ पुर यांजकडे देविले तें दिल्हे.

इंग्रजांचा वकील १७१० साली शुक्रवार पेठेंत राहात होता.

१०७॥ रु. कचो रघुनाथ देवळालीकर याजबाा का पुणें येथील शु वार पेठेंतील घराची चांदई दक्षणची व परसांतील भींत न घातली त्याबाा माहे मारी खर्च.

५ सदरहू घराची भींत पडली तेव्हा घरांत बिराडास इंगरजाकडी वकील आहे याजकरता कोतवाल भिंत घालूं लागला ते सम त्याचें काम मना करून आपलें काम लाऊन भिंत चादई घात त्यास एक दोन रोज कोतवालानें माणसें भिंत पाडावयास ब लाविले त्याचा आजुरा मागावयास याद घेऊन कारकून आ त्याजबाा देविले ताा राजाराम चौकीदार माघ शु. ४. (तु.)

तुळशीबागवाले } नळाला खादी

रु. १। नळाचे कामाकडे पेठ मस्तानीचे बागापासून मांजरीकरीचे चौव पावेतो बसवावयास खादी

रु. २५ शु. ४ मार्गशीर्ष श. १७१४ प्रांत पुणे देणे नारायण जो धर्मादाय श्रीनरसिंहाचें देऊळ बांधिलें त्याजबद्दल.

( गॅझेटिअरमध्यें इ. स. १७८८ च्या सुमारास गणु जोशी यानें हें देऊळ बांधल्याचें लिहिलें आहे. )

तोफखाना हेंच पेठेचें नांव

रु. ५८≡ तुळसीराम तेली पेठ तोफखाना नांवें घरखर्च पेंडीबा (१६९६). पहिला वेताळ पेठ हें तेव्हाहि नांव होतेंच. "तुळसीराम तेली पेठ वेताळपेठ नजीक तोफखाना पेंडीबा अगाऊ (१६९२)."

## इमारती काम

### कात्रज

तुळशीबागवाले } { श. १६७७ इ. १७५५

नानासाहेबांच्या कारकीर्दीत सार्वजनिक उपयोगाचीं बरींच कामें पुण्यास करण्यांत आलीं. त्यांत कात्रजच्या तळ्याचा उल्लेख प्रामुख्यानें केला पाहिजे. श. १६७७ सालीं हें तळें बांधण्यास प्रारंभ झाला. ह्या कामानिमित्त पडलेल्या रकमा बहुतेक निळकंठ महादेव ह्यांच्या नांवानें आहेत. एकंदर हिशेब येणेंप्रो

| जमा रु. | खर्च रु. |
|---|---|
| २५००० सदाशिव रामचन्द्र कातरेजच्या तळ्याबा लिंगाप्पानाा तांबेकर यांजकडून देविले ते अर्काटप्रत दिल्हे (१६७७ चैत्र) | ३००० सदाशिव रामचन्द्र तळ्याच्या खर्चास १६७७ चैत्र |
| | ७४६ ,, |
| १००००० तळे कात्रज येथील कारखान्याचे नेमणुकीचे सदाशिव रामचन्द्र यांजकडून सरकारांतून देविले ते माारनीं लिंगाप्पानाा तांबेकर यांजकडून देविले आर्कटप्रत. (१६७८ ज्येष्ठ ) | ७६०० ( वैशाख ) |
| | २००० ,, ( अधिक ) |
| | ५०० ,, तळें कात्रज (ज्येष्ठ) |
| ११००० निलकंठ महादेव. दयाराम बाजी साहुकार गुजराथी याज- | ६६५॥ ,, |

| | | | |
|---|---|---|---|
| | कडे सरकारांतून पसतीस हजार रुपयांच्या हुंडीचा ऐवज तळे कात्रज येथील खर्चास देविला त्यापो ( १६७९ अधिक ) | ३००० ,, | ( श्रावण ) |
| | | १००० ,, | ( भाद्रपद ) |
| | | ५०० ,,<br>२०० ,, | ( आश्वीन ) |
| ३०००० | निलकंठ महादेव. कात्रजचे तळ्याचे कामास सरकारांतून बाळाजी महादेव मांडवगणे यांजकडून ऐवज देविला ते नांवें खुा (१६७९ अधिक) | ३०० ,, | ( कार्तिक ) |
| | | २५०० निळकंठ महादेव तळ्याच्या वाटणीबाा १६७८(वै.) | |
| | | २००० कात्रजचे वाटणीस | ( भाद्रपद ) |
| | | १३७५ ,,<br>५०० ,, | ( मार्गशीर्ष ) |
| | | ८८०० निळकंठ महादेव कात्रजेच्या तळ्याचे वाटणीस व बेलदारांस द्यावयास गुा नरसु १६७९ (वैशाख) | |
| | | १००० तळें कात्रज वडेरास द्यावयास गुा नरसु दाळिंबकर जमा लालासा (श्रावण) | |
| | | ५००० निळकंठ महादेव जमा वासुदेव नाा दांडेकर तळ्याचे वाटणीबाा दिल्हे गुा नरसु जामदार मिा शुा १० (भाद्रपद) | |
| | | ३४। तळें कात्रज दसऱ्याबाा कारखान्याकडे तिवटें १० (आश्वीन) | |
| | | ५००० निळकंठ महादेव देणें बेलदार तळें कात्रज. (फाल्गुन) | |

१५०० तळें कात्रज वाटणीस हस्ते
नरसु जामदार
१६८० ( ज्येष्ठ )
२००० जमा बाजी माणकेश्वर
( कार्तिक )
३२०० निळकंठ महादेव वाटणी
कात्रज १६८२
(अधिक श्रावण)
१००० तळें कात्रज १६८३(चैत्र)
२००० ,, ( ज्येष्ठ )
५०० ,, } ( आश्वीन )
११८= ,, }
१४०||| ,, } (मार्गशीर्ष)
८८= ,, }

ह्यावरून असें दिसतें कीं, कात्रजचें तळें बांधण्यास एकंदर जवळ जवळ दोन लाख रुपये खर्च आला व हें काम स. १६७७ पासून १६८३ पर्यंत चाललें होतें. खर्ची पडलेल्या रकमा ५६१६८|||. रु.च्याच आहेत. पण सरकारांतून १९८००० रु. आलेले तळें कात्रज ह्या खातीं जमा आहेत. तेव्हां इतका खर्च झाला असेल असें अनुमान करण्यास हरकत नाहीं.

तुळशीबागवाले } गुरुवार पेठेतील सरकारचें घर { श. १६७६ इ. १७५४

७५ रु. निळकंठ महादेव वा। १२ कार्तिक १६७६ देवचंद मारवाडी पेठ गुरुवार याचे घर पेशजी सरकारात विकत घेतले ते.

तुळशीबागवाले } { श. १६९० इ. १७६८

## तुळशीबाग

तुळशीबागेचें देऊळ बांधण्यास श. १६८३त प्रारंभ झाला.

देवळाचा पाया १६८३ मात्र महिन्यांत घातला.

१८≡ मुहूर्त पायास देवळाच्या.

पण १७१४ पर्यंत इमारतीचें काम पुरें झालें नाहीं. ह्याच सालीं २०२१८–।।

खचून उत्तरेच्या दरवाज्यावर बंगली बांधली. गच्ची तर १७१५ सालीं पुरी झाली व तिच्यावर २९७॥=॥ रु. खर्च केले गेले. एकंदर खर्च १३६६६७ रु. तुळशीबागेवर झाला. ह्यांत मंडप ५१२०, ओंवऱ्या ६३४९, वृंदावन १५८ ह्याप्रमाणें खर्च झाला. हणमंताचें देऊळ १६८९ मध्यें बांधलें १६८५ च्या मार्गशीर्ष महिन्यांत १ रु. "देवळाचे मुहुर्तास उंबरा बसवावयास" ह्या तपशिलानें रक्कम नांवें पडली आहे. कामावर गुजराथी सुतार होते. देवाला उत्पन्न किती होतें तें खालील रकमांवरून दिसेल.

जमा श्री खातें गांवगन्ना नेमणूक. श्रीचा ऐवज येणें तें.

४४१॥ कसबें चाकण
५० मौजें आवी ता। चाकण
६०॥। खान शंबलें ता। ,,
२६० कसबें पाटस प्रां। पुणें
२०० मौजें लोणंद नीरथडी
१०० ,, निंबगांव
१०० ,, लाखणगांव ता। पाबळ

(कुलाबा जिल्ह्यांतील कराडें हा गांव आंग्र्यांनीं देवास दिला होता.)

७४ रु जमा माजे कराडें ता। तुंगार्तन प्रां। करनाला श्रीकडे इनाम राघोजी आंग्रे यांनी दिल्हा त्याजबा। ऐवज सालमा।र गु। देवराव देसाई व कृष्णाजी जिवाजी भावे सदरहु गांव गुदस्तां दिल्हा असे

१०००।= श्रीखातें सरदेशमुखी ता। चाकण देहे ४ एकूण नामे सदाशिव रघुनाथ कानिटकर गायकवाडाकडील सालमारीं इनामपत्रें करून घेतलीं १६९१ पौष.

२०० मौजे लाखणगांव ता। पाबळ रु. १०० व मौजे निंबगाव रु. १०० जमा श्रीखातें होळकराकडील वर्षासनाचे
(पाटसगांवचें उत्पन्न शिंदे यांजकडील होतें.)

२०० कसबे पाटस जमा श्रीरामचंद्र, शिंद्याकडील वर्षासनाचें सन तिसाचे-बद्दल पत्र महादजी शिंदे

श्री रामचंद्राच्या मूर्तीवर घालण्यास शिरपेंच १६८४ त केला त्यास १७०।= रु. पडले.

तुळशीबागेकरता घरें खरेदी केलीं असावीं; एका घरासंबंधानें उल्लेख आढळतो. १४० रु. खरेदी घर पखाले यांचे घेतलें नजीक तुळशीबाग ( १६८४ भाद्रपद )

३७२ उमाजीबावा पंढरपूरकर श्रीच्या मूर्ति करण्याबा हस्तें नारोबा ब्रह्मचारी. ( हा मुख्य मूर्तीचा खर्च होय. )

हनुमंताच्या मूर्तीला ४० रु. पडले असावे.

४० रु. बखतराम पाथरवट गुजराथी. हनुमंताचे मूर्ती बा

( १६८७ मार्ग. शु. २ )

हनुमंताच्या मूर्तीला झिलई दिली त्याचें सामान

१३||= खर्च बखतराम पाथरवट हनुमंताचे मूर्तीचे झिलाईबा सामान.

१० रुपये नक्त

१||| कथील

||= शिसें

·|· भाग

१ कुरुंद

१३||= ( १६८९ आषाढ )

हनुमंताचे अर्चेस ५२८= रु. लागले.

गणपतीची व पार्वतीची मूर्ती नारायण पाथरवट यानें घडली.

४० रु. नारायण पाथरवट परदेशी देवाच्या मूर्तीबा माघ बा ९ ( १७०३ )

२५ गणपतीची मूर्त रु. ५० पो दिल्हे.

१५ पार्वतीच्या मूर्तीचा करार ३० रुपये

देवाच्या अंगावरील दागिन्यांची चोरी झाली. सबब १७११ मध्यें २०१४||| रुपयांचे दुसरे दागिने करून देवाच्या अंगावर घातले.

रामनवमीच्या उत्सवास दोन हजारांवर खर्च करण्यांत येत असे. शक १६८९ मध्यें दर ब्राह्मणास १ रु. प्रमाणें ११६७ ब्राह्मणांस दक्षिणा देण्यांत आली. कांहीं सालांचा खर्च येणेंप्रो.

१६८५ ३२५६ रु. ह्यांत १ रु. आपाजी वाणी देहुकर; २ रु. विठोबा चावर; ४४ रु. गुणीजन व नटवे असा

खर्च आहे.

| | |
|---|---|
| १६९० | २२४७ ,, |
| १६९१ | २५९३ ,, |
| १६९५ | २१९४ ,, |
| १६९७ | २२५३ ,, |
| १६९९ | २०८२ ,, |
| १७०८ | १३३३ ,, ह्यांत ७९॥ रु. श्रीमंतांच्या प्रसादाबद्दल आहेत. |

( १६८३ मध्यें दागिने फार नव्हते असें वाटतें. )

१६९ रु. तुळसीबागेंतील मूर्तीकडे—मुरलीदास वल्लभसुंदर जवाहीर ४० रु. कुंडलास माणकें जोडी १; रु. १२९ कंठी ( ८१ रु. माणकें २४ दर ३।=; रु. २० माणकें २ दर १०; रु. ८ नील २; रु. २॥ पाचा २; रु. ७ लोलक पाचेचा; रु. १०॥ पान कंठीचें ). पण १६८४ मध्यें १११८॥= रु. "घरखर्च दागिने खातें अलंकार श्रीरामचन्द्र, सीता, लक्ष्मण" पडले आहेत.

( तुळशीबागकराचे जमाखर्च )

तुळशीबागकरांचा महिन्याचा खर्च हजार दोन हजार रुपये होत असे. उ.

श्रावण—— २१०४ रु.
कार्तिक—— २१६१ "
माघ—— ३२०६ "

त्यांस १७२१ सालीं १०० रुपये एकोत्रा व्याजानें कर्ज काढावें लागलें.

१०० गोविंद भट फणसे यांजकडील कर्जाऊ ऐवज आणिला तो व्याज दर सेकडा १ प्रो.

तसेंच

५ बक्षीस आबाजीपंत यांनी अडीचशें रुपयांचें काम करून निकडचे वेळेस दिल्हे ( १७२३ भाद्रपद ).

## पर्वतीचें तळ

( पर्वतीचें तळें बांधण्यास श. १६७५ सालीं सुरवात झाली व तें काम जयाजीराव शिंदे यांच्या मार्फत चाललें असावें. कारण ह्याबद्दलचा जमाखर्च त्यांच्या नांवानें आहे. )

जमा

रु. १४९८५ जयाजी शिंदे पर्वतीच्या तळ्याबाा श्रीमंतांनीं माारनिल्हेकडून देविले रु. पंधरा हजार ते जमा गुाा सदाशिव अनंत. सदरहूपैकीं वजा खोटे हीणाचे व तांब्याचे अमानत आहेत रु. १५ बाकी अर्काटगंजी.

( १६७५ आश्वीन इ. १७५३ )

नांवें

२२९५   १६७५ पौष जयाजी शिंदे देणें बेलदार पर्वतीच्या तळ्याच्या कारखान्यावर खर्चास

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १४०० | | माघ | ४५८३॥। | ,, | माघ |
| ८७०॥= | | फाल्गुन | २६४३॥।= | ,, | फाल्गुन |
| ५२० | | ,, | ३००० | ,, | ,, |
| ३५७॥ | १६७६ | चैत्र | २९१० | श. १६७७ | चैत्र |
| १३४५॥ | ,, | ,, | १६९६। | ,, | वैशाख |
| ५९६॥ | ,, | वैशाख | ६२३॥ | ,, | अधिक |
| ११० | ,, | ,, | ३३० | ,, | ज्येष्ठ |
| ४०६३ | ,, | ,, | १२० | ,, | ,, |
| ११५ | ,, | ज्येष्ठ | ६। | ,, | ज्येष्ठ. मजुर माणसे तळ्यावरील दूर केली तेव्हां ज्याकडे फाजील होते ते घेऊन देणे निघाले त्यास दिल्हे. |
| ७७५ | ,, | आश्वीन | | | |
| ४३५ | ,, | ,, | | | |
| २२५॥। | ,, | कार्तिक | | | |
| १४५ | ,, | ,, | | | |
| १३१८ | ,, | ,, | ४०५५ | ,, | भाद्रपद सन खमसचें देणें निघालें ते. |
| ९९७८= | ,, | मार्गशीर्ष | | | |
| ९६५ | ,, | पौष | ८१। | ,, | आश्वीन |

( ह्यावरून असें दिसतें कीं ह्या तळ्याचें काम दोन वर्षे चाललें होतें व एकंदर खर्च ३६५८३॥।= रु. आला. )

पर्वतीच्या भिंतीच्या कामास श. १६७६ च्या श्रावण महिन्यांत आरंभ होऊन तें काम श्रीपतराव बापुजी यांच्या देखरेखीखालीं झालें असावें. श. १६७७ च्या आषाढांत शेवटली रकम खर्च पडली आहे. "भिंत पर्वती" साठीं ५४९२॥।- रु. खर्च पडले आहेत. शिवाय निळकंठ महादेव यांच्या नांवें पर्वतीच्या

कुसाबा म्हणून १६७६च्या कार्तिकांत ७११ रु. खर्च झालेले आढळतात.

५० रु. पेठ गुरुवार येथील कुळांस पर्वतीच्या तळ्यांतील माती काढण्याची बिगार सरकारांतून लागली. ९७ मजूर माणसें ठेऊन काम चाललें त्याजला द्यावयास मोघम हस्तें आनंदराव कारकून(१६९०).

४०० रु. नहर पर्वती गाळ काढण्याच्या मजुरीबा. श. १७०४ (तु.)

रा. खासगीवाले याच्या दफतरांत इमारतबाधाईचे तीन जमाखर्ची कागद आहेत. त्यांत श. १७३३ चा एक कागद आहे. ह्या सालीं रामेश्वर देवळाचे धर्मशाळेचे साडेतीन खण नवे बाधले. हें सर्व काम १३९।– रुपयात झालें. ह्याचा तपशील सामान्यतः येणेंप्रमाणें– ९।– कड्या ३१; ७॥·॥ गज्या सागवानी; २ रायवळ गज्या; १६८=॥ सागवानी वासे ६०; ४॥। वेळु वोमणास; ९॥≈ विटा २९८५; १०॥ कौलें ४०००; ३८≈ खिळे पट्या लोखंडी काम ह्याचा तपशील असा

२।= नागफणीचे
।≈ गुलमेखा गज बसवावयास वजन ८८॥९ दर ८८१॥
।= वरले मजल्यास खिडक्या दोन केल्या आहेत त्यास
·।· गुलमेखा कल्हईदार ८८।४॥
८= कडी व कोंडा मिळून २
।=

७२॥– एकंदर मजुरी

कामावर ४ सुतार असून त्यांची मजुरी प्रत्येकीं १५, १४, १२ आणि १० रु. दरमहाप्रमाणें होती व ४ जणांनीं मिळून ७० दिवस काम केलें. पाथरवट व गवंडी ह्यांचा पगारही दरमहा १२ रु. प्रमाणेंच होता. मजुरी रोजावर नसून माहेवार होती हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. गड्याला दरमहा ५ रु. व पोराला आणि बायकोला दरमहा ३ रु. प्रमाणें मजुरी होती. अरकशाला रुपयाला ६ ते ८ सुतें ह्याप्रमाणें दर मिळे त्यांत "पैकीं वजा कारकुनी १८≈" जाऊन बाकी ५६ रु. बोहऱ्यास दिले.

सुतारांची मजुरी दरमाहा १२ पासून १५ पर्यंत, गवंडी १२ पासून १३ पर्यंत; पाथरवट १४ रु. आढळते. गड्यांचा पगार दरमहा ३ ते ५ पर्यंत होता.

## नहरकारखाना

श. १६९१ मध्यें नहरकारखान्याला हात घातला. १६९४ मध्यें हें काम संपलें. गोपाळ वैजनाथ याच्या देखरेखीखालीं काम चाललें असावें. श. १६९३ ची वही नसल्यामुळ नक्की खर्चाचा आकडा निघणें शक्य नाहीं. पण १६९१, ९२ व ९४ या तीन सालांत गोपाळ वैजनाथ कारखाना नहर ह्या खात्यांत ७७३२० रु. पडले आहेत. कात्रज तळयाच्या नळाचें हें काम असावें. ही सर्व रकम सरकारतिजोरींतून गेली आहे. ह्याच वेळेस शिंद्यांचा गांव जमींत होता. त्याचें सालिना उत्पन्न ६५०० रु. ह्या कामाकडे खर्च करण्यांत आले.

४७७०० गोपाळ वैजनाथ कारखाना नहर सरकारातून ऐवज रु. ७५००० गु॥ आबाजी नाईक काबरसपैकीं छ ९ जिल्हेज.
२२७०० पहिला खर्च झाला तो ऐवज उगवून घेतला.
२५००० पुढें काम चालवावयास.
४७७००

२७३०० त्र्यंबक तान्हाजी कारखाना मोरी सरकारातून ऐवज इमारतीस देवविला गु॥ काबरस रु. ७५००० पैकीं नहराकडे ४७७०० बाकी छ ९ जिल्हेज (१६९४ फाल्गुन).

यावरून सरकार प्रथम खर्च करून लोकाकडून येईल तो वसूल करीत असे, असें दिसते.

त्रिंबकजी डेंगळयाचा वाडा शुक्रवार पेठेंत होता. श. १७४२ (चि.)

नरसिव्ह पेठ पुणें

" प्रतिवादी बाळाजी सकदेव कुळकर्णी मौजे बहुली हली वस्ती पुणें पेठ नरसीव्ह "

नरसिंह पेठ—आमचे घर राहते पुण्यांत नरसिंहाचे पेठेतील शेजार गणेश गोविंद भिडे ( एकबोटे याचें खत शके १७२३ इ. १८०१ ).

सरकारच्या कुणबिणीचें घर-घर पेठ बुधवार भाजीवोळींतील हौदाचे मागें बोळांत शिंदे वोळींत. चतुःसीमा दक्षिणेस बोळ. बोळापलीकडेस घर सरकारच्या कुणबिणीचें असे (शके १७३४ चैत्र शु॥ १) (चि.)

शनवार वाड्याच्या आंत चौक्या कोठकोठें होत्या हें खालील खर्ची रकमांवरून कळेल.

इनाम निा श्रीमंत (श. १७०५)

रु. १ आरसेमहालाचे चौकीदार

,, १ देवघरचे चौकीदार (खा.)

देहेनगी खर्च श्रीमंतांकडील माणसें

,, ४ माजघराचे चौकीदार यास पोस्ताबा

,, २ दिल्ली दरवाजाचे आंतील दरवाजाचे चौकीदारास

,, १ देवघरापुढील चौकीदार

,, २ आरसेमहालांतील चौकीदार व खासबारदार अप्पासाहेबांकडील माणसांस

,, १ जाळीच्या जिन्यांतील चौकीदारास

,, १ देवघराकडील ब्राह्मण चौकीदार (खा.)

सरकारवाड्यांतील आरसेमहाल चौकी, वृंदावनाजवळील चौकी, तिरंदाजीची चौकी इतक्या चौक्यांचा उल्लेख १६८३ च्या जमाखर्चांत सापडतो. त्याचप्रमाणें नाना फडणीसाच्या विष्णूजवळील चौकीदारांस व जिन्याच्या चौकीदारांस पोस्त दिल्यामुळें त्या चौक्यांचा निर्देश आला आहे. तसेंच हरिपंत तात्यांचा पलंगाजवळील चौकीदार टीकाराम यानेंहि १ रु. पोस्त शिमग्याचें मिळविलें आहे. (तु.)

वैद्य } {श. १७३४ ज्ये. स. १८१२

८ रु. सरकारवाड्यातील चौकीदार व हुजरे वगैरे सालाबादीप्रो वाडा शुक्रवार.

रु. २ खालचे मजल्याची चवकी हस्ते भगवानसिंग.

,, २ दुसरा मजला हस्त बीदर्सींग व तीलर्सींग.

,, २ पड्या जवळचा दुसरा मजला हस्ते मोतीसींग व बत्तीराम.

,, १ चवथे मजल्या............सीवासिंग......

,, १ तिसरे मज.........जतनसिंग.........

८

रु. ४ चौकीदार वाडा शुक्रवार गाा हवालदार

२ प्रथम चौकीदार विठोजी व दारकोजी

२ चौकी दरवाज्याची देवडीखालचे मजल्याची. देणे भवानसींग व धनसींग ( कार्तिक श. १७३४ )

·॥ बोळाचे चौकीदार

·॥ बाजीरावसाहेबांचे दिवाणखान्याचे चौकीदार

तुळशीबागवाले } हेटकरी चौकीदार { श. १७१२ मार्ग. स. १७९० डिसे.

रु. ८४० देणे लोक हेटकरी वगैरे शहर पुणें येथील चौक्यांस आहेत त्यास रोजमरे याचे आकार पो दुमाही पोटगीबाा खर्चास.

७१८ हेटकरी लोक

१२२ गाडदी

तुळशीबागवाले } { श. १७१८ स. १७९६

रु. १०० श्रीमंत रा. बाबासाहेब यांजकडील जामदार वगैरे यांस इनाम.

———

## प्रकरण ११ वें

# संकीर्ण



### वकिलीची परीक्षा

श्री

मार्गशीर्ष शु. ३ शके सर्वजित नाम संवत्सरे

तीर्थस्वरूप राजमान्य राजश्री तात्यासाहेब वडिलांचे सेवेसी अपत्ये बालके अनूचे दोन्ही कर जोडून त्रिकाल चरणांवर मस्तक ठेऊन शिरसा.नमस्कार विज्ञापना तागायत कार्तिक वा। ३० रविवार पावेतो आपलें आसीरवादेंकरून मुक्काम मुंबई येथें सुखरूप असों.विशेष कालरोजी सदर अदालतींत सरटिफिकीटे देऊन रुजू झालों. यंदा परिक्षेस उमेदवार मंडळी ५४ आहेत. परिक्षेस लिनिट साहेब बसणार. येथील सर्वत्र कामगार लोकांच्या भेटी वगैरे घेतल्या. त्यांचे म्हणण्यांत यंदा फार कठीण परिक्षेस उतरणे असे आहे. उद्योग व प्रयत्न फार करीत आहे. यश देता परमेश्वर व आपला आसीरवाद. यंदा फक्त आदालतीमा। परिक्षेचा धाट आहे, कारण मागील सालीं फार गैरशिस्त परिक्षा जाहली. याजकरितां सर्वत्रास कोणास भरवसा नाही. उदयिक परिक्षेस प्रारंभ होणार. रोजचा मा। सविस्तर विनंतिपत्रांत निवेदन करीन. राजश्री वामनरावजी अजून ठाण्याहून आले नाहींत. सायंकाल-पावेतो येतील असें आहे. परंतु यंदा साहेबापुढें कोणाचें चालेल असे दिसत नाही. कळावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. (चि.)

श्री

तीर्थस्वरूप राजमान्य राजश्री तात्यासाहेब वडिलांचे सेवेसी

आपत्ये आनूचें दोनी कर जोडून चरणांवर मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना ता। मार्गसीर्ष शु॥ ८ रविवारपो वडिलाचे आसिरवादेकरून सुखरूप असो विशेष यंदाचें सालीं परिक्षेचें मान फारच कठीण आहे. कारण लिनिट साहेब याचे मनास कोणास पार पाडण्याचे दिसत नाहीं. पेस्तर सालामुळें यंदा लोकास फारच इजा आहे. त्यातून गोरनर कौसलास रपोट करून फोर्जीट साहेब

यांस आणविले त्यास ते तर फारच जिकीर करीत आहेत. येथील सर्व कामदारा-चेंहि म्हणणे कीं असी परीक्षा कधीही जाहली नाही. यांतून पार पडणारे उमेदवार ५४ पैकीं दोनचारच दिसतात. येथें शिरस्तेदार वगैरे कोणास परीक्षेमधें घेतले नाहीं. सर्व जातीनेच पहात आहेत. कळावे. श. १७६९ (चि.) रवाना मुंबई.

## गुळसुंद्यास बंदुका

तुम्हीच येथे याल तेव्हां ज्या बंदुका येथे आहेत त्या पाहाव्या आणि तुमचे पसंत पडेल ती न्यावी. हाली ज्या राहिल्या आहेत त्या भारी आहेत. हलकी बंदूक राहिली नाहीं. वै. वा १४ [श. १७५०] (गुळसंद्याहून पुण्यास चिपळूणकरांकडे).

चिपळूणकर } कवाईत { श. १७६४ स. १८४२

" आपली गाठ पडली नाही. कवाईत पाहण्यास गारपीरावर स्वारी गेली होती." श. १७६४ तात्यासो. चिपळोणकर ह्यांस पत्र.

## पुण्याचे लोक

"परंतु तेथें सुधारले लोकांचा सहवास नसावा आणि पुण्याचे लोक चांगले चालीचे नाहीं सबब दोन चार महिने कांहीं सहवास तुटावा" (तात्या सो चिपळो-णकर यांस नाशकाहून कृष्णाजी कचेश्वर ओक ह्यांचें आलेलें पत्र श. १७७५)

राजे शिरके यांजकडून गहाण ठेवलेल्या गावाची वहिवाट करण्याकरितां चिपळूणकर यानीं मोरो बापूजी गोरे यांस ठेविलें, त्यासंबंधींचा करार—

१ पुण्याहून दुसरा कारकून पांचगांवचें वहिवाटीस आल्यानंतर कागदपत्र व शिल्लक व मोर्तब व सनद त्यांचे स्वाधीन आपलें पत्र पाहून करूं.

२ चाकरी इमाने इतबारें दगलबाजी न करितां करूं.

३ पुण्याहून दुसरा कारकून पाठविला नाहीं आणि वहिवाट आमचे हातून घेतल्यास सालिना वेतन रु. ५० भोजनखर्च खेरीज करून तुम्ही आम्हांस द्यावें.

४ शिल्लक आपले घरीं पांच रूपयांवर जास्ती ठेवणार नाहीं. खातरजमेची लायक असामी साहुकार पाहून त्याकडे ऐवज जमा करीत जाऊं आणि जितका ऐवज जमा होईल, त्याची पावती आपले जवळ बाळगूं. आणि साहुकार याचे घरीं तुमचें नांवे ऐवज जमा करून शिल्लक बाकी रकमेचा झाडा राखीत जाऊं.

सावकाराचें नाव पुण्यास लिहून पाठवूं.

५ अखेर सालीं पुण्यास येऊन पांचगांवचा कच्चा हिशेब तुम्हांस समजावून देऊं.

६ वसुलाचे कामावर शिपाई असामी एक अगर दोन असेल त्याचा रोजमरा दरमहा रु. २॥ प्रा दरमहा सिलकेपैकीं देत जाऊं.

७ तुमचे परवानगी खेरीज सिरके यास ऐवज देणार नाहीं. दिल्हा असता मजुरा देऊं नये.

८ पावती खोतास दिल्याखेरीज नक्त व गला घेणार नाहीं. वगैरे

चिपळूणकर } **काशीच्या प्रवासाचे मुक्काम** { श. १७४८ इ. १८२६

| मुक्काम | मिति | मुक्काम | मिति |
|---|---|---|---|
| कामथडी— | फा.शु॥१ | अमरपागंज— | फा. वा॥ ४ |
| रामटेक— | ,, २ | मुकुंदपूर— | ,, ५ |
| कुरईचा घाट— | ,, ४ | पणुनाथगंज— | ,, ६ |
| गणेशगंज— | ,, ७ | मोहोगंज— | ,, ७ |
| धुमा— | ,, ८ | हजमजगंज— | ,, ८ |
| सिंगपुरी— | ,, ९ | कटडा— | ,, ९ |
| नर्मदा— | ,, १० | लालगंज— | ,, १० |
| जबलपूर— | ,, ११ | री...वासणी— | ,, ११ |
| घासलपूर— | ,, १२ | मिरजामुरामपूर— | ,, १२ |
| नर्मदेचा घाट | | आसी— | ,, १४ |
| संजयगंज— | ,, १५ | | |
| गोजवाडा— | ,, वा॥१ | | |
| मेहेर | ,, वा॥२ | | |

## गव्हर्नरसाहेबांची पाठवणूक

" मेहेरबान गोरनरसाहेब लवकरच जाणार तेव्हां त्याची बिदा येथून पारसी मोठमोठे दुकानदार व सरंजामी व पेनसीलवाले व बडे लोक सावकार याणी करावी. त्यास सर्वांच्या नांवें पट मुंबईस जाहला आहे. त्यांत मोठमोठे पारसी तेथील दुकानदार याणी लुच्याइनें आंकडे दहा हजारपासून पंचवीस हजारपर्यंत टाकिले आहेत. त्यांत देतील ते देवोत. परंतु येथें सर्वत्रांस दाखवण्याकरतां

एका दो रोजांनीं सरकारवाड्यांत मजालस होणार असें ऐकतों. तेव्हां येथें मजालस करून याद सर्वत्रांपुढें टाकावी आंकडे भरून घ्यावे असा बेत जाला आहे. त्यास तूर्त येण्याचा बेत लांबणीवर घालावा. मागाहून लिहून काय होईल तें पाठवीन. मला येथें बोलावणें आल्यास यजमान येथें नाहींत म्हणोन सांगेन व मी जाणार नाहीं. " (कृष्णाजी हरि यांचें दाजिबा चिपळोणकर यांस पत्र आ. शु. १२ श. १७४९.)

कालचे पत्रांत मजकूर लिा त्याप्रमाणें याद आली व कालच बोलावणी सर्वांस होऊन मजलस रा. लक्ष्मणराव माणकेश्वर यांचे घरीं जाहली व बोलावणी माणकेश्वर यांचा कारकून करीत होता. आपलेकडे बोलावणें आलें होतें त्यास सांगितलें कीं वडील येथें नाहींत. नंतर त्यांनीं सांगितलें कीं तुम्हीच यावें. त्याजवर त्यास विचारलें कीं कारण काय. त्याणें सांगितलें कीं, गोरनरसो विलायतेस जाणार त्या प्रकरणीं कागदपत्र कांहीं माणकेश्वर याजकडे आले आहेत सर्वांस ते समजावें याजकरतां बोलावणी होतात. याप्रो सांगोन गेला व पुन्हा दोन प्रहरीं बाळाजीपंत दादा याजकडून शिष्या व माणकेश्वर यांचा कारकून मजलसींतून बोलावण्याकरतां आला होता. त्यास सांगितलें कीं माझे पायास फोड जाहला आहे. पाय दुखतो चालवत नाहीं याजमुळें येत नाहीं व पाय हल्लीं दुखतो हेंहि आहे. त्याजवर तेथें यादीवर आंकडे मोठमोठे गृहस्थाचे पडले त्याचा तपशील.

२००० बाळाजीपंत दादा.
२००० माणकेश्वर.
५० नारायण दीक्षित.
१७५ त्रिंबकपंतभट अमीन
७५ बाबाजी भिडे
४००० भाऊमहाराज.
१००० आण्णा समशेर.
१७५ भय्या राजे बहादर.
१२५ वासुदेव शिवराम.

......सर्वांनीं आंकडे घातले व आपण घातले नाहीं तर बाळाजीपंत दादांस नीट वाटणार नाहीं. मुख्यत्वें त्यांनीं व ढमढेरे यांणींच ही गोष्ट उत्पन्न केली आहे. आंतून आपण आहेत. बाहेर नांव मात्र माणकेश्वर यांचें आहे. (चि.)

## सत्यनाथपूर

रु. २००० कोंडोजी बाजी गाडगीळ देणे येमुनाबाई गाडगीळ मुा वाई सत्यनाथपूर. (तु.)

सत्यनाथपुरी—वाईचे मोरभट बिन विश्वनाथ लेले यांना चिपळूणकर यांनी सत्यनाथपुरींतील घर विकलें श. १७३४ (चि.)

## सत्याग्रहाचा नमुना

वाटणी व्हावी याजकरिता आम्हीं वैशाख वाा १० दशमीस जाऊन उपोषण अडीच प्रहर पावेतो केले. नंतर या वाड्यांत येऊन अस्तमान जाला. असे तीन दिवसपर्यंत जाले. परंतु वाटणीवीसी पहिला दिवस आहे. चिरंजीव आनंदराव याचे लग्न अद्यापि जाले नाहीं. व केशवराव याचा व्रतबंध जाला नाही. व चि. अंबूचेहि लग्न झालें नाहीं.......(चि.)

## नारळीचा रस

......याने तीन सालचे कराराने म्हणजे शके १७८१ परियंत करून घेतली आहे. त्याजविसी लोखंडे यानी हरकत केल्यावरून मी खावंदाकडे अर्ज केला असून आखेर फर्स्ट मेहेरबान असिस्टंट साहेब बहादूर यांचा हुकूम अर्जी नं. ५१२० ता. ६ जुलै सन १८५७ इ. स झाला. त्याप्रमाणे सदर्हु बागेंतील झाडें नारळीचा रस काढण्याकरीता माझे ताबी झालीं. त्याप्रमाणे त्या झाडाचा रस काढण्याचा मालक मी असून त्याचा रस काढण्याची वहिवाट माझी आहे. हल्लीं सरकारातून कावसजी नवरोजी पारसी यानी ता. १ जानेवारी सन १८५८ पासून रस घेण्याचा मक्ता केला आहे. यास्तव नारळीचा रस पांच शेर परयंत खपा पुरता ठेवून बाकी रस मक्तेदार पारसी यास विकत द्यावयाचा अशी समजूत रघुनाथ हरी चिपळूणकर यास मामलेदार हवेली याजकडून मिळाल्यावरून चिपळोणकर यांसपासून मी पूर्वी झाडें पेशजी शके १७७७ साली नारळीचा रस काढण्याकरिता घेतली सबब चिपळोणकर यानी मक्तेदारास हुकमाची समजूत देली. त्याप्रमाणे पाच शेर खपापुरता ठेवून बाकी रस उत्पन्न होईल तो मक्तेदार यांस विकत देण्याविशीं कबूल असून मक्तेदार यास रस देण्याला गेलों असता ते घेत नाहीत असे आम्हास सांगितले. तेव्हा तो माल शिल्लक ठेविला आहे. त्याचा नाश मक्तेदार घेत नाही सबब होत आहे. याजकरितां खावंदानी मक्तेदार यांस समक्ष बोलावून

रसान्वा निरक सरकारचे मरजीस येइल त्याप्रमाणे ठरावून देऊन रस पारसी यास घेण्याविशीं हुकूम व्हावा. (चि.)

## गव्हर्नराविषयीं

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री दाजीसाहेब चिपळूणकर स्वामींचे सेवेसी पोष्य शंभूराव कृष्ण पटवर्धन मुा जंजीरे मुंबई. कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरि येथील कुशल ताा आश्वीन वद्य १३ पावेतों वर्तमान येथास्थीत असे विशेष आम्ही आपली मार्गप्रतीक्षा येण्याची पुणे मुक्कामी केली परंतु आमचा लाभकाल नाही अस्तु. दीपवालीपर्यंतही राहाणार होतो परंतु गवरनर यांची स्वारी लवकर जाणार यांजकरता निघून आलो हल्ली येथे आल्यावर गवरनर साहेब यांची भेट घेऊन मौजे कोरेगाव ताा चाकण पो वाडे हा गांव मोबदला देण्याविसी याद लिहून दिल्ही आहे पेशजी गांव तुम्हास पाहिजे तो पाहून पुणे नजीक सांगावा म्हणोन जाहलाच होता त्यावरून हा गांव पसंत करून याद लिहून दिली आहे. वडील आसीरवादेकरून हुकूम रॉबीनसन साहेब याजकडे लवकरच जाईल. तेथून चवकशी होऊन आल्यानंतर भोगवटियास सनद सरकारांतून करून देतील. बडोद्याचे रिजिडंट उलियेम साहेब येथें आहेत. गवरनर मालकम साहेब आल्यानंतर भेटून जातील त्यांची दोस्ती फार आहे. तेहि पंधरा वीस दिवसांत येऊन पोहोंचतील अशी येथें खबर आहे. गवरनर अलफिंट साहेबहि ते आल्यावर दो चार दिवशी जाणार अशी खबर आहे. उलीयेम साहेब बडोद्याचे यांची मेहेरबानगी आपल्यावर आहे, फार लोभ हल्ली करितात. त्याजबरोबर जाऊन तिकडील कामे धारल्याप्राो सीध करणार श्रीगजाननचरण व वडील आसिर्वादे घडोन येतील आम्ही कांही मजकूर चिरंजीव कुशाबाजवळ बोलिलो होतो तो मार आपणास त्यांनी निवेदन केला असेल. घरी चिरंजीव बया आहे तिचे समाचाराविसी व हरयेकविसीं मी ल्याहावे असे नाही उपरोधिक दिसेल.

चिरंजीव राजश्री कुशाबा यास शंभुराव याचा आसीर्वाद. विनंती उपरि इकडील मार दाजी साो यास लिा आहे त्यांवरून कळेल तुम्ही दाजीसाहेबपासी गडी ठेविला आहे तो अबदागिऱ्या आहे याजकरिता तो गडी आम्हाकडे पाठवावा. उन्हाळा दिवस आहे आबदागीर धरावयास पाहिजे म्हणोन लिहिले आहे त्यास तो गडी पाठवावा सर्व मजकूर बडोद्यास गेल्यावर ल्लिहीन साहेब फार लोभ करितो

ही खूण समजावी. पत्र कोणास दाखवू नये हे आसिरवाद. चिरंजीव तात्या व आप्पा सो यांस आसिरवाद. (का. शुा ३ शके १७४९) (चि.)

पेशव्यांसाटीं तांदूळ

रु. २०० नारायण भट वैद्य मौजे सांजई का बुरबाड ता नेरळ प्रा कल्याण तांदळाचे खरेदीबा गुा धोंडो विश्वनाथ दिा जवाहीरखाना (श. १७००) (तु.)

घडणी

रु. ११ नेवासें खातें पा मार येथील घडणी चिमणाजीपंत वगैरे यांनीं केली निा एकबेर्जी त्याबा ( १७०४ )

५ हुजूरचे कारकून तात्या साठे निा एकबेर्जी यास घडणी बा ( १७२० )

२५० श्रीपतराव बापुजी देणें हुजुर पोत्यांतून मिरजेस उसणे घेतले होते ते दिल्हे ( १६७० ).

जमा किल्ले पुरंधर

रु.२५००० रु. किले पुरंधर. किले मजकूरचे बेगमीस सरकारांतून दिल्हे नामे श्रीमंत पंत प्रधान विा नाना फडणीस ( १६८९ )

५००० किले पुरंधर दरवाज्याचे इमारती बा राघो नारायण कर्वे याजकडे वरात १५००० पो वसूल ( १७०० )

सरकार मागणी. दुसऱ्या बाजीरावाची कारकीर्द

२४ रु. पालखीकडे. जुन्नरचे कामगिरीस सरकारांत मागितली. त्यास पालखी येथें लागती. याजकरतां भोयाबा पैका दिल्हा बा याद भोई आा ८ दर ॥ प्रो एक रोजा रु. ४ येणेप्रो सहा रोजा रु. २४ रोख हस्तें जनार्दन गोपाळ लघाटे ( १७१९ चैत्र )

बाळोजी कुंजीर

६० रु. देणें बाळोजी कुंजीर वरातेच्या वगैरे बोलण्याचे

## घाट व तळीं

श. १७०१ सालीं जेजुरीचें तळें बांधलें त्यास १०००० वर खर्च आला. तो पेशव्यांनींच केला असावा. कारण :

श. १७०६ मध्यें ३३६० रु. खर्चून प्रवरा नदीला वांट बांधला.

५००० रु. जमा मिा वा ९ जेजुरी येथें तळ्याच्या इमारतीबा ऐवज सरकारांतून महादेव भट सारंगपाणी यांजकडून देवविळे रु. १०००० पो (आश्वीन) (वैद्य)

बोरघाटचें तळें १६८१ व ८२ सालांत बांधलें. सुमार ५०३० रु. खर्च पडला आहे.

१०० आबा जोशी परशरामकर याजकडून क्षेत्री पाण्याची तळीं बांधविली त्याज पो ठरले रु. २०० पो रोख पाठविले हस्ते खुद (श. १७३५ भाद्रपद) (वैद्य)

श. १६८१ साली तुळापूर येथील पायऱ्यांबद्दल १२००० रु. सरकारी पोत्यांतून खर्च पडले आहेत.

वैद्य } { श. १७२२ ज्येष्ठ<br>स. १८००

७॥. वाड्याबाा खंडणी देणें जरीपटकेवाले पुरंधरे क्षेत्रास खंडणी पडली रु. ७००० पौ. खाजगत वाड्यावर ठराव रु. १५ पौ मोघम दिल्हे. घडणी माघारी येते म्हणून. ताा कृष्णंभट गाडगीळ.

वैद्य } { श. १७२२<br>स. १८००

१० खंडणी खर्च बावधनच्या शेताबाा देणे पानशे तोफखाने ठराव रुपये २० पौा निम्मे वाटणी शके १७२२ कार्तिक

वैद्य } स्वभाव { श. १७६५ वै.<br>स. १८४३

८≈ नुकसान खर्च कंदिलाचे गलास पानसे यांजकडून आणलें होते त्यापैकी १ गलास फुटला सबब नवा खरेदी करून दिल्हा तो गलास भिंगाचा

खाजगीवाले } { श. १७१२<br>स. १७९०

जमा रु. ७८॥ वस्ता गमावल्या स्वारींत त्याबाबत.

रु. १० चवरी सटवा कामस्यानें गमावली.

,, ५० नीमचा जावजी जमदाडा.

,, ७ मोती देवाचे नागाचे रामभट गोरे यानें गमावलें त्याची किंमत.

,, ७॥ चमच्याबाबत.

,, ४ कढईबाबत.

१। माणसाकडून तपेले गमावलें होतें त्याचा पैका माणसाकडून घेऊन तपेलें घेतलें पुढें गमावलेलें तपेलें सांपडलें तेव्हां माणसाचा पैका माघारा देणें पडला तो खरेदीकडे खर्च लिहून दिल्हा असेबा। ८८॥९ दर १॥।= प्रो. एकूण. ( खा. ) श. १७११

८= जमा. फ्रोक्त कोठी पो गु॥ बाळा खटपटया यानें स्वयंपाकाकडील चमचा लोखंडी हरविला त्याबा॥ सु॥ नामे घरखर्च

बुडखर्च तसलमातीचे ऐवजापैकी रु. १२ सरकार सरबतखाना दालचिनिचे (वैद्य)

## इंग्लिशाचा कडक अंमल

माघ शु. ७ ला माहालीं जाहीरनामा लागला कीं इनामदार मोकाशी कर्दे माणूस आहेत याणी सिपाई ठेवून रामोसी यांची बातमी रोजचेरोज साहेब लोक यास समजावीत जावी हे कोणी न करील तरी इनामें सरकारांत जप्त केलीं जातील. हा जाहिरनामा मीच महालीं समक्ष पाहिला व महालकरी यांणीं आम्हांस समक्ष ताकीद दिली; की तुम्ही सिर्के नि॥ वहिवाट करतां त्यास बंदोबस्त राखावा न झाला तर तुमचा वसूल बंद होईल. ......

( बोरवाडी ता॥ माणगांव येथून जनार्दन भट गोरे यानीं चिपळोणकर यांस लिहिलेलें पत्र माघ शु. ७ श. १७४९. )

३३।= सरकारांत व नानाकडे व मुत्सदी यांस द्यावयास सुपारी व सुरण पा. त्याची किंमत सरकारांत खर्च घातली सा॥ जमा.

॥।≈॥ सरकारचे जासुदास सिधा दिल्हा त्याची किंमत सरकारांत खर्च लि॥ ते जमा. ( श. १७०५ माघ )

३० रु. देणे गंगाधर जोसी पत्रिका केली सा॥ रु. ४० पो सरकारांत लि॥ रु. १० बाकी. ( क. सु. )

घरांतील सर्व जिन्नसांची मधून मधून मोजदाद करण्याची चाल अनुकरणीय आहे.

१४। रु. श्रीनिवासपंत कद्रुसकर यांचे कारकीर्दीत मोजदादीस कमी, पितळी दागिने वगैरे ( १७०४ )

८≋ घरखर्चखातें खारवा छत्रीस हात १॥. छत्र्यांचा उल्लेख क्वचित् येतो ( श. १७०४ ).

५२।-। सनदा लिहणावळ म्हणून नांवें पडले आहेत. श १७०५ (खा.)

५० रु. धर्मादायखातें बाबुराव बोडस यानीं कोंकणांत आपले गांवीं पाट बांधला त्याबा देविले ते ज्याजती लागतील ते बोडसानी घरगती करावे. श. १७१२ आश्वीन व १० स. १७९० (तु.)

३ रु. धर्मादाय देणें भागीर्थिबाई देशपांडी प्रा कोहीर इचीं तीन मुलें सिद्दी हमाम यानें कैदेंत घातलीं तीं सोडणें सा. श. १७०५ (तु.)

आणखी निराळ्या दिशेनें मदत केल्याचीं उदाहरणेंहि सांपडतात.

## पुण्याहून मुंबई

पुण्याहून मुंबईस जाण्यास पांच दिवस लागत. एका पत्राप्रमाणें शनिवारीं पुणें सोडलें तो मनुष्य रविवारीं खोपवलीस आला; सोमवारीं पनवेलीस, मंगळवारीं साष्टीस आणि बुधवारीं रात्रीं मुंबईस जाऊन पोचला. (चि.)

रु. २१७ भोजनखर्च—वाईचे मुकामीं दहा पात्राची नेमणूक असतां खाशांची स्वारी आली तेव्हां वीस पात्रें होत होती सा दहा पात्रांचा भोजनखर्च लिहून नेमणूकेत जमा केले असत पौष वा १ ते वैशाख वा १ पावेतों मुदत माहे ४

६० तांदूळ कैली ·॥· दर ८।· प्रों.
२४ जोरी कैली ·।३ दर ८।१ प्रों.
६ गहूं कैली ८१ दर ८८२ प्रों.
७॥· डाळ तुरीची कैली ८१ दर ८८२ प्रों.
४ डाळ हरबऱ्याची.
१ मीठ.
३५ तूप.

( पुढें फाटलें आहे ). ( वैद्य )

### सरकारचा घड्याळजी

१ रु. घड्याळची सरकार गुा सीताराम ( १६९५ श्रावण ). हा घड्याळची वेणीराम नांवाचा कदाचित् असेल. कारण

९ रु. निळकंठ महादेव देणें बेणीराम घड्याळची घडेल १ रवाना जेजुरी नगारखान्याकडे. श. १६८७ कार्तिक. (तु.)

वैद्य } { श. १७३५ इ. १८१३

१ रु. खिजमतगार निा सूर्यनारायणशास्त्री यांस पुत्र झाला म्हणोन सांगावयास आला त्यास ( श. १७३५ कार्तीक )

१ रु. हुजरे निा पंतप्रतिनिधी दिपवाळींत तेल वगैरे आणले त्यांस

५। रु. देहेनगी राघोबादादा ढमढेरे यांची स्त्री प्रसुत झाली तीचे समाचारास गेली सा पुतळी १ श्रा. वा १३ श १७३५.

वैद्य } ऐतिहासिक { श. १७३५ इ. १८१३

४ रु. माघ वा ३० श. १७३५ स्वारीबरोबर बातमीचे कामावर पो तेव्हां रोख नासीकास जाता

वैद्य } { श. १७३४ इ. १८१२

रु. ५ इनाम शिष्य भाऊ याजकडील आा ४ भाऊस स्नानसंध्येचे वेळीं कामकाज लागतें. तेव्हां परवानगी लावावी लागते सिष्यासी काम पडते सा देणे.

वैद्य } { श. १७३४ इ. १८१२

९ रु. बद्दल मुशाहिरा बालारोड जासूद स्वारी सरकारची कोकणांत गेली तेव्हां बरोबर बातमीस दिल्हा त्यास खर्चास दोनमाही पौष ता माघ पो रु. ८ दर ४ प्रो सिवाय जास्त १ बाहेर स्वारींत महागाई असते सा जाणोन १ मुकामी आल्यावर दरमहा ४ आहे त्या प्रोच ( श. १७३४ ).

चिपळूणकर } { श. १७४८ इ. १८२६

यानंतर तीर्थरूप आप्पांकडून पत्र कालच आलें. त्यांतील मजकूर कीं भरमदास दुलभदास यास गायकवाड सरकारांतून आमचे स्वाधीन गुमस्ते सुद्धा कार्तीक शुा १० केले. रोज बारा रुपये घेत असतो. कार्य करून लवकरच येवूं.

चवथाई सरकारांत द्यावयाचा करार केला आहे व मुंबईहून हुकूमही तेथील साहेबास राजश्री राघोपंत यांनीं घेऊन पाठविला आहे ( पत्र गोविंद गणेश निजसुरे यांचे कार्तीक वाा १२ )

चिपळूणकर } { श. १७४०
स. १८१८

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री मोरोपंत जोशी श्रीवर्धनकर स्वामीचे सेविसी पाो रंगराव कारकून पेठकरी पेठ बुधवार शहर पुणे साा नमस्कार विनंती वि पेठ मजकूर येथे तुमचे घरी बिराड करून यमुना कसबीण राहिली होती ती मृत्यु पावली तीची जिनगी भाडया ऐवजी तुम्ही ठेवली होती. भाडयाचे रु. १२ त्यास सरकारातून चौवकशी करता भाडयापुरताच ऐवज उत्पन्न आहे असे चौकशी अंती झाले सबब भाडयाचे ऐवजी तुम्हास दिल्ही असत. तुम्हाकडे चीजवस्त वगैरेचा लढा यमुना कुणबीणीविषयीं राहिला नाही मिाा मार्गशीर्ष शुाा ३ शके १७४० बहुधान्यनाम संवत्सरे.

श. १७६८ सालीं चिपळोणकर यांस गोपाळ गणेश निजसुर यांनीं ५ राजाळवाचीं पानें पाठवून तीं खवत नाहींत, वडया कराव्या, फार गोड होतात असें कळविलें आहे.

तुळशीबागवाले } { श. १६९४ ज्येष्ठ
इ. १७७२

२८०० अनुपराम गोपाळदास वद्य १२ शनिवार (चैत्र १६९४)
इंग्रजी चाबुकस्वारांकडील भरण्यास.

२३०० जमा पुणे खाते
५०० शिल्लक पैकी

२८००

चिपळूणकर } { श. १७५२
इ. १८३०

सरकारी जाहीरनामा ऐसाजे जाहीर अकबरी ते जाहीर खबर प्रगट केली आहे. त्यांस सरजॉन पिटर ग्रँट साहेब येथील सुप्रीम कोर्ट जुडीकेटरचा आपला जड्जपणाचा अधिकार स्वतां सोडतात सबब त्यास सन्मान पत्र देण्याकरितां मुंबई येथें

राहाणार लोक यांनीं एकत्र मिळावे, असा मजकूर आहे म्हणोन हानरेबल गवनर साहेब बहादूर इन् कौन्सिल वाजीप जाणून मुंबईचे व मुंबई इलाख्यातील राहाणार लोक यांस कळविण्यांकरितां जाण करितात जे सर ज्यान् पिटर ग्रँट साहेब यांजवर फिर्यादी केल्या आहेत त्याचा जाब करावयाकरितां किंग कौन्सल म्हणजे पादशाही दरबाराहून हुकूम होऊन सर जॉन पिटर ग्रँट साहेब यांस मुंबईहून परत बोलाविलें आहे. ता. १३ सप्टंबर सन १८३० इसवी मुक्काम मुंबई.

चिपळूणकर } { श. १७४५ इ. १८२३

।=। तोफखान्याकडे दारु बारास ००॥। (विष्णुमंदिरीं श्रीलक्ष्मीची स्थापना पुर्णे मुक्कामीं श.१७४५ सालीं झाली त्या वेळीं)

रु. २ इनाम तोफेचे प्यादे लग्नाचे दिवशीं आणले ८ त्यांस दर ।। प्रो. (श. १७४७)

।। इनाम तोफेचा शिपाई ( काकूबाईच्या उत्तरक्रियेच्या प्रथम दिवशीं) (खा.)

एका चिटोऱ्यावर खालील मजकूर आहे.

तोफेचा शिपाई बा। आ। १ यास प्रथम पुसाव कीं तुम्ही ब्राह्मण भोजनास यावें. तो नाहीं म्हणाला तर सिधा द्यावा तांदूळ ००। पीठ ००॥ तुरी ०००९ येणें प्रमाणें शिदा द्यावा. मशारनिल्हे तूप गूळ मागतील त्यास सिरस्ता नाहीं. परवानगी घ्यावी म्हणोन सांगावें व घरकोठींतून द्यावा खर्च लिहिते वेळेस रास्ते यांचें घरीं कीर्तनास गेले सबब तोफेचा शिपाई आ। १ यास सिधा.

सरकारी शिपायांचा खाजगीकडे उपयोग

जमा ३८० रु. प्यादे व जासूद सरकार परभारे कामगारीमुळें आदा जाले ते
२०८ गु। नारायणदास सावकार मुरलीदास वल्लभसुंदर यांचे घरीं जासूद कामगारीस आहेत त्यास आदा जाले ते जथे चंपाजी ना। वगैरे
( श. १७०३ ) (तु.)

१ सरकारचे भोई सौ माईस आणावयास पंढरपुरास पाठविले होते त्यास हस्तें राघोबा. (वैद्य.)

चिपळूणकर } { श. १७५३ स. १८३१

तासखान्यांतील शिपाई खाजगी नोकरीस

॥। देणें फरासखान्यांतील शिपाई आ। ३ देवडीवर पाहाऱ्यास होते त्यास इनाम

चिपळूणकर } रिती तिजोरी { श. १७४२ इ. १८२०

पेनसालीची ऐवज आज दोन महिने तर कोणास येत नाहीं कारण येथे हाली बाबरे साहेब कलकटर झाले आहेत त्यास जामदारखान्यात ऐवज सिलक नाही. दोन महिन्यांचें पेनसील एकदा मिळाले.

चिपळूणकर } { श. १७४६ इ. १८२५

सरकार दौलत मदार कंपणी इंग्रज बहादूर राजश्री दाजी गंगाधर चिपळून-कर यांचे चिरंजीवाचें लग्न नाशकास जात आहे. त्यांस समागमे डोल्या सुा १० वोझ्याचीं तटें सुा ४० चाळीस व हत्यारबंद मानसे आा १५ व बिन हत्यारी आा ५० व किराणा वगैरे कापड येणेंप्रमाणें जात आहे. त्यांस मार्गी मुजाहीम-न होता जाऊ देणें आणि पुनः येऊ देणें यास मुदत माहे दोन छ. २५ आप्रेल पावेतो. पुढे हे दस्त गैरमंजूर करणे.

ता छ २४ माहे फेपरवारी सन १८२५ इसवी रा कलकटर हापीस पुणें.

चिपळूणकर } **इंग्रज सरकारकडून पेनशन** { श १७४६ इ. १८२४

| | सालीना रु. |
|---|---|
| १ रघुनाथ सदाशीव थत्ते | १२०० |
| २ रामचन्द्र विश्वनाथ गोखले | २००० |
| ३ बाजी बल्लाळ पटवर्धन | ५०० |
| ( त्यांच्या मातोश्रीचा व बंधूंचा हिस्सा यांत होता. ) | |
| ४ गोपिनाथ शास्त्री वाईकर | ३०० |
| हीं बैठीं वेतनें चांदवड छापी रुपयांत मिळत | |
| ५ मोरोपंत आप्पाजी दामले | १०० हाली सिक्का |

हें पेनशन चिपळोणकरांकडे गहाण होतें. ( श. १७४६).

## इंग्रज सरकारचा कारभार

" इंग्रजी दरबारांत पैसा खात नाही असे म्हणतात परंतु सगळा खोट-

साळ कारभार जाहला आहे तो मार पत्री लिहितां येत नाहीं."

( जनार्दन भट गोरे याचें चिपळोणकर यास बाणकोटाहून पत्र )

साहेब मुषफक मेहेरबा(न?)करमफर्माय दोस्ता ज्यान वार्डीण साहेब बहादूर डिपुटी यजंट जिल्हा दक्षण

अजीज दील एखलास रामचंद्र पाडुरंग ढमढेरे सलाम बादज सलाम आके येथील खेरखुषी तागाईत छ १७ सवाल पावेतो जाणून आपली शादमानी कल्मी करून दील आराम करीत असल पाहिजे. दीगर राा वासुदेव बापुजी व कृष्णाजी हरी चिपलोणकर यांसी आम्हाकडे रुपये १००२४॥≈॥ येणें म्हणुन सरकारांत यादी दिल्या वरून सरकारची पत्रें आली येशीयांस तीर्थस्वरूप कैलासवासी अगासाहेब यासी लढाईचे आगोबर आठ पंधरा दिवस मशारनील्हे पासून फौजेचे खर्चाचा ऐवज घेऊन स्वार सीबंदीस देऊन पुढें श्रीमंताचें स्वारीबरोबर वडील निघोन गेले. मागे कंपनी सरकारचा अमल होऊन फौजेचे खर्चाचा व जातीचा सरंजाम सरकारांत जप्त केला नंतर येक वर्षानें फौजेचे खर्चाचा सरंजाम सरकारांत ठेवून जातीचा सरजाम कमाल बेरीज वीस हजार रुपयाचा चालू केला त्याचा आकार फारच कमी सबब उत्पन्नावर खर्चाचा निर्वाह न होतां नवे कर्ज जाहाले आहे. व फौजेचा सरंजाम चालत होता त्या भीस्तीवर असी लोकाची कर्जे घेऊन स्वार सीबंदीकडे खर्च केला व दुसरे दौलतदार याची ही व्यवस्था असीच जहाली ते देणे सरदार लोकास देण्यास ताकत नाहीं असे समजोन सरकारानी मेहेरबानगी करून कोणाकडूनही देवविले नाहीं असा प्रकार आहे. शके १७४२ चे साली वडीलानी चिटी सदरहु रकमेची लीहून दिल्ही असें चिपलोणकर याचे लिहीण्यांत आहे त्यास मशारनिल्हे पासून सन समान अशरीनचे पुढें कर्ज घेतले नाहीं व त्यास वसूलही पावला नाहीं श्रीमंतांचे स्वारीबरोबर आणासाहेब होते त्या काली मेहेरबान अलपीस्टन साहेब बहादूर याणी दौलत संबंधें कर्जाची ईजा होणार नाही असे अश्वासन दिल्ह्यावरून पुण्यास आले व पुढेही मेहेरबान गोरनर साहेब याणी समक्ष बहुतेक सागितले नंतर गोरनर साहेबची स्वारी विलायतेस जाते वेळेस वडीलानी मुंबई मुकामी अर्ज केल्यावरून पेशजी प्रमाणें अश्वासन दिल्हे त्याप्रमाणें आजपर्यंत ईजा जाहाली नाही दौलत संबधें फौजेचे खर्चाचे ऐवजावीसी याद देतात त्यास तो ऐवज सरकारानी कोणास देविला नाही ज्यादा काय लिहीणे प्यार मोहब्बत असो दीजे हे कीताबत.

चिपळोणकरांचें म्हणणें आमचा ऐवज फौजेकरतां घेतला नाहीं. खासगत खर्चास घेतला.

ता. २ जून स. १८३२ रोजीं वार्डनसाहेबानीं चिपळूणकर यांस कळविलें कीं आमच्या मतें ऐवज फौजेकरता दिला आहे असें होतें.

राजश्री कुशाबा चिपळोणकर विनंति विशेष.

राजेश्री विनायक दीक्षित गोडबोले तपकीर ओळींत राहतात यांचे जामीन सरकारांत दहाबारा हजार रुपये परयंत घ्यावयास असामी कशी आहे येविषयीं लिहून पाठवीले पाहिजे. साहेबांचे हुकुमावरुन लिहिले असे. ता॥ ७ माहे फेब्रुवारी १८३२ लोभ कीजे हे विनंति.

भिमराव अनंत शिरस्तेदार.

दीक्षित मशार निल्हे हे पतीनें व्यवहार चांगला करितात. मोठे थोर असे नजरेस येत आहे. साहेब जामीन घेण्यास मुकत्यार आहेत. ता. ८ फेब्रुवारी सन १८३२ इसवी.

कल्याण सुभेदार } { श. १७०५ इ. १७८३

६७|||− मौजे चिकणघर ता॥ अंबरनाथ सालमजकूर प्रो.

२१ ।· छ २४ गु॥ कुळे

८८= नामा भोईर

३ ।· इंग्रजांची बाकी रु. ६। पो

४||= सालमजकूर पो

तिकडील आधिकोत्तर मजकूर कांहींच कळत नाहीं. मेहेरबान गवरनर साहेब यांची प्रकृत बिघडली होती म्हणून ऐकिले होते त्यास आतां कशी आहे व साहेब प्रस्तुत कोठे आहेत ब मेहेरबा (न) मलकम साहेब बाहादर येण्याची बोलवा बोलतात येविसीचे व घरगुती वगैरे कांहींच वर्तमान कळत नाहीं.

चिपळूणकर ( श. १७४७

आशीवरील आप्पासाहेब यांचे संस्थानची नेमणूक कांही एक जाहली नाहीं. सरकारातून बाईसाहेबासही खर्चास येत नाहीं बडिलांचीही सरकारातून नेमणूक नाहीं पदरमोड करून आहे. संस्थानाचा ठराव होऊन खर्चास मिळेल असे दिसण्यांत येत नाहीं वडिलांचे म्हणणें आहे कीं, आमचे बरोबर देसी येतो. असे बोलतात परंतु येणे होते असा भाव नाहीं.

( तात्या चिपळूणकर यास गं. रमाबाई चिपळूणकर यांनीं काशीहून श्रावण शुा ११ शके १७५५ रोजीं पाठविलेलें पत्र. ) (चि.)

भोरास आणखी जाऊन बंदोबस्त करावा तरी तेथे कामगार सारेच रुपये खाणार ( तुकाराम गोविंद यांचे पत्र फाल्गुन शके १७६९ )

पैशाखेरीज कोणतेही काम भोर मुक्कामी व्हावयाचे नाहीं असा विचार येथें आहे. ( राघो विनायक जोशी यांचें पत्र शके १७७२ ) (चि.)

## साहेबाची दलाली

अजम दानीली साहेब बडोद्याचे कामावर गेला. त्यांचें म्हणणें पडलें कीं मला पांचशे रुपये द्यावे. मी तुमचे कार्य करून देईन. मजकडून कार्य न जाहल्यास सावकारी निशा परभारी देतों.

चिपळूणकरांस नित्सुऱ्यांचें पत्र माघ शु. ४ श. १७४७.

## दाजीबा चिपळुणकरांचें वजन

येथे पाछाई कोडतात तेथील पंचाईत मनास आणीत नाही. बडेसाहेब यास अर्जी दिली असतां चापलीन साहेब याणी केलें तें येथे मनास आणावयाचा शिरस्ता नाहीं......आपण जातीने येथे आला असतां समक्ष बडेसाहेब यांची गांठ पडलीयास भिडेमुळे कार्य जाल्यास होईल.

मुंबईहून गणेश हरी वर्तक याचें पत्र.

जोशिया नीसबत बहाद्दर सन १८१९

## कुपणी सरकारांतून

कौलनामा बेसमी वीरंतपाकालसेटी साकीन राजोली हाल वस्ती कसबे सोलापूर यास लिहून कौल नामा ऐसाजे सोलापूर पैकीं साकरबावडी स्थल बागायेत जमीनेत नवे सदर पेठ बसाऊन अबादी करितो म्हणून नवसाल कौल समयीष केले करीतां बराय दरखास्त खातरेस आणून पेठ वसावणेस कौल देऊन हुकुम केले तपसील.

१ सदरी साकरबावडी स्थल जमीन ·।· पावशेरासी साले हाल कुलवार फैसला प्रो ४५॥ साडेपंचेताळीस रुपये आठ आणे सीका रुपयेस पट्टा मोकरर करून दिला आहे त्याप्रो ९ साल पावेतो सदरी ऐवज सालबसाल देत जाऊन नवे सदर घरा बांधून पेठ वसावणेचे आहे. या बेरीज शिवाय जास्ती पट्टी व घर तेरगी वगैरे काहीं वसूल घेणार नाहीं.

२ पेठ बसावणेस जुलाई वर्तक कोमठी बनीया चीलर खुषबाष लोक वगैरे कोणी येऊन घर बांधून बेपार केलिया साले हालपासून ९ साल पावेतो त्या लोकांकडून सारा घेणार नाहीं कौल चालवील जाईल दाहा सालीं नंतर बीराड आवर पेठ मवाफक तीर्व वसूल करविल जाईल.

३ नवे सदर पेठ बसावील आहे म्हणून कुंपनी ईलाखा गांव बगांवाहून ही बेपारी जुलाई बनीया वगैरे लोका येऊन घर बांधून कौल चालविणें म्हणलिया तैसे कौल देणें जरूर नाहीं अगर तैसे कौल दिलिया ते कौल पहील राहणेचा गांवांत किती किती बीराड देत होत कीं ते ऐवज इकडे वसूल करवील जाईल.

४ सरकार ईलाखेचा गांवगाना वर्तक बेपारी यांनीं साबक आपण राह-णेचा गांवांत मामुल देणेचा तीर्वही देऊन इकडेही सदर नवे घर बांधालिया सदरी प्रो कौल चालवील जाईल. लेकीन मुतलक साबक असल ते जागा सोडून इकड कौल पेठेस राहणेचा समयीष केलीया बीलकूल आसरा देणें गरज नाहीं.

५ पेठ बसावणेस लोकास आणावे तर मोगलाई व नीपाणी पटवर्धन वगैरे दिगर इलाखेचा लोकास आणून पेठ वसविणेचे आहे.

६ सदरहु स्थलची जमिनेस मोकरर पावलते तीर्वा सालबसाल तुमचा हातातून देणेचा आहे सीवाय कौलाणी केल्यावरी तफरीक करून वसूल करणें गरज नाहीं कौलनामा प्रो चालणेचे आहे.

७ कौल अखेर झालेवर पेठेचा सेटीपणाचा वतन इनाम तुम्हास मोकरर करून द्यावे म्हणून मारुज केला सबब तुम्ही आणून दील्हे सवाल पटी प्रो तसेच तुम्हास सेटीपण मोकरर करून दील्हे आहे. नऊसाला कौल अखेर झालेवरी चालवीणेचा तपशील.

१ गांव सादीलवारपैकीं मुशाराबद्दल रुपये १० दरसालीना

१ रयत लोकाकडून वतना दरसालीना

।· मागवाले कोष्टी व मोमीण व साली धणगर वगैरे दर घरास रुपये

८= कीरकोळ अडाण घरास दर घरास

।· वाणी बाणगार वगैरे दर घरास

१ चांभारावर जुती जोडा दर घरास १ किंमत ।· प्रो कलम दरसालीना

१ चीलरा गाठोडी भुस जीनसचे मोटास १ मुठी घेणेची

४

१ लग्न व पाटदामा रयेताचे घरीं जाहल्यास दर लग्नास व पाटास

| लग्नास | उडकीस |
|---|---|
| ३ उत्तम असामीस | १ |
| २ माफक असामीस | ॥।· |
| १ कनिष्ट असामीस | ·॥· |
| ६ | २। |

येणेंप्रमाणें चालवील जाईल.

१ तेल्याचे दर घाणास दररोज तेल वजन ०००९ टाका प्रो चालवीणेचे

१ तांबोळीचे दुकानास दररोज पान २५ प्रो.

१ फसकी बागवान व माली वगैरे लोकांनीं तरकारी आणलीया १ मुठी प्रो घेत जाणेचे.

४

जुमला ८ कलमाप्रो कौल अखेर जाहल्यावर चालवीले जाईल.

जानीब तारीख २६ माहे जून सन १२२९ फसली

सही ( इंग्रजी )

कलेक्टर

(३) हिसेब कारखाना वाडा नजीक गौतमाळ वगैरे क्षेत्र श्री त्रिंबकेश्वर सुमाई सने सैबान मया व अल्फ. एकंदर खर्च २६३०॥=॥ रु. गवंड्याचा पगार दरमहा रु. ९ पासून १५ रु.पर्यंत आहे व पैसे चुकते करतांना एक महिन्यास सामान्यतः १ दिवसप्रमाणें कारकुनी म्हणून कापून घेऊन बाकी पैसे दिले आहेत. उ.

५१।– राणु दमाजी माहे ४०३ पो वजा कारकुनी रोज ४। बाकी माहे ३०२८॥। दर १३

गड्यांचा पगार दरमहा २॥ पासून ७॥। रु. पर्यंत दिलेला आढळतो. त्यांतही कारकुनी म्हणून महिन्याला एक दिवसप्रमाणें कापलेला आहे. उ.

२। रु. सटवाजीं सूर्याजी रोज ०९ वजा कारकुनी रोज ०।· बाकी रोज ०८॥। दर ७॥।·

पुढें दगडांचा तपशील पहा.

३०१८|||· दगड सुा बेलदार वगैरे

११४||-| ऐन खरीदी खाणींतून काढले सुा ५०३४ वजा बाद सवाई सुा १००८ बाकी सुा ४०२६ दर शेंकडा रुपे ३ प्रो रु. १२०||=|| पैकीं वजा कारकुनी दर सेकडा रुा ५ प्रो

२९||-|| वाळु सुा बेलदार टोणगे सुमार १२४३

टोणग्यांचा दर शेंकडा १| व २||| रु. आहे व ह्यांत ही कारकुनी म्हणून १||·|| रु. कापले आहेत.

·|· पोलाद सुतक्याच्या तोडी घडावयासी वजन पक्के ८८|·१३|| दर ८८१||| प्रो.

३९|||= भिंतीचे पायाचे खणीत काम सुा बेलदार

३९८= मातीचे हात १४२८||= दर शेंकडा रु. २|||

·|||·||| मुरुमाचे हात २७ दर सेकडा ३

२८||· खडयाचे हात ५८|| दर शेकडा रु. ३||

४१|||≥|

पैकीं वजा दस्तुरी दर सेकडा रु. ६ प्रो रु. २८-| बाकी

१ भिंतीचे पायांत माती दरडीची ढासळून पडली ते माती काढावयासी टोणगे सुा बेलदार सुमार ८२ दर सेकड रु. १| प्रो.

२३|||≥| विटा पक्या सुमार १२०००

२१ ऐन खरीदी दर हजारी रुा १|||

२|||≥| भाडे दर हजारी रु. ·|· प्रो रु. ३ पों.

१४|||= कवलें सुमार ८५०० दर हजारी रु. १||| प्रो.

१८६|≥|| भाडेखर्च दगड सुा ५०३४ वजा रेजगीच्या गाडया सुा ६८९ बाकी सुा दगड ४३४७ दररोज दर गाडयास खेपा दररोज सुमार १४ प्रो माहे १०८१०|| दररोज दर गाडयास रु. ||= प्रो. रुा १९३|= पो. वजा कारकुनी रोज ८११ घ्या रु. ६|||=|| बाकी रु.

३६।।।≈ गुा ईसमाल तेली रेजगी व कातक गाडी सु १ मुदत
माहे १८२०।।॰ दररोज रा ॰।।।॰ प्रो. रु. ३७।।।= वजा
कारकुनी रोज १।। रु. ॰।।।= बाकी.

५९१ चुना सोळुले चोसरी फऱ्याचे मापे कैली खंडी ४५।।४।।≈

चुन्याचा भाव दर खंडीस १२।। व १३। रु. प्रमाणें आहे. एवढ्या चुन्याला मसाला येणेंप्रमाणें—

२।।।= गुळ वजन ८।।५।।।॰
१।।।- कात ८८७।
२८≡। डीक वजन ८१५।।॰
२।।।= ताग वजन ८।।३
।।- हिरडे कैली ८।।।=।।

१०।-।

।।=।।। तेल चुन्यावरील माणसाचे हातापायासी लावावयासी व
चुन्याचे चाकास वोगणास वजन ८८३।।१५

हत्यारें

॰।॰ सीलेखाना खर्च भवानी तरवार इची मूठ बांधली त्यास रेशीम.
२।।= कमाण व तीर खरीदी घेतले.
५८-।। बंदूक नवी केली देणें धनाजी लोहार सिरढोणकर.
२।।। तोफ पंचरसी १ ( इनाम गांव मौजे चिरनेर ).
८≡।। देणें सिकीलकर खासे निमच्यास सिकील केली सबब
॰।।॰ टीकाराम याजकडे सरकारची बंदूक आहे तीची दागदोजी करावयास मजुरी दिल्ही ती टीकारामाचे आय्यांत सन समानांत वजा पडली आहे. हल्ली दौलतसिंग यानें सांगितलें कीं बंदूक सरकारची सबब रोख दिल्ही.

३४ आषाढमासीं श्रीमंतांकडील ब्राह्मणभोजनाचा मक्ता केला होता त्यांत
कसर राहिली ती. ( खा. )
१ पन्हाळ्याकडील महाराजांचे हुजरे तीलगुळ घेऊन आलें होते त्यांस
१ पनल्याचे महाराजांनीं तीळगुळ पाठविला त्याजबद्दल खीजमतगारास
(खा.)

रंग

।।॰।। पळसाचे फुलाचे रंग केला त्यास चुना पक्की वगैरे. (क. सु.)

## जंगल

यादी किले सुधागड येथील घेऱ्याचे रानांत व माहाली गांव गन्नाचे रानांत लाकडाचा कारखाना लाऊन लाकडे तोडावयास गुा १.

कारखानदार याजकडे सांगोन साल गुा प्रो रामवा देऊन दर ठराऊन दिल्हा आहे त्याप्रो साल मजकुरीं आकार होईल त्याचे ऐवजी रु. ५०० पाचशे सरकारात घेतले त्यास लाकडे येणेप्रो तोडावी. सागवानी व रायवल मिलोन येणेप्रो

१ खांब
१ गज्या
१ कड्या
१ वासे
१ गोलवासे
१ तक्ते बुंदाड्याचे

६

एकूण सहा डाग लिहिले आहेत त्याप्रो तोडून गुदस्ताचे दराप्रो किल्यांतून कारकून व सिपाई येऊन मोजून देतील त्याचा आकार होईल तो सदरहू पांचशे रुपयांत वजा घ्यावा बाकी ऐवज निघेल तो सरकारात द्यावा. कदांचित् तुमचे देणे पांच पन्नास रु. राहिल्यास पेस्तर सालीं लाकडे तोडून घ्यावी. येणे प्रो ठराव करून पुणे मुक्कामीं आलाहिदा सनद मामलेदार किले मजकूर यांस दिल्ही आहे ती त्यास देऊन ते रान दाखवितील त्या रानांत कारखाना करणें.

१ राघनाक महार याने कोळशाचे भट्टीचा कारखाना पत्करून रान मोकदम याजला न पुसतां शेतकीचे तोडिले. ( चिपळूणकर )

।· बाजे खर्च रानास वणवा लागता तो विझवावयास.

५४॥· मजुरी खर्च मंदाकिनीच्या रानात तोडिले सोटे १८०.

---

।॥· घोड्यास नालबंदी केली सबब

।॥= चौबंदी घोडी ३

।।॥ दुबंदी घोडी २

८८॥। एकबंदी घोडी १ (क. सु.)

।॥· देणे जासूद पुणेयाहून दस्तक इंग्रजाकडील कोटलिंगाचे [illegible] जाणेकरतां आणविले. सा.(क. सु.)

खासगीवाले } { श. १७२१ { इ. १७९९

१० कारकुनीबा देणें दीनकरपंत करंदीकर तांसगांवचे ठाण्यांत स्वार १० चाकरीस आहेत त्याचे सालगुदस्ताचे कारकुनीबा रावती रुा १ प्रो.

दरबारखर्च सरकारचे पोतनीसास पटणचे स्वारीची कारकुनी देणे दर राउती रु. ४ दुसाला देणे स्वार १७ रु. ६८ पो वजा कारकून स्वार १ रुा. ४ बाकी स्वार १६ रु. ६४ पो. धारवाडचे मुक्कामी गुा राघो कृष्ण गोगटे रुा १७ बाकी ४७ पो सूट रुा. २४ बाकी ठराव गुा बाबाजी नारायण गोगटे पोतनीस रोख २३ रुपये.

तुळशीबागवाले } { श. १७२० { इ. १७९८

१४७५ प्रांत पुणे देणे रामचंद्र गोसावी पैठणकर यांचे कापड सरकारात घेतले. त्याची वरात जाली त्याबा रामाजी बापुजी कडून. १५ दिवसाचे मुदतीनें देविले. हल्ली तो ऐवज मारनील्हेस दिला.

खाजगीवाले } { श. १७११ { इ. १७८९

२ रु. जमा काकवी सरकार हिसा वजन कचा ।०।। पैकीं मिरजेस पा ८१ बाकी ८४।। पैकीं वीकली वजन कचा ८१

१ रु. खर्च सरकारांतून रावतावर वर्गण घातली त्याजबदल.

तुळशीबागवाले } { श. १७०९ { इ. १७८७

१॥=॥• खासगताकडे कातगोळ्या केल्या त्यास सामान.

८-॥• लवंग ८८८१; ।-जायफळ ८८८१; ८-॥• वेलदोडे ८८८१;१ कस्तुरी; ८=।।• कात पांढरा ८८।।•

{ श. १७०५ { इ. १७७३

बाजारच्या उचापतीमुळें झालेलें कर्ज वराता काढून फेडीत असत.

३०००० रा. पंत प्रधान कर्जाबा वरात छ २२ सफर मि. पौष वा ८ (१७०४) देणे गुा सेट्या बाजारउचापतीपो गुा बापुजी वामन यांजकडे आरणा पोते चाल.

१५००० त्रिंबक विनायक सुभे कडून देविले ते जमा.
१५००० जमा बापुजी वामन याजकडून.
३००००

(तु.)

## डाकतर

रु. ।। सरकार ता करनाळा देणे रूपचंद परदेशी रा सार्षी अंतोबा डाक्टर याचे पागोटे व पत्र पोचवावयास पाठविला सा खर्चास. (१७०६ पौष)

## पेशव्यांचें शेत

(क. सु.)

२५ रु. श्रीमंत राजश्री पंत प्रधान पो जमा कसबे कल्याण गुा कानोजी माळी खुद्द शेत पो नांवे खर्च माळी मार (१६८८ फाल्गुन)

(क. सु.)

२।। इंग्रज आसामी २ कोकणातून पुणेयासी त्यास खर्चास दिल्हे.

(क. सु.)

## चिपळोणकरांचा घरखर्च

शके १६८२

घरखर्च

मास

नांवे
१००२। वैशाख
१५५४।।।० ज्येष्ठ
१४०१।।।= आषाढ

किरकोळ

नांवे
९५।।।- राहुटी करविली त्यास
२।= सिलाई
५ खारवे २
६।। नवार
५।= कांढण्या
३।- चासा व पारा दांजा
३७८= खाद्या पा २४
७।।। कथा

१ सिलाई माणुसिणी
१॥ नवार बारीक
१॥। खारवा १
३ चासा १॥
॥ सुत व सुया

१५॥।- श. १६८२ (चि.)

टीप—बेरजेचा व तपशीलाचा मेळ बसत नाहीं.

---

## देवऋषि
## श्रीकृष्णाबाई

कार्तिक शुा १५ शके १७५५

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रघुनाथरावतात्या यांसी भिकंभटशास्त्री भट आसीर्वाद येथील क्षेम ता॥ कार्तीक शुा १३ पावेतो वर्तमान यथास्थित असे. वि॥ आपण पत्र शु. ७ चे मितीचे पाठवले ते शु. १० पावले. वे. विश्वनाथ दिक्षित अयाचित हे देवऋषीपणा करितात. याजकरितां येथे चोरी जाली सबब त्यास तेथे त्याची रवानगी करून देण्याविसी विस्तारे लिहिले त्याजरून भटजीकडे गेलो त्यांस मजकूर समजाविला नंतर त्याणीं उत्तर केले कीं आट दिवसाचे आंत चोरी जालेली असती तरी हटकून माघारी आणतो परंतु या गोष्टीस पंधरा दिवस गुदरले तरी मोटा प्रयत्न करून पाहावा. मजला तेथे जाणे म्हणजे पांच रुपये आगोदर येथे पाहिजेत कारण गडी घोडे व सिष्या व पायाळू बायको बरावर घेतली पाहिजे तेथे गेल्यानंतर तुमचे घरी माझी राहण्याची सोय नाही बाहेर बिराड करून राहू. तेथे पर्यंत आमचा खर्च चालवावा व चोरी सापडल्यावर चतुर्थांश मी घेईन असे त्याचे बोलणे आहे व येथे वहिवाट पाहिल्यास चौघाचा उद्योग करितां एकाद्यास गुण येतो एकाद्यास येत नाहीं असे आहे तरी याचे मनन करून उत्तर येईल त्याप्रमाणें भटजीची रवानगी करून देऊं कळावे. बहुत काय लिहिणे लोभ करावा हे आसिरवाद.

## मुलीच्या लग्नाची आतुरता

मुलीस सहावे वर्ष लागले आतां यंदा लग्न जमल्यावां . ुढील वर्षावर ठेवण्यास ठीक नये खर्चाची सोय कशी तरी करून करणे प्राप्त... ... ...येथे एक बापू गाडगीळ याचा मुल आहे. त्याची मुंज झाली नाही. मुंजे चत्रांत करतील. मुहूर्त म्हणावे तर माघांत प्रशस्त

(पौष वद्य २ शके १७५१ सालचें कुशाबा चिपळोणकरास पत्र.)

रामोशी

काल निघालो तो वेटूलजवळ चार घटका दिवस राहतां धर्मशाळेसमोर आलो. तो अडीचशे रामवशी यांचा घाला गावावर येऊन सचीवाकडील सिपाई यांस बराबर मारामार चालली होती आम्ही तसेच पुढे येऊन सिवरे याची वाट सोडून सिवापुरास आलों. देवाने पार पाडून रात्रीं सर्वांचा समाचार आवांनी घेतला. सुखाने होवों. पंतांचे सिपाई जकातदार यांस फार मारले. दोनसे रुपये गांवापासून घेतले. बंदुका वगैरे शिपायांच्या घेतल्या. भाकरतुकडा होऊन चौहोकडे पाचपन्नास माणसें येऊन मग जमा होऊन निघोन डोंगरास ससेवाडी सिंदेवाडीचे वर गेले.

( रघुनाथ सदासीव थत्ते यांचे पत्र शके १७५१ अ. शुा १० )

पत्रावरील पत्ता

चिरंजीव राजश्री बळवंतराव नाना थत्ते यांस पुण्यास बुधवारांत नाना फडणीस यांचे समोर हौदाचे पूर्वेस थत्ते यांचे वाड्यांत प्रा। कीजे ते नसल्यास चिरंजीव राजश्री रामराव तात्या चिपळोणकर यांनी हा लखोटा ते जेथे असतील तेथे प्रा। करावा.

## बुंदेल्यांचा वाडा

१ सौ. कासीबाई–बुंदेल्याचा वाडा रामराव विष्णू यांचे घराजवळ आहे तेथे.

( हळदकुंकवाच्या बोलावण्याच्या यादींतून )

## वर्णनशैली

स्वामींनी बहुता दिवशीं स्मरणपूर्वक आशिर्वाद पत्र पाठविले ते पावोन आनंद जाहला तो लिहून कळविण्यास आसक्तता नाहीं. कारण कीं, धेनूचा जो वत्स त्याते मातेचा वियोग जाला असतां तो जसा क्षुधेनें पीडीत होतो त्यातें

मातादर्शन होऊन दुग्धपान होऊन क्षुधेनें पीडीत जालेला तृप्त होतो त्याचे जसे कोणी प्राणीमात्र वर्णन करूं सकत नाहीं तदनुसार मजला आसीर्वाद पत्र स्वामीनी लिहिले ते पाहून आल्हाद जाला तो मी लिहून कळविण्यास योग्य नाही. ऐसेच सदैव पंत्र लिंहिंण्यास आशोत्तर होऊन सांभाळ करण्यास योग्य स्वामी समर्थ आहेत.

( विसाजी लक्ष्मण जोशी नेवासे याच्या पत्रांतील उतारा )

## साक्षी समन्साचा नमुना

श्री

रावसाहेब मुषफक मेहेरबान करम फर्माय दोस्तां दाजीबा चीपळूणकर सलमहु

अजीसोब मेस्तर ज्यान अद्रीब दडकेप साहेब बहादूर इस्कोयर ज्यज्ज्य पुणे व सोलापूर सलाम बा आजद सलाम अकी येथील खैरीयत जाणोन आपली शादमानी हमेशा कलमी करीत असीलें पाहिजे दीगर दीनकरराव देव याचे दागीने मोत्ये वगैरे याची चोरी जाहली त्याबद्दल कोडतात काम सुरू जाहाले आहे ऐसी यास देव याचा दाणा मोत्याचा एक चोरीस गेला तो आपण पाहिला होता व त्याचे मासल्यचा दुसरा दाणा मोत्याचा आपले पासी आहे असे देव याणी जाहीर केले याजकरिता आपणास लिहिले आहे तर आपणापासी देव यांचे मोत्याचे दाण्याचे मासल्याचा दाणा आहे तो घेऊन देव याचा मोत्याचा दाणा पाहिला होता त्याचा मार सांगण्याकरीता शेसन कोडतात आले पाहिजे रवाना ता। २ आगटोबर सन १८२७ ज्यादा काय लिहीणे प्यार मोहोबत असो दीजे हे कीताबत

(सही इंग्रजी) जज्य

## टक्के व रुक्के

३ रुक्के = १ पैसा.
४ पैसे = १ आणा.
४ आणे = १ टका.

आल्यावर रुक्के; आण्याची उभी रेघ आंणि टक्यांचा आंकडा.

टक्के व रुक्के कसे लिहित हें खालील उताऱ्यावरून समजेल-

एक टका व तीन पैसे

१८१ चैत्र शु॥ ३ श. १७५८

८३ देवस्थानकडे ।३ भाजी

८३ तीर्थाबदल ८३ पानें विड्याची

-।३ भोजनदक्षणा

 ८३ रामभट खरे         ।। बांगड्या

 ८३ रामभट पेंडसे       ।।।।६

 ८३ भास्कर शास्त्री

 ८३ रामचंद्र जोशी

 ८३ सुवासीण

 ।।३

 ८६ गौरीकडे पूजेस सौ. ज्यानकबाई

 ।।३

१८९ टक्के

हापीसचाल व सुरती रुपया एकच नाही.

१०४॥=॥। शुा ११ शुक्रवार (चैत्र श. १७५८) गुा राघवाचार्य हस्ते रामभट खरे रोख

 ५३।।। सुर्ती रु ५५८=॥ पो वजा बटा सीका केला त्याजबदल दर ३॥ प्रो रु १॥।= बाकी सीका

 ५१।=। हापीसचाल रु ५५ याचा सीका केला बटा दर ७ प्रो वजा ३॥-॥। रु बाकी सीका

 १०४॥=॥।

बट्याच्या दरांत दुप्पट अंतर आहे. दोनहि व्यवहार एकाच दिवशींचे आहेत. ह्यावरून सुर्ती व हापीस एकच चलन नव्हे असें दिसतें.

 ।।। मीती वाा ४ हापीसचाल वीकरी रु ५० दर १ प्रो नरम छापी केले त्याबद्दल

 १॥-॥ भोजनदक्षणा पारण्याच्या दिवशीं

  १।≋॥ ब्राह्मण आा १३ दर आा टके ।।। प्रो टके ६॥ व सुवाशीण आा १ दर ।।। प्रो एो टके ७ दर ४॥।.

  ८= कीरकोळ टके ।।३

  १॥-॥

१ पुढील मजकूर चिपळूणकर दप्तरांतील आहे.

## रुक्का

खर्च

३ रु. सदरहूचें व्याज ता फाल्गुण अखेर शके १७५६ पो मुा माहे ४७॥ दरमहा दर रुपयास रुके ४॥ प्रो टके ४।९ प्रो एकूण आकार टके २६। दर ५ प्रो एा रु. ५। वजा सूट रुा २। बाकी.

## नाण्यांचा बाजारभाव (श. १७५७ आषाढ)

८२॥·॥ रु. श्रीबटा खो सीका वीकरी

५॥।−॥ शुा ३; ६० रु. दर ९॥।
२९॥≡ शुा ५; ३०० " " ९॥।=
१८ शुा १४; २०० " " ९
३।≡॥ वाा ३; ४६।·॥ " " ८
१२।−। वाा ३०; " " ९
।≡॥। शुा १४; ४।= " " ११
८८॥ शुा १४; ८≡॥। " " १०
१॥ नीरमळ चांदवड व हापीसचाल वीकरीवाा बटा
·१ वाा २ रुा २०० दर ·॥· प्रो
·॥· वाा ३ रुा ५० " १ " वगैरे

## होन

खरीदी करून खासगीवाले यांजकडे बाळंतवीड्यावर नेला त्याजबद्दल रोख चांदवड.

## टका

२९८॥।· कोंदण कोम बाळाजी तांबोळीण इजला खुर्द्यावर आगाऊ दील्हे त्या-पो खुर्दा वसूल गुा आनाजी धुमाळ

·८−॥ मी वैशाख शुा ४ स दील्हे रुा ३०८॥· पो वसूल माहे गुा जमा आहेत टके १०५ दर ४॥। प्रो एो रुा २१॥।=॥ बाकी येणे आठ रुा दीड आणा पो वसूल ईा शुा १ गुरुवार ता शुा ११ रवीवार पो टके ४४ दर ४॥। प्रो ९।·। रुा पो वजा १८=॥। कसर जमेकडे आगाऊ रुा दील्हे त्याबदल बाकी जमा रुा

१०|||≈| वद्य ३ शनवार दील्हे रु ३० खुद्यांवर पो वसूल ई।। मीती मार प्रासुन दररोज टके ४ प्रो ता। व।। ३० शुक्रवार प्रो टके ५४ दर ४||| प्रो रु ११|-||| पो वजा पेशजी वैशाख मासी रु ३० दील्हे त्याचे कसरीबाबद येणे ते वजा ·|=|| बाकी जमा.

१९८|||·

१||-| कसर जमा गु।। कोदण कोम बाळाजी तांबोलीण गडकरी ईजला आगाउ वैशाख शु।। ४ स रु ३० दील्हे त्याचा करार दर रुपयास ·|· टके ज्यास्त द्यावे ते जमा टके ७|| दर ४||| प्रो प्रो

### शिक्का, चांदवड व सुरती रुपये

चांदवड सुरती सीका

१६१२८≡ = १५५१८=| = १४६९|·||

९७ लक्ष्मण वेंकटेश देशपांडे यांजकडे कर्ज येणे त्यापैकी वसूल...पावती चांदवड

२९ चांदवड नरम छापी

४९|| भातवडी वगैरे रु ५० पो वजा बटा दर शेकडा १ रु प्रो ·||· बाकी

१८|| बेलापुरी रु २० पो वजा बटा १|| बाकी जमा

(श. १७५७)

### साहेबास कर्ज

२५० रु. बेलसो बाहादूर मी शु।। १२ (वै. श. १७६२) रोख सुर्ती तुम्हा-कडे ऐवज येणे त्यापैकी वेकाजी मेहेरजी याचे दुकानीहून देवीले ते

### इंग्रजी शब्दांचा शिरकाव

|=| स्लेट खरीदी चीरंजीव केशवराव यास लिहावयास

### आटकुल्या चोटकुल्या

४८ सोने खा। खरीदी सोन्याचे घागऱ्याचा करगोटा आटकुल्या चोटकुल्या सुधा वजन तोळे तीन दर १६ प्रो प्रो रु यासी........घागऱ्या सुमार......व आटकुली दोन व चोटकुलें १ प्रो सु।।

### हातमोजे पायमोजे

१||= मोजे सुती खरीदी हाताचे व पायाचे सुमार ४ (श. १७५७)

## किरिस्तंम

६० जोखी बीन लुईस फरासी कीरीस्तंम मीति शु ७ (श. १७६४ आषाढ) बा। खत

## इंग्रजी बुक

४≈।। खरेदी बुक आनंदराव यास इंग्रजी

•।।• आनंदराव इंग्रजी शाळेंत जातात त्याबद्दल देणे पंतोजीस (श. १७६४) दरमहा. ह्याच वर्षी आनंदरावाचें गर्भाधान झालें

मामले म्हणजे तालुका नव्हे. मामला आणि तालुका हे निरनिराळे विभाग होत. उ.

राजश्रीया वीराजीत राजमान्य राजश्री राघोपंतदादा गुण्ये स्वामीचे सेवेसी पो कृष्णाजी काशी फगेरे देशपांडे कुलकर्णी मामले हमजाबाद तालुके अंजनवेल मुकाम नीजामपूर.........

## पेठ तोफखाना

२५ मीरसाहेब अलीसयदे बा। पेठ तोफखाना का। पुणे......खत साधे कागदावर वगैरे (१७५७ श.)

## आटपाडी येथील पाठकांचे कागदपत्र

## अमृतराव नाईक निंबाळकर

या टाचणांत सुमारें पन्नास ५० कागदांचा परामर्श घेतला आहे. यांपैकी बरेचसे कागद अमृतराव निंबाळकर नाईक यांस लिहिलेलीं पत्रें आहेत.

हा निंबाळकर वठारकर निंबाळकरांपैकी दिसत नाही. बाळाजी बाजीरावाच्या पत्रावरून (२१) हा राज्यांतील एक मातबर सरदार असावा असें वाटतें. तसेंच, तो शिंद्यांचा सोयरा होता. काय नातें होतें तें समजण्यास पत्रांत साधनें नाही. (२१). अमृतरावाची शिंद्यांशीं सोयरीक असावी असें मानण्यास दत्ताजी व जनकोजी शिंदे यांच्या पत्रांत आधार मिळतो (२९). हीं पत्रें स. १७६७ च्या जूनमधील असून त्यांत २०० स्वारांबद्दल बारमाही तैनात ६०००० साठ हजार रुपये, पालखीकरिता १००० एक हजार आणि हत्तीचा खर्च १००० एक हजार एकुण रुपये ६२००० बासष्ट हजार दरसाल शिंद्यांनी अमृतरावाला देण्याचें कबूल केलें होतें.

अमृतराव नाईक ह्याचे अकलूज व भालवणी हे जहागीरीचे गांव होते. (५). अमृतरावास ही जहागिरी मोंगलांकडून मिळाली असावी (३०).

अकलूज व भालवणी या दोन परगण्यांत मोंगलाई व स्वराज्य असे दोन्ही अंमल असल्यामुळे जहागीरदार निसबत मोंगलाई यांस तीन तक्षीमा वसूल मिळत असे. बाकी स्वराज्याचा चौथाई ऐवज राहिला. त्यांत मोकासा ६० रु., सदाशीव-पंत २० रु. व हुजूर २० रु. असें शेंकडा प्रमाण होतें (३०). याखेरीज दुतर्फा आकारावर शेंकडा १० प्रमाणे सरदेशमुखीचा हक्क होता. हा वसूल देशमूख व देशपांडे यांनी करून ज्या त्या अंमलदारास द्यावयाचा असे (३०). यामध्ये सदाशिवपंत यांस २० रु. मिळावयाचे आहेत. हा सदाशीव माणकेश्वर असावा असें श्रीनिवास प्रतिनिधीने आप्पाजी माणकेश्वरास लिहिलेल्या पत्रावरून दिसतें (३०).

हा वसूल करून देण्याबद्दल परगणे मजकूरचे देशमूख व देशपांडे यांस फत्तेसिंग भोसले व श्रीनिवास परशराम प्रतिनिधी यांचीं एकाच सालचीं व एकाच महिन्याचीं पत्रें आहेत. ह्यावरून फत्तेसिंग भोसले यांचा अकलूज व भालवणी या दोन गांवांवर अंमल शाहूच्या वतीने चालत असावा असें वाटतें. ज्या तहामुळे हा स्वराज्याचा हक्क मिळाला त्याचा उल्लेख सदहू पत्रांत केलेला आढळतो (३०).

साहोत्र्याचा हक्क सचीव पंतांचा हें सर्वांस ठाऊकच आहे. साहोत्रा म्हणजे शेंकडा ६ रु. हक्क. असें असतां अकलूज व भालवणी या परगण्यांत शेंकडा १॥ रु. प्रमाणें पंतसचीव घेत असत असें एका पत्रावरून दिसतें. सचीव ६ रु. घेऊं लागले त्याबरोबर रघुनाथ बाजीराव ह्यांनी त्यास पुन्हा तसें न करण्याबद्दल ताकीद दिली (२२). हें पत्र सन १७६१ मधील असून तें रघुनाथ बाजीराव ह्यानें लिहिलें आहे. या पत्रांतील " नोहीगर " हा शब्द लागला नाही.

स्वराज्यापैकी साहोत्राप्रमाणे नाडगौडीचा हक्क सदासीव येमाजी याचा होता. नाडगौडीच्या हक्कदाराला शे. २ रु. मिळत असत. हा नाडगौडीचा हक्क म्हणजे शे. ३ रु. अशी समजूत झालेली दिसते परंतु ती साहोत्र्याप्रमाणेच या पत्रावरून खरी दिसत नाही. हेंहि पत्र रघुनाथ बाजीरावाचें आहे व तें सन १७६१ चेंच आहे.

अकलूज परगण्यांतील मोकासा मालोजी नाईक निंबाळकर याजकडे सरकारांतून सरंजामास होता. अर्थात् निंबाळकर सरकारस्वारींत चाकरीस होते.

हें पत्र रामाजीपंत नामा यांस चिंतो वामन देशमुख यांनी लिहिलेलें आहे. याचा सन बरोबर समजत नाही. ह्या पत्रांत मोकाशी याकडे रु. १५ आणि हुजूर बाबती ऐवज रु. १० दाखविला असून पैकी ५ रु. प्रतीनिधी व ५ सदाशीवपंत अशी फोड केली आहे. अशी व्यवस्था शाहूमहाराजांनीच केली होती असें या पत्रांत नमूद आहे. हें पत्र गोपाळ बल्लाळ कमावीसदार याला थोरल्या माधवरावांनी लिहिलेलें आहे. गोपाळ बल्लाळ हा शहाजी भोसल्याचा कमावीसदार होता. रु. १५ पंधराच्या ऐवजी हा कमावीसदार मोकाशी हक्काबद्दल वीस २० रु. वसूल करूं लागला. याजमुळे माधवरावांनी हें रागाने पत्र लिहिलेलें दिसतें. या पत्रावरून हा मोकासा शाहूमहाराजांनी फत्तेसिंगाकडे दिला होता असें दिसतें. चौथाई म्हणजे २५ रु. असें समजून त्या पत्रांत वांटणी केलेली आहे. म्हणून हें पत्र (नं. ३०) मधील पत्राशीं विसंगत नाही. हुजूरबाबतीचा हक्क प्रतिनिधीं-कडे गेल्यामुळे प्रतिनिधी व भोसले या दोघांनी परगणे मजकूरच्या देशपांडे-देशमूख यांस मागे उल्लेखिलेलीं पत्रें पाठविलीं असल्यास त्यांत आता आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. थोरल्या माधवरावांच्या पूर्वी बाळाजी बाजीरावाने अशाच तऱ्हेचीं पत्रें ह्याच कमावीसदाराला लिहिलेलीं आहेत (३१).

वर उल्लेखिलेला मालोजी नाईक ह्यास राणोजी नाईक निंबाळकर याची बायको राजसबाई हिने दत्तक घेतला होता. हा मालोजी पूर्वीचा जगदेवराव निंबाळकराचा मुलगा होता (६). हें पत्र सवाई माधवरावाचें स. १७८८ मधील आहे. यावरून अमृतराव नाईक निंबाळकराच्या पाठीमागून राणोजी नाईकाला जहागिरी मिळाली असून त्याच्यामागून हा मालोजी नाईक आला असावा. खानापूरच्या अहिल्याबाई निंबाळकर व अमृतराव नाईक निंबाळकर यांचा तंटा होता असें एका पत्रावरून दिसतें (२०) व त्यामुळे हे नाईक खानापूरचे असावे असा तर्क करितां येतो. निंबाळकर यांस जहागिरीचा ऐवज जमीदारांकडून मिळत असावा (१५ अ). नानासाहेबांनी हें पत्र येमाजीपंताला लिहिलें आहे. येमाजी हा प्रतिनिधींचा मुतालीक होता. प्रतिनिधींच्या ऐवजी पेशव्यांनी हें पत्र मुतालिकाच्या नांवें कां लिहावें तें समजत नाही. बहुधा याच दिवशीं अशाच मजकुराचा हुकूम बाळाजी बाजीराव याने परगणे भालवणी येथील देशमूख व देशपांडे यांस सोडला आहे. ही जहागीर अथवा हा सरंजाम दरसाल नवा करार होऊन देण्यांत येत असावा (१५ आ).

अमृतराव हा जरी भालवणी व अकलूज या परगण्यांचा जहागीरदार होता तरी कमावीसदारी तो पत्करीत असे. बोरगांव कसबे येलापूर येथील मोकासा पंत-प्रतिनिधीकडे आल्यामुळे पंत प्रतिनिधींनी आपल्यातर्फे याला कमावीसदार नेमिलें (१० व २६). २६ च्या कागदांतील तुकाराम नाईक हा कोण हे समजण्यास कागदांत साधन नाही.

अमृतराव नाईक आपल्या जहागिरीच्या जोरावर कांही गांवांच्या पाटीलकीचें उत्पन्नहि लुबाडीत असे असें दिसतें. नं. १ च्या कागदांत अकलूज येथील पाटील सर्दोजी मोहिते याने आपलें पाटीलकीचें उत्पन्न जहागीरदार जबरदस्तीने नेतात अशी पेशव्यांकडे तक्रार केल्यावरून बाळाजी बाजीरावाने सरकारचा कारकून राघो भगवंत यांस पाठवून पुढील हुकूम होईपर्यंत पाटीलकीचा वसूल त्याला घेऊं देण्याबद्दल निंबाळकर यांस ताकीद केली आहे.

नेहमीप्रमाणें पाटीलकीच्या तंट्याचे दुसरे कागदहि ह्यांमध्ये आहेत. पाटीलकी वादग्रस्त पडली तर सरकार ती जप्त करीत असे; म्हणजे निकाल होई-पर्यंत सरकार आपला कारकून पाठवून त्याच्या मार्फत पाटीलकीचें काम करून घेत असे. हे तंटे आपसांत पंचायतीकडेच निकाला करिता सोपविण्यांत येत. पंचा-यतींत निरनिराळ्या जातींचे लोक असत व कांहीं महत्वाच्याप्रसगीं एका गांवांतील तंटा दुसऱ्या गांवांतील लोकांवर सोपवीत. याला थळ नेमून देणें म्हणत. थळ निश्चित झाल्यावर पक्षकारांना थळपत्र करून देण्यांत येत असे (१७). अकलूज परगण्यांतील खंडाळी गांवच्या पाटीलकीचा तंटा पडला असतां अमृतराव नाईक जहागीरदार व जमीदार ह्यांनी थळ नेमून दिल्याचा उल्लेख नं. ३ च्या कागदांत आहे.

पाटीलकीप्रमाणे कुळकर्णी वतनांचा वाद उपस्थित झाल्यास तें वतन जप्त करून कामगार कुळकर्णी म्हणून सरकारी कारकुनाची नेमणूक होई (२). हें पत्र अथवा हा हुकूम बाळाजी बाजीरावाची कारकीर्द असतांनां सदाशीव चिमणाजी ह्याने दिला आहे.

एकाच कज्जासंबंधाने दोन निवाडे न होऊं देण्याबद्दल दक्षता बाळगण्यांत येत असे. एका खुनाच्या कामांत असें कां झालें असें थोरल्या माधवरावांनी अमृतराव नाईकाला खुलासा करण्याबद्दल पत्र लिहिलें आहे.

"कजीया तो येक आणी निवाडे दोन जाले त्यास ......दुसरा नीवाडा

होउन नावाडपत्र कसे जाले ते हुजुरास समजले पाहीजे. तर जमीदार हुजूर पाठवणे अगर कचे वर्तमान साकसूरत तुम्ही व जमीदारानी संशये न धरीतां हुजुर लीहीणे जाणीजे छ २२ सफर बहूत काय लीहीणे " (३ अ)

स्थळ नेमून दिलें म्हणजे तेथे हरदू वादी, साक्षीदार व ज्या गावचा कज्या असेल तेथील अधिकारी यांना नेमून दिलेल्या स्थळीं जावें लागे. स्थळ नेमून दिल्यावर तेथील कोणत्या लोकांनी तंट्याचा निकाल करावयाचा हेंहि ठरविण्यांत येई. कुरवली परगणे भालवणी या गांवच्या पाटीलकीसंबंधाने तंटा लागून खूनहि झाला होता. या कामीं नरसिंहपूर येथील ब्राह्मणांनी त्याचा निकाल करावा म्हणून ठरलें होतें. ह्या दाव्यांत परगणा भालवणी येथील देशमूख य देशपांडे हे ठरल्याप्रमाणे साक्ष न देतां पळून गेले म्हणून त्यांचें वतन सरकारांत जप्त करण्यांत आलें (३). हें पत्र थोरले माधवराव यांनी अमृतराव नाईक यास लिहिलेलें आहे. या पत्रांत सरकारी घुगरीचा ऐवज रु. १२०० बाराशें जमा असल्याचा उल्लेख आहे. ह्यावरून घुगरीसारख्या किरकोळ कराचें उत्पन्न सुद्धा सरकारांत बरेंच येत असे असें दिसतें.

हा तंटा निराजी व सदोजी पाटील यांच्यामध्ये होता. निराजीचा जामीन सरकारांतून घेतला होता. नरसिंहपूरच्या ब्राह्मणांनी तंट्याचा निकाल करावा असा सरकारी हुकूम असतांना जहागीरदारांनी निराजीचे भाऊबंद व जामीन यांच्या पायात बेड्या घातल्या व शेत जप्त केलें व त्यांचीं मुलेंमाणसें घरांतून बाहेर काढलीं. या "खट्काळ" गोष्टीबद्दल पेशव्यांनी जहागीरदाराला दोष देऊन बिड्या काढून टाकाव्या, जप्ती खुली करावी व मुलामाणसांस घरांत नांदूं द्यावें अशी ताकीद केली. न्याय्य तोच निवाडा व्हावा असा सक्त हुकूम सरकारांतून झाला होता. "रास्ती नीवाडा होये ते करणे ईनसाफास रुन्यायेत भीड मुरवत नसावी न धरावी एवीसी सरकारचे कारकूनास लीहीले असे." (३ आ)

जहागिरीच्या अमलाशिवाय ठाण्याचा म्हणजे गांवाचा म्हणून एक दुसरा अंमल असे. या अंमलाची वर्गावर्गी सालोसाल करीत असें दिसतें. भालवणीचें ठाणें प्रतिनिधीचा मुतालीक येमाजीपंत यानें घेतलें होतें तें त्याच्याकडून काढून बाळाजी बाजीरावाने अमृतरावाला दिल्याचा उल्लेख नं. १२ च्या पत्रांत आहे. याच्या उलट कसबे येलापूर येथील ठाणें अमृतराव नाईकाकडून काढून प्रतिनिधींनी भगवंतराव माने यांस १७५६ सालीं दिलें असें नं. ११ वरून दिसतें.

येलापूर हा गांव प्रतिनिधींनी अमृतरावाला नोकरीकरितां दिला होता. श्रीनिवास-राव प्रतिनिधी नं. ८ च्या पत्रांत म्हणतो "येलापुरचें ठाणें पेशजीपासुन तुम्हाकडे (अमृतरावाकडे) आहे त्याप्रमाणे करार केले आसे जमावानीसीं सालाबादप्रो हुजूर सेवा करावी."

नं. १३ चें पत्र थोडें विचार करण्यासारखें आहे. हा नारो शंकर पंडीत प्रतिनिधी याचा देशमूख व देशपाडे परगणे भालवणी यांस हुकूम आहे. या पत्राचा सन सलाससीतैन मया अलफ म्हणजे इ. स. १७६२ हा आहे. १७६२ त नारो शंकर पंडीत प्रतिनिधी असल्याचें दिसत नाही. नारो शंकरला राघोबा-दादाने एक वर्षभर प्रतिनिधिपद दिल्याचें इतिहास सांगतो. इ. स. १७७३ पूर्वी राघोबादादा पेशवा नव्हता. यामुळे या पत्राची संगति लागत नाही.

येमाजी शिवदेव हा प्रतिनिधींचा मुतालीक होता तरी त्याच्याकडे पेशवे सरकारातून भालवणी जहागिरीतलि कुरुली, शेलगांव व शेगांव या तीन गांवांचा मोकासा होता. या मुकासे गावाचा अंमल येमाजीचा कमावीसदार करील ही गोष्ट पेशव्यांनी अमृतरावाला कळविली आहे (नं. २३). यावरून गांवांच्या हक्कासंबंधानें सर्व जातींच्या हक्कदारांना माहिती देण्याची वहिवाट असे. परंतु दुसऱ्या एका पत्रात (नं. ७) अमृतरावाकडे हेच तीन गाव होते असें दिसतें. अमृतरावानी २५ राउत यमाजीकडे चाकरीस द्यावयाचे. ह्या चाकरीचा मोबदला म्हणून तीन गांवांचा वसूल घ्यावयाचा.

पागेच्या बेगमीकरिता गांवचा मोकासा देण्यांत येत असे. हे मोकासे एकाच माणसाकडे पुष्कळ वर्षे चालले तरी त्या संबंधाचा करार प्रत्येक सालाला नवा करण्यात येई (नं. २७). नं. १८ हें आज्ञापत्र फत्तेसिंग भोसले यांचें असून पत्राच्या शेवटीं पंतप्रतिनिधींप्रमाणें "निर्देश समक्ष" हीं अक्षरें आहेत.

अकलूज येथील पेठ बसप्पा नांवाच्या वाण्याने बसवली. पेठ बसवणाऱ्यास शेटेपणाचा हक्क मिळतो हें नं. ४ वरून दिसून येईल.

दुसरें सदाशीव चिमणाजीचें पत्र म्हणजे नं. २ चें होय. हें इ. स. १७६० सालचें आहे. या वेळेस सदाशीवरावभाऊ पानपतच्या लढाईवर होते.

## चोरीच्या जागेच्या मातीवरून चोराचा सुगावा

" ......यानंतर वो रो वीश्वनाथ दीक्षीत अयाचीत याजकडे गेलो होतो. त्याणी सांगीतले की तीन रोजाचे आत कळले असते तरी ततःक्षणी चोरी आणून दील्ही असती. परतु आता दीवस फार जाहले. हाली त्याचे म्हणणे पडले आहे की आम्ही पुण्यास येतो तीन दीवस राहून उपाय करीतो. हस्तगत व्हावयाजोगे असल्यास आठ पंधरा दीवस राहून कार्य करून येईन. नाही तरी राहाणार नाही. तुर्त खर्चावयास पाच रु मागतात. नाही तर वाई मुकामी राहून बंदोबस्त करीतो. त्यास खर्च अडीच रुपये लागतात. चोरी सापडली म्हणजे चवथाई कबूल केली आहे. त्याचे शकुनात ब्राम्हण वीश्वासु व शुद्र वीश्वासु याचे हातुन स्त्रीचे हस्तगत जाहली आहे. या प्रो सागीतले. त्यास तेथे पाठउन द्यावे असे युक्तीस आल्यास पा देतो. परतु आज पाच रु कृष्णार्पण होतात असे आहे. यास्तव वीच्यारास आल्यास उत्तर येईल तसे करीन. चोरी खास येते असे नाही. परतु प्रयत्न करावा. हाली येथुन पुडीत जीनस त्याणी दील्हा आहे तो ज्या ठीकाणी चोरी जाहली त्या जाग्यावर टाकून तेथील मृतीका पुडीत घालून पा द्यावी. जोसीबावा याचे प्रश्नात शुद्राचे हातुन स्त्रीचे हस्तगत जाहली आहे प्रयत्न केल्यास सापडेल व पत्रीका करीत आहेत. तयार जाहली म्हणजे पा देईन.

श. १७५९ सखारामशास्त्री भट यांचें तात्यासो चीपळोणकर यांस पत्र

## नवे गव्हर्नर

गोरनरसाहेबाचे दरबारास मी गेलों नाहीं. परभारें ऐकिलें कीं उंबर वर्षे ३५. भाषा कांही येत नाही. दरबार दोन बुधवार जाले. पुढे बुधवारीं होणार. अद्यापि कोणाचीं कामें काजें बोलत नाहीत. कामें काय बडे लोकाचीं असतील तीं दरबारचे दिवशीं बोलावीं म्हणोन हुकूम जाला आहे. कळावें.

(राघोबा थत्ते यास चिपळूणकराचें पत्र)

खासगीवाल्यांच्या ह्या खाजगी जमाखर्चांत पेशव्यांबद्दल अगर राजकारणाबद्दल प्रत्यक्ष उल्लेख असणें शक्य नाही. तथापि जी कांही थोडीबहुत माहिती मिळते तिचा निर्देश येथे करणें अप्रस्तुत होणार नाही. शके १७१८ मार्गशीर्ष छ ५ रोजीं बाजीरावास राजवस्त्रें मिळाल्याचा उल्लेख आहे. १४॥ रु. " नजर श्रीमंत राजश्री बाजीरावसाहेब यांस राजवस्त्रें जालीं त्याच्या नजरा जाल्या छ ५ रोज मोहोर १ किंमत रुपये" बाजीरावसाहेब पुढें गादीवर बसणार म्हणूनच कीं काय २।३ दिवस अगोदर खाजगीवाल्यानी १ रु. ची "हरजिनसी भाजी" बाजीरावसाहेबांकडे पाठवून दिली. शक १७३२ फाल्गुन छ २९ रोजीं १ पुतळी किंमत रुपये ५ " सौ. बाईसाहेब यांस पदर घातला त्याबद्दल " खर्च पडली आहे. ह्या बाईसाहेब म्हणजे बहुधा बाजीरावाची बायको असावी. कारण "नजर श्रीमंतांकडे" ह्या मथळ्याखाली हा खर्च मांडला आहे. पण ह्याच्यापूर्वी म्हणजे कार्तिक महिन्यांत छ. २९ रोजीं बाजीरावास मुलगा झाला होता.

इनाम माहे सवाल कार्तिकमास

रु. ३ छ २९ राजश्री श्रीमंत राजश्री बाबासाहेब यांस पुत्र झाला सबब साकर घेऊन हुजूर आले त्यास

२ गोपाळजी निा सरकार

१ बापू वाटुजकर निा सदाशिव माणकेश्वर

३

॥ छ २९ रोज अण्णा ढमढेरे यांजकडील सीपाई यास गु जामदार रु.

३॥

ज्या अर्थी ढमढेऱ्यांचा शिपाई पुत्रजन्माची शुभ वार्ता सांगण्यास आला होता त्या अर्थी बाजीरावाला हा मुलगा ढमढेरे यांची कन्या वेणुबाई इजपासून झाला असावा; व तो बारा दिवसांच्या आंतच मेला असावा. कारण पुढें २० रु. कुंची बादली (बादली—सोन्याची) "श्रीमंत बाबासाहेब यांचे पुत्राचे बारशास करविली ती शिलकेस राहिली" येणेंप्रमाणे उल्लेख आहे.

वर ५ रुपयांची पुतळी बाजीरावाच्या बायकोच्या पदरनिमित्तानेच खर्ची पडली असावी असें अनुमान केलें आहे; पण शक १७३१-३२ च्या चैत्र महिन्यांत येणेंप्रमाणे खर्च पडला आहे.

माहे रबीलौवल चैत्रमास

रु. ५५ छ १८ रोज श्रीमंत सौ. कुसाबाई साहेब यांस पदर घातला ते समयीं आहेरास सनगें माघ वा। ९

१० तीवट तांबडें पैठणी १

४५ दुपटा पैठणी १

५५

ही कुसाबाई कोणाची मुलगी हें जमाखर्चावरून समजत नाही. सोहनी-कृत पेशव्यांच्या बखरींत हिचें नांव नाही.

शके १७३८ भाद्रपद वा। ४ रोजीं बाजीरावसाहेबांस आणखी एक पुत्र झाला असें दिसतें. १ रु. इनाम श्रीमंत राजश्री बाबासाहेब यास वा। ४ पुत्र झाल्याचें वर्तमान सांगण्यास बापुसींग आला त्यास इनाम दिल्हे ता। खुद्द. स्वारीस जातांना, दसऱ्यास, अथवा अशाचसारख्या दुसऱ्या प्रसंगीं पेशव्यांस नजर देण्याचा प्रघात असे. शक १७१९ च्या आश्वीन महिन्यांत १५ रु. नजर दसरियाची श्रीमंत राव. बाजीरावसाहेब यांस छ ८ रोजीं खर्च पडले आहेत.

श्रीमंताकडूनहि सरदारास दसऱ्याचा पोशाख जात असे.

२ रु. इनाम दसरियाचा पोशाख श्रीमंताकडील आणिला त्यास छ ८...... कृष्णाजी खीजमतगार यास

दसऱ्याप्रमाणे वर्षप्रतिपदा, शिमगा, राखी पौर्णिमा इत्यादि सणांच्या दिवशीं श्रीमंतांस नजर करण्याचा प्रघात होता.

५ श्रीमंतास वर्षप्रतिपदेबा। पुतळी ताट १. रावळ चैत्रमास (१७३३ शक)

५ छ २९ रोज श्रीमंतास नजर राख्ये पोर्णिमेबा। पुतळी ताट १

शिमग्याच्या सणाचीं श्रीमंतांस गांठीहि देत असत. (रमजान अश्वीनमास)

१ श्रीमंतांस सिमग्याबा। साकरेची गाठी वजन ८०१। छ २९ (सफर फाल्गुन मास)

याशिवाय गाठीबा। आणखी १ पुतळी श्रीमंतांस मिळाली आहे.

१० छ २९ रोज पुतळ्या २ ताटे

५ श्रीमंतांस गांठीबा।

५ सौ. बाईसाहेब यांस पदर घातला त्याबा
———
१०

माघ शुा ५ श्रीमंत रंगासगेले त्या प्रसंगींहि त्यांस लोकांकडून नजरा मिळाल्या :—

माहे मोहोरम माघमास

९।।।- छ २९ रोज माघ शुा ५ रंगास गेले सबब

पुतळ्या ताटे २ एकूण दर ४।।।=।। प्रमाणें

१ तात्याकडे पुतळी १

१ नानाकडे पुतळी १
———
२

राख्या बांधण्याची चाल महाराष्ट्रांत सध्या लुप्त होत चालली आहे. पण पेशवाईंत ती चाल जारी असून बायकांनाहि राख्या बांधीत

१८≡ राख्या कलाबतुच्या गुा जामदार

।।।। श्रीमंतास

।। जावई यास

८-।।। चिरंजीव नीळकंठराव यास

८-। चिरंजीव सौ. येमुनाबाईस
———
१८≡

सवाई माधवराव स्वारीस शके १७१० च्या अश्वीन महिन्यांत निघाले. तेव्हां त्यास १ मोहोर खाजगीवाल्यांकडून नजर करण्यांत आली (१४। रु. श्रीमंतास नजर छ ११ स्वारीस निघतां मोहोर १ किंमत) श्रीमंत पेशवे (माधवरावसाहेब) अमरसिंग जाधव, खंडेराव दरेकर (श. १७०९ कार्तिक छ १९ व २५ रोजीं) बाळाजी नाईक (फाल्गुन), त्रिंबकराव महिपतराव चिटणीस (१७१० चैत्र मुंजीनिमित्त) इतक्या इसमांकडे मेजवानीस गेल्याचा उल्लेख आहे. कारण समागमें खासगीवाले (निळकंठराव गोविंद) असल्यामुळें श्रीमंतांबरोबर त्यांस मिळालेलीं सनगें जमाखर्चांत जमा आहेत. सरकारी कोठीकरितां खासगीवाले जिन्नस खरेदी करीत. त्याप्रमाणे लाकडें, तेल, बाजरी, ह्यांच्या खरीदीच्या रकमा नांवें पडल्या आहेत.

मराठी राज्यांत तुरुंग फक्त राजकीय कैद्यांकरता असत. बाकीच्या गुन्ह्यांना दंडाचीच शिक्षा होई; आणि ही शिक्षा सुद्धा गांवच्या पंचांकडून अगर शिष्टां-

कडून होई. नोकराच्या अपराधाबद्दल यजमान दंड करून वसूल करी असें दिसतें. म्हणजे तो दंड सरकारांत जमा होत नसे. खालील रकमांवरून हें अनुमान उघड दिसण्या सारखें आहे.

१०० खंड फरोई (फुरई) मौजे पाटेठाण येथील मुक्ती भापकरीण ईनें बदकर्म केलें सबब घेतले गु॥ कुसाजी दखडे चांदवड छापी वसूल आले ते जमा (श. १७१९ वैशाख)

५० जमा कमावीस बाळाजी गायका कोठावळा याजकडे गुन्हेगारी येणें रु. १५० पौ पेसजी आले १०० बाकी येणें ते जमा केले (शक १७१९ आश्वीन)

५२ कमवीस जमा

५० गुा मुक्ती भापकरीण सीदळकीबद्दल ठराव रु. १५० पौ पेशजी आले १०० बाकी

२ घोड्या महार याणे वैरणीची चाहाडी केली सबब

५२

२६० कामाठीणी २३ त्याणी कोठीचे कुलूप काहडून हरभरे चोरी करून जात होत्या त्या धरून त्याजपासून गुन्हेगारी घेतली गुा येसू कामाठी व हरी धुल्या वगैरे ... ...

२५० ऐन खंडणी

१० कारकुणी (श. १७१० भाद्रपद)

३० रु. खंड फरोई बाळा घुगा याने लबाडी केली सबब खंड गुा (श. १७१९ ज्येष्ठ)

श. १७१० आश्वीन

हिशेब मौजे पाठेठाण

२७। जमा कमावीस मौजे मजकूर

२३ वलतीकर रामोशी याणीं दोरींतील बाजरी चोरून नेली सबब

।· अपाजी हंबीर याचे म्हशीने पावटा खाल्ला सबब

१ तीर्थु हंबीर याणे भापकर यासीं कजीया केला सबब

१ भवानी राजपुरा व लक्ष्मण गवळी याणीं कुरणांतील बाभळी तोडली सबब

२७।

२८ अमानत जमा वासुदेव लक्ष्मण कुलकर्णी याणे आपले यमाजी अनंत

चुलता यास मारिले सबब गुन्हेगारी घेतली ते तूर्त अमानत जमा केले असत

गांवांतील लोकांस तगाई देण्याची वहिवाट होती हें खालील रकमेवरून दिसून येईल

२०० गांवकरी यांसी तगाईबद्दल साल गुदस्त रुपये दिल्हे होते...ते जमा आले

दुष्काळाच्या सालीं इनामदार आपल्या रयतेस वसुलाची नुसती तहकुबी नाहीं तर सूट देत असत.

११०१ मौजे घोटी ऐन बेरीज ४५०१ पो वजा नाकसल्यामुळें सूट रुपये ३४०० बाकी रुपये ( श. १७१० आश्वीन )

इनामदारांना सोडचिठ्ठी देण्याचा अधिकार असे व त्याबद्दल त्यांस कर-हि द्यावा लागत असे.

१॥। छ २९ (श. १७३२ भाद्रपद) रोज हीपरगी पो गुा गोविंद रामचंद्र हरी वसापा तुपद याची लेक तिमपा मदूर याची बायको इजला नवरा नको सबब सोडचिठ्ठी मागीतली त्याजबद्दल

बाहेरून आणलेल्या मालावर सरकारी जकात असे. श. १७१९ च्या अश्वीन महिन्यांत खासगीवाले यांनी घोटीहून पुण्यास उंटावर जिन्नस आणिले त्या-वेळीं २८≋ जकात खर्च पडला आहे. तसेंच ह्या सालीं इतरत्र ५ रुपये जकाती-बद्दल खर्च पडले आहेत. हे जिन्नस म्हणजे तांदूळ व मीठ; आणि ते कोंकणांतून आणले. वाटेंत बारामती, बेवळें व टुभुरणी ह्या ठिकाणीं जकातनाकीं होतीं. कारण जकाते हडपे नाक्यावर राहिली, बारामती बेवले ४ टुभुरणी असा मजकूर आहे. पण ह्याशिवाय बाकी सरकारांत खर्च रु. ५६ पुण्याचे पोत्यास जमा केले

२३ चैत्र वा ६

३३ ज्येष्ठ शु. ८

५६

येणेंप्रमाणे तपशील लिहिला आहे. ६००।७०० रुपये किंमतीच्या माला-वर हा कर होता.

खाली दिलेल्या कमावीस जमेच्या दोन रकमांवरून तत्कालीन राजपुरुष व प्रजा यांचा परस्परसंबंध दिसून येतो.

३९॥।=॥। सींदे यांचे लग्नाचे फडफर्मासीच्या चिठ्या गांवावर आल्या त्यांपैकी नफा

५० मौजे घोटीस खडर्यांचे मुक्कामींहून स्वार रखवालीस आणिले त्याचे

दाण्यावैरणीबद्दल गांवापासून घेतले ते

सरंजाम गांवांतील पाटलाचें वतन जप्त करण्याचा अधिकार सरंजामी यास होता असें खालील जमाखर्चावरून दिसतें.

१२७८- मौजे घोटी येथील पाटलाचे हक्क अमानत आहेत त्यापैकीं

११४।।।=।।। सन खमस

१२८=। सन सीत

१२७८-

५८।।। मौजे खेडें गुा लक्ष्मण पाटील याचें शेत जप्तीस आहे त्यापैकीं उत्पन्न

३७।।-।। सन खमस

२०।।≥ सन सीत

५८।।।

श. १७१९ च्या अश्वीनांत ह्या संतोषपट्टीची रक्कम ७५०० रुपये नावें पडली आहे.

७५०० संतोषपट्टीबद्दल सरकारांत ज्येष्ठ वाा १ देणें चिंतो आत्माराम तांबोळी यांची चांदवड छापी निाा पागनीस निाा सींदे

पेशव्यांकडे जेवणावळी होत तेव्हा त्यांचे मक्ते देत असत असें अनुमान खालील उताऱ्यावरून होण्याजोगें आहे. १३ रुपये भांड्यांच्या भाड्याबद्दल जमा सरकारचे मक्तेदार यार्णी द्वादशीचे भोजनाचा मक्ता केला त्याजबद्दल एक-रोजा पांचशें पानांचीं भांडीं मक्तेदार यार्णी बापू शास्त्री अत्रे यांचे विद्यमानें नेलीं त्याजबद्दल एक रोजाचा उक्ता ठराव करून घेतले रुपये श्रावण शुा ११ शक १७३८

१० दरबार खर्च जमिनीचे पत्र मुळे कारकुनास दिले......शिवराम नारायण

श्रीमंतांच्या हुजऱ्याचा उपयोग कसा करून घेत, हें खालील खर्चाच्या रकमेवरून दिसून येइल.

।· इनाम हुजऱ्या श्रीमंत अमृतराव याजकडील रामेश्वरचे पीळवत्ती वाळे तोडीत होते त्यास मना करावयासी आणिला सबब देणें बाळाजी गाइकवाड यास छ ९ ताा जावजी जाधव (१७१९ भाद्रपद)

गांवास माणसें बसवून सरकारपट्टी वसूल करण्याची घाइ बाजीराव करीत असे.

१।· सरकारचे पट्टीबद्दल माणसें बसलीं त्यास छ १० ताा कासोजी आवजी जथे नारोजी नाईक जासूद.

·।।।· आा ३ जासूद दर ·।·

·।।· कारकून सखोपंत

१ देणें सखोपंत कारकून निाा सरकार काल तगाद्यास होते त्यास जाजती देविली छ ११ ताा गणेश जनार्दन (श. १७१९ वैशाख)

शक १७३२ सालींच फिरंग्यांनीं पेशव्यांच्या राज्यांत आपला दरारा बसविला होता, हें खाली दिलेल्या खर्चावरून दिसून येतें.

१३ छ २९ माहे रमजान रोज गुाा कुसाजी माळी पाटेठाणचे कुरणांत फिरंग्याकडील सीरूरचे मुक्कामीहून तोफखान्याचे बैल चारणीस आले त्यास वगैरे खर्च पडला तो

१ बापु ढमढेरे कुरण पाहणीस आले त्यास

७ फीरंगी याजकडील लोक आले त्यास

१ बकरें

१ दाणा

१ तूप

४ रोख

७

५ तोफखान्याचे बैल कुरणांत चारणीस आले सबब पानसुपारी बाा दरबार खर्च

१११ माहे रजब श्रावणमास चिंतोपंत देशमुख याणीं कुरणें जप्त केली सबब देणें महार गोपाळ यास

६५ कुरण खडकवासलें

४६ कुरणें पाटेठाण

१११ (श. १७३२)

ह्याखेरीज ह्या जमाखर्चांत पेशव्यांचा अगर इतर राजकारणांचा निर्देश नाही. एके ठिकाणीं आठ आणे खर्च पडला आहे त्यावरून श्रीमंत श. १७१८ फाल्गुन छ २५ दिवशीं चिंचवडास देवदर्शनास गेले होते. त्यांच्याबरोबर खासगींवालेहि होते असें दिसतें.

॥· श्रीदेव चिंचवड यांचे दर्शनास श्रीमंतांसमागमें गेले तेथें ठेविली छ २५ ताा जीज

घरांत पुराणिकाकडून दररोज स्त्रियांस भारत, गीता वगैरे ग्रंथ वाचून दाखविण्याचा प्रघात विशेष असे.

२॥ मातुश्री राधाबाई भागवत गीता पोथी लिहिणावळ छ ६ ताा विनायक भट उपाध्ये रोख ( श १७०९ कार्तिक )

१ गोपाळ चिंतामण द्रोणपर्व समाप्तीस दक्षणा छ १ रोज(श. १७०९ माघ)

१ं॥० धर्मादाय मातुश्री राधाबाई यांजकडील कर्णपर्व प्रारंभास दक्षणा छ ४ ताा नारायण खरा

२ गोपाळ चिंतामण गीता समाप्तीस दक्षणा छ ५ रोज (श. १७१० चैत्र)

१ं।० शैल्य पर्व प्रारंभपूजन सौ. पार्वतीबाई कडे दक्षणा छ २९ ताा नारायण ( खरा शके १७१० ज्येष्ठ )

१ं। पुराण भारती गदापर्व प्रारंभ पूजन छ २१ ताा मातुश्री राधाबाई कडे ताा येमाजी भोई ( आषाढ १७१० )

१ मातुश्री राधबाईकडे सौप्तिकपर्व प्रारंभ पूजन छ ११ ताा नारायण खरा

१ं।० मातुश्री राधाबाई कडे पुराण शांतीपर्व प्रारंभ पूजन छ १९ ताा नारायण खरा ( शके १७१८ माघ )

१ं॥· मछपुराण समाप्तीस पूजन

छापण्याची कला नसल्यामुळे ग्रंथलेखकांचा धंदा चांगला चाले.

३॥· सुंदर लहरी ग्रंथ लिहिणावळ गुाा गणोबा लेखक...ग्रंथ १२५० दर ३ प्रो छ ४ ( १७०९ पौष )

पुढे आणखी ४ रु. नांवें पडले आहेत.

४ पोथी लिहिणावळ सुंदरलहरी सटीक पत्रें ५६ ग्रंथ १४०० दर हजारी रु. २॥· प्रमाणें छ २४ बाबुराव मल्हार लेखक यांस.

१।· पोथी लिहिणावळ ग्रंथ कामसमूह ४५० पत्रें सुमार यास रुपये २॥· प्रमाणें ताा बाबाजी मलकर लेखक

सुंदरलहरी व कामसमूह हे दोन ग्रंथ कोणते असावेत हें समजत नाहीं. सुंदरलहरी म्हणजे कदाचित् शंकराचार्यांच्या नांवावर असलेला सौंदर्यलहरी नांवाचा ग्रंथ असेल; पण कामसमूह ह्या ग्रंथाचा शोध मला लागला नाहीं.

खालील रकमांवरून पूर्वीचे लोक आपल्या खाजगी व्यवहारांत किती चोख व हिशेबी वागत असत तें दिसून येईल.

३ बैल चुकारीचा आला होता तो जावजी कामेरे अस्तागीर निा नाना फडणीस याचा निघाला तो माघारा दिल्हा त्याचे वैरणीबद्दल घेतले छ ३ (श. १७१९ आषाढ ) गुाा बाळा जामदार चांदवड छापी बैल राणोजी खास बारदार निाा राजेश्री नाना फडणीस याचा कागद घेतला आहे विाा जावजी कामेरे माार.

·।· आवळे टोंचण्याचें काटे गणपतराव कानेरे यांचे आणिले होते त्यांपैकीं दोन कांटे गमावले ते नवे करून दिल्हे त्यास छ २५ ( श. १७१८ पौष ) ताा बाळा जामदार रोख पावली १

·।– धर्मादाय घरचे ब्राह्मण आचारी यास सोमवारामुळें रमण्यांत सिध्यास जाऊ न दिल्हे सबब

५ रामभट आचारी यास रमण्यांतील दक्षणेच्या दिवशीं घरीं राहविला सबब दक्षणा छ १८ रोख

त्याचप्रमाणे पुढेः—

१ चीमाजी कदम नवा बारगीर ठेवावयास आणिला तो मोहोनी घोडी-वर बसोन हजीरीस गेला त्यास वाटेनें येतां हणमंता टीलेकर याचे कुणबिणीस धक्का लागोन पाडीलें त्याबद्दल देणें कुणबिणीस ( शके १७६३ भाद्रपद छ २९ )

पेशवाईत स्त्रिया जोडे वापरीत असत. जोड्याला पायपोस म्हणत.

१॥= जोडे पायपोसाचे छ २२ ताा. लछीराम चव्हाण

·।।।· काकुबाईस १

·।।· सौ. ताईस १

·।= चिरंजीव

१॥= ( श. १७१८ फाल्गुन )

·।।· सौ. पार्वतीबाईकडे पायपोस जोडा १ किाा छ २६ ताा बाळा ( १७०९ पौष )

तिकिटें लावून नाटकें करण्याचा प्रघात पूर्वी नव्हता; व नाटकेंहि ळळीता-खेरीज होत नसावीं. लोकांची करमणूक होण्यास कर्णाटकी दशावतारी खेळ गवयानी यांची करामत ह्यांवांचून दुसरें कांही साधन होतेंसें आढळ नाही.

शके १७१८ फाल्गुन

२ इनाम खेळ कर्नाटकी याचा केला त्यास
छ. १६ रोज ताा. बाळा घुगड खिजमतगार रोख

५ खेळ दशावतारी कर्नाटकी रामायास छ २४ ताा लक्ष्मण...

१॥० खेळ कर्नाटकी भोवरा वगैरे खेळाचा छ २८ रोज

८-॥० खेळ कोल्हाडीयाचा त्यास

१४ चाळीस आवधानी यास मोहोर १ - छ २७ जील्काद श्रावण वाा
१४ ताा रामा जापे (श. १७१०)

चित्रकारांचें चीज चागलेंच होई. कारण "मुंजीकडे चित्रें घरांत काढलीं" तीं काढणाराला ८ रु. दिलेले नांवें पडले आहेत.

पेशवाईतील स्त्रिया वादनाभिलाषी असत व त्यांची लालसा पुरविण्यास वाद्योपजीवी अश ,ादनपटु बायकाहि तयार असत असें दिसतें.

२ चिमाबाई पकवाजी तिचे रोज २ काकूबाईनी सागितले ताा रूवरू छ
१३ रोज ताा काकूबाई रोख" (शके १७१९ श्रावण)

फलज्योतिष, नवस, शकुन, अपशकुन वगैरेवर लोकांची श्रद्धा असे. घोड्यावरून पडलें असता घृतदान करीत

१ धर्मादाय घृतदान घोड्यावरून पडले सबब छ १४ रोज वाटी कासे
१ वजन ८८८१७ त्याजवर दक्षणा ताा गोविंद (श. १७०९ पौष)

१ सेरणी कृष्णी घोडीचे नवसाची ताा काकूबाई

इनामाचा खर्च त्या वेळीं लोकांना बराच असला पाहिजे असें दिसतें. दसरा, दिवाळी, शिमगा इत्यादि सणांच्या निमित्ताने पेशवे, चिमाजीअप्पा, अमृतराव, नाना फडणीस, परशरामभाऊ, आप्पाबळवंत, राघोजी भोंसले, आप्पा पेठे, लक्ष्मणराव रास्ते इत्यादिकांच्या चोपदारांस, खिजमतगारांस वगैरे इनामाबद्दल दिलेले रुपये वारंवार खर्च पडलेले आहेत.

६ इनाम चोपदार सरकारचे यांस वर्षासनाचे साले गुा प्रो छ ३
(श. १७१९ चैत्र)

३ विाा लिलाराम...ताा ब्रिखभान चोपदार

३ विाा भवानीसिंग वो॥ राजाराम चोपदार

१ इनाम आरब निाा नाना फडणीस शिमग्याचेपोस्त छ १६ (श. १७१८ फाल्गुन)

४ इनाम रा. नाना फडणीस यांजकडील प्यादे यांस छ १५ ( शके १७१८ पौष )

१ लकडखान्यांतील नळावरील चौकीदारास इनाम छ २ ता॥ विठोजी मोरे नि॥ देवजी ( शके १७१० चैत्र )

२॥=॥। सौ. आनुबाई यास रजोदर्शन प्राप्त जाहले सबब भवानी खिजमतगार सागावयासी आला त्यास तिवट १ (श. १७१९ अश्वीन)

१ इनाम गुलाबसिंग चोपदार नि॥ सरकार वि॥ बीजेसिंग......स्वारीचे बोलावण्यास त्यास छ २१ पा॥ रूबरू (शके १७१९ चैत्र)

८ इनाम शिमग्याचे पोस्त खिजमतगार श्रीमंतांकडील त्यास छ २२ (शके १७१९ चैत्र)

४ नि॥ श्रीमंत बाजीरावसाहेबांकडील
४ नि॥ श्रीमंत आप्पासाहेबाकडील
—
८

६ इनाम गोपाळा काछी हडपसरकर यानें आंबे नजर आणिले चांगले सु॥ कच्चे १५० त्यास तीवट १ छ २३ किंमत (श. १७१७ ज्येष्ठ)

३ इनाम चोपदार सरकारचे यास आंबे सु॥ २०० दोनशे त्याची किंमत ता॥ छटुराम नंदराम चोपदार छ २ (श. १७१० ज्येष्ठ) रोज रोख

-॥। इनाम श्रीगणपतीचा उत्साह सरकारवाड्यात आहे तेथील कीर्तनाचे बोलावणे करावयास आसाराम चोपदार व ...... एकुण दोन असामी आले त्यास ता॥ आसाराम (शके १७३८ भाद्रपद)

१ माधवराव नगरकर याची सून सौ. सगाबाई बाळंत झाली पुत्र जाहला त्यास इनाम गणोजी थोरात नि॥ थथे छ ३ (श. १७०९ फाल्गुन) रोज

शिमग्यामध्यें तमाशा करवून पोर नाचविणें या गोष्टीस अशिष्टत्व प्राप्त झालें नव्हतें. हें खालील खर्चावरून दिसून येईल.

(शके १७१०. चैत्र)

६ शिमग्याचा पोर नाचविला त्यास सिरपाव तीवट १ छ ९ राज बागत खेळ केला ते समई रात्रीस लक्ष्मण जामखेडकर

पागोट्याशिवाय रोख पैसेहि ह्या पोरांस मिळाले.

४ शीमग्याचा खेळ बागेत पोरगा नाचविला त्यास बिदागी छ ९ ताा
प्रभाकरभट वैद्य जामखेडचा पोरगा लक्ष्मण मराठे

तसेंच श. १७०९ च्या फाल्गुनांतहि असा खर्च पडला आहे.

२० शीमग्याच्या खर्चाचे छ २९ रोज ताा प्रभाकरभट वैद्य
१० बाळ्या पोरगा पेठ शुक्रवार नाचणार
५ गंजपेठचा पोरगा नाचणार यास
५ मोघया सोंगाडी
२०

लोक श्रीमंत असल्यामुळे धर्मादाय फारच होत असे. अशा धर्मादायावर भिक्षुक मंडळीसुद्धा सुस्थितींत असणें साहजिक आहे. नित्य स्नानसंध्येस व देवपूजेस हल्लीप्रमाणे तुलसीपत्रावर न भागवितां प्रत्यक्ष पैसा ठेवण्याची वहिवाट असे. दर महिन्यास जीं विहित कर्मे तीं यथासांग करीत असत.

१ नवे पंचांगश्रवणाबद्दल रामजोशी रोडे (श. १७१८)
।• संवत्सर प्रतिपदा घुडीपूजनास छ २९ बुधवार ताा रामजी
॥• वसंतमाधव गौरीचे दानास

१४॥− सौ. पार्वतीबाईकडे चैत्रा गौरीचे दानास एक माही रोज ३३ जोडे सुाा ३३ पायपोसाचे खरीदी छ ३० (श. १७१०) रोज रु.१४॥−

पुढे वैशाख महिन्यांत वसंतपूजेनिमित्त येणेप्रमाणे खर्च पडला आहे :—

६५।=॒ वसंतपूजा छ ८ शिष्ट ब्राह्मणांची
२२ दक्षणा आमंत्रणाचे
१ बापुभट माटे
१ चिंतामण जोशी
१ सदाशिव जोशी मेणवली
१ महादेव भट चिपळोणकर
१ धोंडभट गोडसे
१ महादेवभट वैद्य
१ भैरवभट नवांके
१ मथुभट परभुणे
१ राजारामभट आदमण
१ सदाशिवभट सं.त्रे

१ रामचंद्र दीक्षीत वोक
१ गोविंदभट सारंगपाणी
१ दामोदरभट डोंगरे
१ रत्नाकरभट पावगे
१ महादेवभट साठ्ये
१ नारायणभट गोखले वाईकर
१ प्राणनाथभट कासीकर
१ बाळंभट सदावर्ते
१ बाळंभट बापट
१ धोंडभट रानडे
१ बापुभट गोखले
१ नारायण दीक्षीत बापट कासीकर

२२

१२॥० घरचे मंडळीतील दर—१

१ रामचन्द्र शास्त्री द्रवीड
१ बाबदेवभट वेलणकर
१ रावजी जोशी रोडे
१ सदाशिवभट अत्रे
१ गणेशभट अत्रे
१ रघुनाथभट दातार
१ गोपाळभट......
१ गापुभट देवधर
०॥० रामभट गोखले रामेश्वर
१ सदाशिवभट देवधर
१ प्रभाकरभट वैद्य
१ महादेवभट रानडे
१ विनायकभट रानडे उपाध्ये

१२॥

२॥= घरचे ब्राह्मण आचारी शागीर्द
८= रामभट ८= शेषंभट ८=

८= रामनाथ ८= गोविंदनाना ८= बाबा जोशी ।= गोविंदाची मुलें ८= बाळाजी पोक्षे ८= (शाई पडली आहे)

१॥=

१३॥। मीठाई पुरण हलवाई

९॥। मध्यम प्रतीची

जीनस पेढे बर्फी

८८८ ८८८

८१६ दर ८८१॥९ प्रों

४ उंच जीनस पेढे बर्फी

८८२ ८८२

८८४ दर ८८१ प्रों

१३॥।

४ फुलें, माळा, हार, तुरेबद्दल मोगऱ्याची कळ्या वजन...... ८८४।•

४। पंखे वाळ्याचे गु॥ महादु जीनगर सु॥ ३५ दर ८ प्रा

७। गु॥ नथु बागवान

३ अंजीर ८८९ दर ८८३

३ आंबे सु॥ १५० दर २

१। केली १२५ दर १०० प्रों

७।

६५।=

वरील उताऱ्यावरून वसंतपूजा किती थाटाची केली जात असे तें दिसून येईल. घरांत आचारी, शागीर्द वगैरे किती असत तें समजेल. काशीकर महाराष्ट्र ब्राह्मणांचीं नावें बंगाली धर्तीवर जाऊं लागलीं हें ध्यानांत येईल. एका कुटुंबाचा १३ वैदिक, शास्त्री, जोशी वगैरे मंडळीस आश्रय होता हेंहि लक्ष्यांत ठेवण्याजोगें आहे.

श. १७०९ मार्गशीर्ष शु॥ १५ छ १३ रोजीं ग्रहण पडलें त्या निमित्तानें खर्च पडला तो रु. २२ त्याचा तपशील

३८–॥ गोदानाकडे खाशाकडे

० मोहरा २

१॥ गोपूजन अर्घ्य

१॥ ब्राह्मणपूजन अर्घ्य

१ ॥·

८–॥ खुर्दा

३८–॥·

॥·॥ देवपूजन खाशांकडे

४॥≡। हीरण्य श्राद्ध ब्रा ३

२ मातुश्री राधाबाईकडे

तीलपात्रावर खुर्दा

१ १

१ तात्याकडे तीलपात्रदानावर

१ खाशांकडे...... दानावर

·।· चीरंजीव अनुबाईकडे

·।· चीरंजीव बहिणाकडे

९८=॥।· भूयसी ता। गोविंद......खुर्दा रोख

२॥=॥।· ६॥·

घरांतील प्रत्येक इसमानें स्त्री, पुरुष, मुलीमुलगे सुद्धा धर्म केला आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

·।≡ मातुश्री राधाबाईकडे आक्षत्री (ती) येच्या दानाबद्दल पायपोस जोडा किंमत ता। खंडु जगताप छ. ३०

स्त्रिया तर कोणतेंहि व्रत वगळीत नसत असें दिसतें. त्रिपुरीपौर्णिमाव्रत, सप्तमीव्रत, संकष्टी चतुर्थीव्रत, भोपळेव्रत, प्रतिपदाव्रत, द्वितीयाव्रत, तिलकव्रत, मौन्यव्रत, बेलव्रत, शाकाव्रत, ऋषिपंचमीव्रत, अदुःखनवमीव्रत, वामनद्वादशीव्रत, गोकुलअष्टमीव्रत इतक्या व्रतांनिमित्त खर्च पडलेला आहे. ह्याशिवाय, चातुर्मास्यांत गरीब ब्राह्मणाच्या घरीं पाणी घालणें, शिवनामरांगोळी काढणें, वाती लावणें, तुळशीप्रदक्षणांची लाखोली घालणें, ब्राह्मणाचें तीर्थ घेणें इत्यादि नियम केल्यामुळे त्यांच्या उद्यापनाचा खर्च पडला आहे. चातुर्मास्यात कांहीं तरी नियम करण्याची चाल सांप्रत नष्ट होत चालली.

श्राद्धपक्ष श्रद्धापूर्वक व वित्तशाठ्य न करतां होत असत.

श. १७१० भाद्रपद द्वादशीस (छ २५) पक्ष झाला त्यास ८८।।-।॰ रु. खर्च झाला त्याचा तपशील

४० ब्राह्मण १६ दर २।। प्रों.

२ सवाष्णीस

८= तिलोदक यवोदक

६।।। अभिश्रवणास

३६।।।= भूयसी समस्तांस दर ८६ प्रों

खुर्दा टके १४७।। दर ४ प्रों.

२।।।-। भोजन दक्षणा.

ह्याच सालीं श्रावणमासीं रात्रौ जागर केला त्यास १३२।।।= खर्च पडला आहे. एकंदर ब्राह्मण २७ निमंत्रित असून त्यांस दर असामीस दक्षणा पुतळी ताट १ प्रों ताटे सुा २७ वजन तोळे ७।।१। दर पोतेचालीनें रु.१६।।- प्रों रु. १२५।।।= खेरीज घरचे भटास दर १ प्रों रु. ७ एकूण रु. १३२।।।= ह्यावरून श्रीमंती किती होती, भिक्षुकांची किफायत कशी आहे इ. गोष्टी कळण्यासारख्या आहेत.

वर ग्रहणानिमित्त केलेला धर्मादाय दिला आहे; पण त्याशिवायहि आणखी धर्मादाय झालेला येणेंप्रमाणें :—

धर्मादाय

३७।।।॰ मार्गशीर्ष शुा १५ चन्द्रग्रहणी

३० गोदान दक्षणा मोहोरा २ दर १५ प्रो

७।।। सोने वजन तोळे

८२ पवित्रक १

८२ शृंगे २

८।।॰ नाग १

८१।।॰ तुकडे ३

॰।।॰

दर १५।। प्रों.

३९।।।॰ सूर्यग्रहण वैशाख वाा ३०

२९ गोदान तात्याकडे मोहरा २ दर १४।। प्रों

१। तीळ पात्रावर सोनें वजन ८१। दर १५ प्रों

९॥ पुतळ्या ताटे १

४।॥· मातुश्री राधाबाईकडे १

४।॥· सौ पार्वतीबाईकडे १

९॥·

३९।॥·

दर व्यतिपाताला सुवर्णदान करण्याची वहिवाट होती.

खासगीवाल्यांच्या घराण्यांत एक स्त्री—सौ. पार्वतीबाई सती—गेली असें दिसतें.

> १०० धर्मादाय गुणाबाई परांजपी यास सौ. पार्वतीबाई सती जातां देविले ते हल्ली रोख दिल्हे बा। चिटी छ १० ता। रुबरु सौ. गुणाबाई (श. १७१९ भाद्रपद)

ज्योतिषशास्त्रावर लोकाचा विश्वास असे हें सांगावयास नकोच. अनिष्ट ग्रह आले असतां दानें करीत असत. श. १७१० च्या श्रावणांत "जन्मस्थ गुरु आला" सबब ४ रु. खर्च पडले आहेत. १७३२ साली भाद्रपदांत ·।॥=॥ "रासीस ग्रहण वाईट आलें सा।" दान खर्च पडला आहे तसेंच श. १७०९ कार्तिकांत (छ २८) "सौ पार्वतीबाई बाळंत झाली पुत्र झाला ते समयीं ग्रहदानें दिलीं" त्याची दक्षणा म्हणून १०॥ रु. खर्च पडले आहेत. एके ठिकाणीं यंत्र-प्रतिष्ठेबद्दल ५६। रु. खर्च पडले आहेत. अर्थात् मांत्रिकावरील श्रद्धेचें हें द्योतक होय.

ह्या जमाखर्चीत कीर्तनानिमित्त खर्च एकदाच पडला आहे.

> १७॥=॥ कथा नागोदा गोसावी याची वा। ११ (श. १७११ मार्गशीर्ष) छ २४ रोज
>
> ·।॥· क्षीरापत्तीस बत्तासे
>
> १५ गोसावीबावास १५
>
> १ गुरव नि। गोसावी यांचा
>
> १८=॥ हार, तुरे, गजरे, गु। लक्ष्मण
>
> १७॥=॥"

खीरापत हा शब्द पराशिअन आहे. पण तो संस्कृत शब्दाचा अपभ्रंश असावा अशा समजुतीने क्षीरापत शब्द वापरलेला दिसतो.

जमाखर्चावरून लोकांच्या वापरण्यांत कोणते जिन्नस असत हें प्रायः चांगल्या रीतीने समजतें. बंब तयार करण्याकरता खर्च पडला आहे. ह्या बंबांचा उपयोग काय करीत असत तें नीट ध्यानांत येत नाही. कारण बंबाकडे चांभार-काम मजुरी खर्च पडली असून तस्तें सागवानी ह्याची किंमतहि खर्च पडली आहे. तसेंच बंबाकडे कोळसे गुा त्रिंबक लोणारी म्हणून १८८ रु. नावें पडले आहेत आणि १०० रु. "बंबाकडे पितळ वगैरे खरीदीबद्दल" खर्च झाले आहेत. मेण-बत्त्या वापरीत.

श. १७१० अश्वीन

५। मेणबत्त्या ८८३ दर १।।।

१।।। मेणबत्त्या ८८१

चोपदाराचे काठीस लाख म्हणून खर्च पडला आहे. त्याचप्रमाणे चामर्डे रंगावेण्याची मजुरीहि नावें पडली आहे.

१२।०।। डबी चौकोनी मातुश्री सौ काकूबाईकडे सुपारी घालावयास

२३ घोड्याची गाडी नवी केली त्यास (श.१७१० आषाढ व श्रावण)

गाडी वापरण्याची फारशी चाल नव्हती. गाडीचा उपयोग तुरळक होत असे. पण ह्याच्या अगोदर तरी घोड्याच्या गाड्या होत्या कीं नाही हें नक्की सागतां येत नाही. गाडीला तागा हा शब्दहि ह्या जमाखर्चांत वापरलेला आहे. बायकापुरुषांचा लहानथोरांचा प्रवास घोड्यावर बसून होत असे. धान्यादि मालाची ने-आण करावयास उंटांचा उपयोग करीत. घोड्यावरून प्रवास करण्यासहि म्हणजे विशेष खर्च येई असें नाही. पुण्याहून सातार्‍यास "सौ. बहिणाबाई यास" पोचवून येण्यास ८ रु. खर्च पडले आहेत. त्याचप्रमाणे "सौ. अनुबाईस वसईस पोचवली" त्यासाठी जाता येतां मिळून रु. १०।।-।। च लागले. (श. १७१८ पौष)

श्रीमंत लोकांकडे झोंपाळ रूप्याचा असे व खासगीवाल्यांनी आपला असा झोपाळा विकला तेव्हा त्याची किंमत २२७६।।।. रु. आली.

श. १७१० मध्ये विलायती माल पुण्याच्या बाजारात मिळत असे.

१ इंग्रजी खिले ८८।।।

४।। पुस्तकाकडे इंग्रजी कागद दस्ते ३

।-। इंग्रजी चुका ८८।

८-।। सोप विलायती ८८८९

२ फुलाची पेटी १ इंग्रजी

१।। कुलुप, बा पु गाडगीळ यांजकडे इंग्रजी

१।। कुलुप इंग्रजी बालाकडे १

पेशवाईंत नाणीं निरनिराळ्या तऱ्हेचीं अशीं पुष्कळच होतीं व सर्व नाण्यांचा सारखाच उपयोग होत असे. ह्या जमाखर्चावरून पोतेचाल, हाली शिक्का, अंकुशी, कोरे फारसी, चांदवड (नाशीक चाल), ऐन शिक्का, मलकापुरी, काशी शिक्का, फुलचरी, दौलताबाद शिक्का, हुकेरी, बडोदी ह्याप्रमाणे वेगवेगळ्या शिक्क्यांचे रुपये पुण्यांत चालत असत असें दिसतें. दिल्ली, अलमशाई, पंचमेल, शेटशाई इतकीं मोहरांचीं नांवें आलीं असून धारवाडी होनाचाहि निर्देश आहे.

५० मल्हार चिंतामण वैशंपायन नाशिककर याजवर हुंडी केली. शिवराव जोशी यास देविले नाशीक चाल ते रोख जमा

१२ पोते चाल सरकारी छापी; ३८ चादवड छापी

अर्थात् सरकारी छापी पोतेचाल हें सरकारी नाणें होय.

६।≡ बट्टा जमा कोरे पारसी १०० देवून चांदवड घेतले छापी त्यांस

२०८= वट्टा शिक्याचा हेमराज मारवाडी जोरीबद्दल शिक्का पुणे दिले रु.

३२१।।= त्याचा दर शे. ६। प्रो

१६।। बट्टा हाली शिक्का २०० दिले त्याचा चांदवडीनें दर ८। प्रो

पैसे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं मनुष्याबरोबर पाठवीत. पण बराचसा व्यवहार हुंड्याच्या द्वारें होत असे. कापडावर सामान्यतः रुपयामागे नफा घेऊन विकीत असत.

१३।।.।।। फेटे धनवडी २ सवाईबाद

नफा दर रुा ८-

८८= ७।।।-

१५।।।≡ सवाईबाद

३८≡

बाकी

१२।।।. ऐन

।।।.।।।. नफा ८-

१३।।.।।।.

१५।।।≡ पागोटी शहागड निमे आख सवाईबाद

नफा ८-

१५ १३।।। ८।।।

३७।। नीमे १८।।। सवाईबाद

३।।। बाकी

१५ ऐन

।।।≡ नफा ८—

१५।।।≡

१४८≡ पैठणी तिवटे मुदल आख नफा दर रुपये ८≡ प्रों

३।।।≡।। ३।।≡।। ४।

११।।।≡

२। नफा

१४८≡

बहुतेक व्यवहारांत, विक्र्याचीं पानें विकत घेतलीं तरी, कारकुनी अगर दलाली मिळत असे.

१०८।।। सोन्याचे मणी ४० ताईत गळ्यांत घालावयासी करविले

९२।—।। सोने वजन तोळे ६८१।।।१ दर १५ प्रमाणें

१६।।। मजुरी दर तोळा २।।। प्रों

१०९८—।।

पो वजा कारकुनी मजुरी पो रु० ।।।— बाकी १०८।।।

९।।। खरेदी लाकडे रायवळ जामदारखान्याच्या कामाकडे मुकुंदा बढई सुा १६ दर ।।= प्रों छ १८ (श. १७१० आषाढ) ताा जावजी चव्हाण रु. १० वजा कारकुनी ।। बाकी रोख ९।।। गुाा रघुनाथ

खालील खर्चावरून पुरुषांचा पोशाख कसा असे व त्याला खर्च किती येई हें समजण्यासारखें आहे.

४६०।।।। खाशाकडे

२४८— आंगरखा रुदार हिर्वे छीटाचा

८।।=।। तुम्व्यास मशरु गज २।।

११ तुंबा मशरुचा दुसरा मशरु गज २।।

४१८= धोत्रजोडे

१३ १२।। १५।।=

९८।। महमुद्दा ८ आंगरख्यास व झग्यास

१५८≡ ५ ११।।।- १४।≡ ७।।≡।।

१०।।।= १६।।· १६।।·

६८।।।· तीवटे सनगे ३

१५ ३२ २१।।।·

१७८८=।।· शेले व दुपटे

५०।। शेला १

१२७।।=।। दुपटा कासीचा जरी छडीदार सनग १

१७८८=।।

११ फीता मशरु तुंब्यास गज २।।।·

·।।· मशरु ·।·

४ आंबवा तुंब्याचे अस्तरास हात १२

(आंबवा अथवा अंबवा म्हणजे आंब्याच्या रंगाचें कापड.

छीट आंगरख्याचे अस्तरास

·।।।· मगजीस अतलस गज ·।·

(मगजी=किनार; अतलस=साटीण)

·।।· तुंब्यास......गज ।=

२ टोपीस किनखाप गज ·।·

२।। टोपीस किनखाप गज ·।·

·।· डबीस पीसवी मशरुची गज ·।·

अष्टी, नागपूर, महेश्वर, चांदवड, सोलापूर येथील धोतरें प्रसिद्ध असत. त्याचप्रमाणे पैठणी, शहागडी व जालनी तिवटें–(पोगार्टी) आणि धनवडी, वणपुरी फेटे, मुलतानी चीट ह्यांचा उल्लेख जमाखर्चांत आहे. मुलांच्या एका नागपुरी धोतरजोड्याची किंमत ४० रुपये नांवें पडली आहे. बायकांच्याहि वापरण्यांत दुपेटे असत. त्यांच्या साड्या आणि लुगडीं यांस सामन्यतः चिरडी म्हणत. हा जरी श्रीमंतीचा खर्च दिसतो तरी लोक उधळे नव्हते. काटकसर कशी करावी हें त्यांस चांगलें समजत होतें. रात्रीं वापरण्याकरितां फेटे हलक्या किंमतीचे मुद्दाम विकत घेतल्याचें आढळतें. तसेंच धोतराला रफू केल्याबद्दलहि ·।· खर्च पडले आहेत.

हजामतीचें सामान स्वतःचें ठेवण्याचा प्रघात दिसतो. उ. ३।= फणी

हस्तीदंती हजामतीच्या धोकटीमध्यें छ २८ किंमत ता बाळा जामदार ( श. १७१० चैत्र ). हजामतीनंतर अंगास बदाम लावण्याचा प्रघात असावा.

४- आजे स्वर्च हजामत केल्यावर लावण्यास बदाम खाशाकडे चार हजामती गुा कृष्णा जाधव

३०८३।=॥। रु. मुलीच्या लग्नाचा खर्च शके १७३८ सालीं पडला आहे.

खर्चाच्या कांही रकमा :—

२५४॥।॥ धर्मादाय

७॥।≈॥ आरासगारी

१६॥।≈ मजुरी

३१।- बद्दल मुशाहिरा

८॥। दप्तरखर्च शाई

१०।। इनाम

१।- वामनराव आपटे याजकडील हत्ती खुला लग्नाचे दिवशीं आणिला त्यास महातास

२ आंबारीचा हत्ती निा मुरारजी येवले याजकडील लग्नाचे दिवशीं

४॥। निा ढमढेरे याजकडील जिल्बाचे प्यादे व नगराची व भालदार व लग्नाचे दिवशीं हत्ती खुला आणिला त्याजबद्दल एकंदर इनाम

१४८५॥।- वरपूजा

६७८॥-। कापड व रास

४३३८= सोनें दागिने

७८ जवाहीर दागीने

१५७॥।। रुपे दागीने

१३॥- मजुरी

१२ मानाबद्दल रुपे दागीने

१ विहिणीस अक्षत न्यावयास

५९॥। भांडी

॥।=॥ आरसा व फणी

१।= बिछायत गादीस कापूस ८०४॥।

५०    भाऊ राजमाचकर याचे विद्यमानें मध्यस्तास शेले पागोटे याबद्दल द्यावयाचे पैसे दिले रोख.

१४८५।।।-
 ५    अतसबाजी कडे
६८४।।-।।। खरेदी कोठीकडे
 १२।-    फरासखान्याकडे
 १०।।=।  फुलाचे दागीने गुा हाय
२८०।।।-।।। भोजनखर्चाकडे
१००    बिदागी बाळा नाईकीण कलावतीणीचा ताफा करविला रोज ६ उक्ता करार हस्ते कृष्णी.
 ४३८=   तैवज खर्च
 १३।।।·   खुषबोईकडे जिन्नस
 ४७।।=।। कापड सनगे
 १९।·   मेहमानखर्च देवप्रतिष्ठे समयीं मानाबा
 १०    मातोश्री काकूबाईस पातळ अष्टीचे रेशीमकाठी १
  ९।·   सौ. मातोश्री ताई
  ९।।·   भाडेखर्च
 ३०    मेहमानखर्च
  ·।।·  तबे सुा ४ भाड्यानी आणिले
  ·।·   इमारतीकडे
 २७।।।- मेहमानखर्च साल न्हाणाबद्दल

ह्यापुढे भिक्षावळीचा खर्च दिला आहे. त्यावरून तत्कालीन रिवाजांची कल्पना करितां येईल.

२२१। अमृतराव पेठे यांचे पुत्राचे मुंजबिद्दल भीक्षाल व आहेर (श. १७१० चैत्र)

१७०    भिक्षालेस
 ७७।।· लुगडी
  १८    आईसाहेब
  १३ गंगाबाई १
  १२ लक्ष्मीबाई घोरपडे १

१४ सौ चिमाबाई फडणीस १
४॥· मोरोबा पेठेची कन्या १
६ बापु जोगाची बायकोस चिरडी १

६ १

४ १

७७॥ ८

६॥· खण
(१॥· किरकोळ !)
८४॥· मुंजा मुलास
१। टोपी मखमली १
२० दुपटा पैठणी १
६३। कबाय (झगा) नवी केली
५७।= किनखाप ·॥·
३॥· अस्तरास कुसुंबी गज ५
२८= दर्यादी गज १। दर १॥·

६३।

८४॥

१७०
५१। अहेर

२२१।

ह्याशिवाय १० रु. आगठी १ माणकाची. ३॥· पवित्रक १ सोने वजन ·।· तीन मासे दर १५ येणेंप्रमाणे खर्च पडला आहे.

सौ. अबुताई यांस रजोदर्शन प्राप्त झाले सबब आहेर वगैरे खर्च .

६१५८–। याचा तपशील
३१॥= चवथे दिवशी वोटी भरावयासी घरी आणिली ते समई
२८ सेलारी १
३॥= खण १

३१॥=

४९॥=॥ बिछाना
१०। झोलणा किनखापी

४१६।।। गर्भादानाचे दिवशीं आहेर सर्वास वस्त्रें

२।।=।। भवानी खिजमतगार सांगावयासी आला त्यास तिवट १

११ खण व पातळ

९३८= दुसरीयाणें न्हाण आले ते समई सनगे

५१ पातळ पिवळे केसरी १

३।· चोळी गुलाली १

१ चोळी केशरी १

३७।।।= खण लोकांचे बायकांस द्यावयासी वगैरे ४१

६१५८-।

एका बाळंतविड्यानिमित्त ४३।। रु. खर्च पडला आहे.

४३।। मेहमान खर्च माधवराव नारायण नगरकर यांचे पुत्रांस पुत्र झाले दोघास त्यास बाळंतविड्यावर वगैरे

१५ बिदली जोड १ वजन तोळा १ किंमत येशवंतरावाचे पुत्रास

१४।।· मोहोर १ बाळंत विड्यावर छ. ३० रजब (श. १७१०)

१४ मुलाचे हातीं छ साबान मोहोर १ किंमत

४३।।·

वैशाख श. १७१० पंत प्रतिनिधीकडे लग्न झालें त्यास खाजगीवाल्याकडून खालील प्रों आहेर गेला. "रवाना गणेश नारायण पोंक्षे या समागमे १५ रु. तीवट १, ३० शेला १, २० साडी १, १ खण १

खालील रकमेंत घड्याळाचा उल्लेख असल्यामुळे ती येथे दिली आहे. (श. १७१० चैत्र)

२६ तमगु हुंजारे घड्याळ गहाणवट ठेवून देविले ते छ ८ रोज चांदवड रोख ह्यांत गहाण ठेवणाराचें नांव नीट लागत नाही.

शक १७३२-३३ सालीं नुसते भाड्याबद्दल ७२० रु. जमा आहेत.

७२० भाडे सीलकी भांड्यापा भांडी स्वयंपाकास देविली त्याबा गुा हाय एकूण रु.

ह्या भांड्याचें दररोज ३० रु. प्रों भाडें आलेलें आहे.

# व्यक्तिसूचि

# विषयसूचि